# महात्मा फुले

## व्यक्तित्व आणि विचार

गं० बा० सरदार



प्रकाशक :
दिनकर गांगल
चिटणीस, ' ग्रंथाली '
अभिनव वाचक चळवळ
३४/९०२, नेहरूनगर,
कुर्ला,
मुंबई ४०००२४

मुद्रक :
चिं. स. लाटकर
कल्पना मुद्रणालय
' शिव-पार्वती '
४६१/४ सदाशिव पेठ
टिळक रोड,
पुणे ४११०३०

प्रथम आवृत्ती :
जून, १९८१

प्रकाशन क्र. १५



मुखपृष्ठ व मांडणी :
वासंती मुझुमदार

सवलतीचे मूल्य ७ रुपये

# अनुक्रम

ह्या ग्रंथ सर्वसामान्यांना कमी किंमतीत उपलब्ध करून देता यावा म्हणून कै. प्रभाकरपंत कोरगावकर यांच्या स्मरणार्थ श्री. गोविंदराव कोरगावकर धर्मादाय संस्था, कोल्हापूर या संस्थेने १५००० रुपयांचे अनुदान दिले आहे. प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार यांनीही या ग्रंथाची किंमत कमी ठेवता यावी म्हणून लेखकाचे मानधन न घेण्याचे ठरविले आहे.

## दोन शब्द

महात्मा जोतीराव फुले हे आधुनिक महाराष्ट्रातील एक श्रेष्ठ कृतिशील समाजचिंतक होते. त्यांचे कार्य तर मोठेच आहे; पण त्यांच्या विचारांची झेपही तितकीच मोठी व विस्मयजनक आहे. तेव्हा त्यांच्या जीवननिष्ठेचा शोध घेऊन त्यांच्या विचारांचा सामाजिक आशय विशद करून सांगण्यासाठी एक लहानसा ग्रंथ लिहावा असे बरेच दिवस माझ्या मनात होते. मुंबईस लालजी पेंडसे स्मृति व्याख्यानमालेत इ. स. १९७७ मध्ये ' महात्मा फुले : विचार आणि कार्य ' या विषयावर माझी तीन भाषणे झाली. त्यानंतर लगेच मी हे ग्रंथलेखनाचे काम हाती घेतले. परंतु कोणत्या ना कोणत्या कारणांनी त्यात वारंवार खंड पडत गेला. अलीकडे माझ्या तब्येतीच्या तक्रारी वाढत चालल्याने आता हे काम आणखी लांबणीवर टाकणे इष्ट नाही असे मला वाटले. म्हणून

वरील व्याख्यानमालेतील भाषणात मी जे विचार मांडले होते त्यांची फेरमांडणी करून व त्यात थोडीबहुत भर घालून मी हा ग्रंथ लिहून काढला आहे. त्यातील विवेचन मुख्यत: 'महात्मा फुले : समग्र वाङ्मय' (आ. १ ली) आणि 'पुरोगामी सत्यशोधक' या त्रैमासिकात प्रसिद्ध झालेले 'तृतीय रत्न' नाटक यांवर आधारलेले आहे. या ग्रंथात मी जोतीरावांच्या विचारांचा सांगोपांग परामर्श घेतला आहे असा माझा दावा नाही. परंतु त्यांचे धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक इत्यादी अनेकविध विषयांवरील विचार त्यांच्या एकाच मूलग्राही, सर्वंकष सामाजिक दृष्टीतून कसे स्फुरलेले आहेत ते दाखवून देण्याचा मी येथे प्रयत्न केला आहे.

हा ग्रंथ सर्वसामान्य वाचकांना कमी किंमतीत सहजपणे उपलब्ध व्हावा अशी माझी इच्छा होती. मात्र हे कसे घडून येणार हा माझ्यापुढे प्रश्न होता. पण श्री. गोविंदराव कोरगावकर धर्मादाय संस्थेच्या विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष श्री. ज. पां. नाईक व विश्वस्त मंडळातील त्यांचे इतर सहकारी यांनी यासाठी पंधरा हजार रुपयांचे अनुदान मंजूर केले; आणि ते ताबडतोब दिले. त्यामुळेच हा ग्रंथ इतक्या कमी किंमतीत देणे शक्य झाले आहे. याबद्दल मी या संस्थेच्या विश्वस्त मंडळाचा खरोखरीच ऋणी आहे. या ग्रंथाच्या प्रकाशनाची सर्व जबाबदारी स्वीकारून ती तत्परतेने पार पाडल्याबद्दल मी 'ग्रंथाली'च्या सर्व कार्यकर्त्यांचे अंत:करणपूर्वक आभार मानतो. 'ग्रंथाली'ची कार्यप्रेरणा वाचक चळवळीची आहे. अशा संस्थेच्या वतीने माझा हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे याचे मला विशेष समाधान आहे. या ग्रंथाच्या कामात माझ्या अनेक मित्रांनी वेळोवेळी मला मदत केली आहे. त्यांचा औपचारिक रीत्या नामनिर्देश करणे त्यांना आवडणार नाही. म्हणून त्यांनी केलेल्या साह्याचा मी फक्त कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतो. या ग्रंथाच्या छपाईचे काम थोड्या कालावधीत उत्तम रीतीने करून दिल्याबद्दल कल्पना मुद्रणालयाचे संचालक श्री. लाटकर आणि या मुद्रणालयातील सर्व सेवकवर्ग यांचा मी फार आभारी आहे.

१२४३/२ आपटे रोड
शिवाजीनगर, पुणे ४११००४

**गंगाधर बाळकृष्ण सरदार**

महात्मा जोतीराव फुले



: १८२७

मृत्यू : २८ नोव्हेंबर १८९०

# १



# आधुनिक युगाचा प्रारंभकाल

महात्मा जोतीराव फुले हे आधुनिक महाराष्ट्रातील मूलगामी समाजपरिवर्तनाच्या चळवळीचे आद्यप्रवर्तक होते. हिंदू समाजातील शूद्रातिशूद्रांच्या व्यथा त्यांनी निःशंकपणे बोलून दाखवल्या. कर्जबाजारीपणापायी हैराण झालेल्या शेतकऱ्यांची गाऱ्हाणी त्यांनी वेशीवर टांगली. खेड्यापाड्यांतील या कष्टकऱ्यांचे अज्ञान व दारिद्र्य हे ईश्वरनिर्मित नसून त्याचे मूळ आपल्या समाजव्यवस्थेत आहे हे त्यांना बरोबर उमगले होते. म्हणून या व्यवस्थेतील धर्माधिष्ठित बौद्धिक गुलामगिरी, सामाजिक अन्याय आणि आर्थिक शोषण यांकडे त्यांनी प्रथमच लोकांचे लक्ष वेधले. एकोणिसाव्या शतकात येथे अनेक विद्यावंत समाजसुधारक होऊन गेले. जांभेकर, दादोबा पांडुरंग, राम बाळकृष्ण, लोकहितवादी, भांडारकर, रानडे, विष्णुशास्त्री पंडित, आगरकर ही नावे सर्वश्रुत आहेत. या सर्वांची दृष्टी उदार व व्यापक होती. त्यांच्या विचारसरणीत व्यक्तीची प्रतिष्ठा, इहवाद, स्वदेशप्रीती इत्यादी नवी मूल्ये कमीजास्त प्रमाणात अनुस्यूत होती. त्यांच्या सामाजिक कर्तव्यबुद्धीत दिखाऊपणाचा लवलेशही नव्हता. तरीदेखील त्यांचे कार्यक्षेत्र मर्यादित राहिले. स्त्रीशिक्षण, बाल-विवाह, पुनर्विवाह, बालावृद्धविवाह, केशवपन यांसारख्या स्त्रीदास्यविमोचनाच्या प्रश्नांवरच त्यांनी आपले सर्व लक्ष केंद्रित केले होते. उच्चवर्णियांच्या कौटुंबिक सुधारणेपलीकडे त्यांच्या कार्याची मजल बहुधा गेली नाही. जोतीरावांच्या कार्याची दिशा याहून अगदी निराळी होती. आपल्या परंपरागत जीवनसरणीतील अनिष्ट व अन्यायकारक रूढींवर तर त्यांनी वारंवार कोरडे ओढलेच, पण एवढ्यावरच ते थांबले नाहीत. रूढिप्रामाण्य आणि सामाजिक विषमता यांना दैवी अधिष्ठान मिळवून देणाऱ्या धर्मसंस्थेवरच त्यांनी हत्यार उपसले. दलित-शोषित वर्गांचा कैवार घेऊन

त्यांना त्यांचे नैसर्गिक मानवी हक्क प्राप्त करून देण्यासाठी ते जन्मभर झगडले. त्यांची स्थिती सुधारावी म्हणून त्यांनी स्वतः हिरीरीने प्रयत्न केले. पण त्याबरोबरच बहुजनसमाजातील नवशिक्षितांना त्यांनी आपल्या या सामाजिक जबाबदारीची जाणीव करून दिली. स्वतःच्या विवेकबुद्धीला जे जे पटले, ते ते ताबडतोब आचरणात आणताना फुले कधी डगमगले नाहीत. समाजाच्या अगदी तळच्या थरांतील माणसांच्या सुखदुःखांशी ते सहजतेने समरस झाले होते. या समरसतेत व कृतिशीलतेतच त्यांच्या महात्मेपणाचे व बंडखोरीचे रहस्य साठवलेले आहे.

महात्मा फुले यांनी न्याय व समता यांवर आधारलेली आदर्श समाजरचना अस्तित्वात आणण्याचा ध्येयवाद अंगीकारला होता. त्यासाठी ते अखेरपर्यंत रात्रंदिवस झटले. त्यांचे ते ध्येय अद्याप साकारलेले नाही. इतकेच नव्हे तर त्यापासून अजूनही आपण खूपच दूर आहोत. जोतीराव हे विश्वधर्माचे उपासक होते. एकेश्वरी मताचा त्यांनी मनोभावे पाठपुरावा केला. निरनिराळ्या जातींच्या व पंथांच्या लोकांना त्यांनी बंधुभावाची शिकवण दिली. धर्माचरणाच्या बाबतीत त्यांनी डोळसपणावर, अंतःशुद्धीवर व नैतिकतेवर सतत भर दिला. पण आता पाहावे तर धर्मभावनेत सर्वत्र अंधश्रद्धेचे, मिथ्याचाराचे व बाह्योपचारांचे प्राबल्य दिसून येते. जातीजातींतील दुरावा कमी झालेला नाही. अस्पृश्यतेचा प्रश्न दिवसेंदिवस जास्तच गंभीर होत चालला आहे. दळणवळणाची साधने आणि वीज खेड्यांपर्यंत गेली; तरीदेखील ग्रामीण व शहरी समाजांची दिलजमाई झालेली आहे असे म्हणता येत नाही. आर्थिक विकासाबरोबर उत्पन्नातील विषमता वाढते आहे. ग्रामीण भागातही काही थोड्या लोकांच्या हातात राजकीय सत्तेचे केंद्रीकरण होत आहे. अशा प्रतिकूल परिस्थितीवर मात करून फुले यांचे अपुरे राहिलेले नवसमाजनिर्मितीचे कार्य आपण जिद्दीने तडीस नेले पाहिजे. त्या प्रयत्नांत जोतीरावांचे विचार आणि कृती ही आपल्याला नेहमीच स्फूर्तिप्रद होत राहतील.

जगात आजवर अनेक क्रांतदर्शी व कृतिशील महात्मे होऊन गेले. त्या सर्वांचे द्रष्टेपण व कर्तृत्व यांना देशकालपरिस्थितीच्या मर्यादा पडलेल्याच होत्या. जोतीराव हेदेखील या नियमाला अपवाद नाहीत. कोणताही आशयघन व प्रभावी सामाजिक विचारप्रवाह पाहिला, तर त्यात चिरंतन व कालसापेक्ष असे दोन्ही प्रकारचे अंश एकवटलेले दिसून येतात. काळाची गरज न ओळखता निर्माण झालेल्या विचारांत जिवंतपणा येत नाही. ते धारदार बनत नाहीत. उलट विद्यमान वास्तवाचे कवच भेदून भविष्याचा अचूक वेध घेण्याची कुवत ज्या समाजचिंतकांच्या ठिकाणी नसते, त्यांचे विचार बहुधा उथळ, निःसत्त्व व क्षीणबल असतात. म्हणून तत्त्वनिष्ठ समाजहितैषी नेते ध्येय आणि वास्तव, अंतिम उद्दिष्ट आणि तात्कालिक निकड यांचा

व्यवस्थित मेळ घालण्याची पदोपदी दक्षता घेतात. कालमान बदलले, परिस्थितीच्या प्रवाहाने नवे वळण घेतले की, बदललेल्या परिस्थितीचा नवा संदर्भ लक्षात घेऊन जुन्या आचार-विचारांची कसोशीने छाननी करावी लागते; त्यांची यथोचित फेरमांडणी करावी लागते. त्या दृष्टीने प्रत्येक कालखंडातील थोर नेत्यांच्या सामर्थ्याबरोबर त्यांच्या मर्यादा कळून आल्याखेरीज सामाजिक प्रगतीचे पाऊल पुढे पडत नाही. फुले यांच्या विचारांचा मागोवा घेताना व त्यांच्या जीवित-कार्याचे मूल्यमापन करताना त्यातील नित्यनूतन भाग कोणता आणि कालबाह्य भाग कोणता, याचे अवधान राखले पाहिजे. त्यासाठी प्रथम ब्रिटिशपूर्व काळातील महाराष्ट्र कसा होता? ज्या हिंदू धर्मावर जोतीरावांनी कडाडून हल्ला चढविला, त्याचे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात वास्तविक स्वरूप काय होते? अव्वल इंग्रजीत येथील समाजाचे वेगवेगळे घटक कोणत्या परिस्थितीत वावरत होते? त्या परिस्थिती-तून कोणते महत्त्वाचे प्रश्न निर्माण झाले होते? तत्कालीन सुधारणावादाची प्रगती कोणत्या दिशेने होत होती? इत्यादी गोष्टींचा थोडक्यात ऊहापोह केला पाहिजे.

## ब्रिटिशपूर्व काळातील महाराष्ट्र

कोणताही समाज घेतला, तरी त्यात नित्य काही ना काही बदल होतच असतात. पण एकंदर समाजव्यवस्थेच्या दृष्टीने त्याला काही महत्त्व नसते. सामाजिक जीवनात जेव्हा आमूलाग्र व अर्थपूर्ण बदल होतो, तेव्हा त्याला क्रांती असे म्हणतात. अशा तऱ्हेचे मूलगामी सर्वंकष परिवर्तन पेशवाईअखेरपर्यंत येथे होऊ शकले नाही. इंग्रजी राज्याची येथे स्थापना झाली आणि या राजकीय स्थित्यंतरानंतर अल्पावकाशातच आपल्या समाजाची मध्ययुगातून आधुनिक युगाकडे वाटचाल सुरू झाली. त्यापूर्वी हजार वर्षे तरी आपला सामाजिक व्यवहार मध्ययुगातील स्थितिशील व साचेबंद जीवनसरणीशी निगडित होता.

मध्ययुगीन महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनातील नियामक सत्ता राज्यसंस्था, वतन-संस्था आणि जातसंस्था या त्रयीत विभागलेली होती. त्यापैकी राज्यसंस्था ही अधिक बलाढ्य असली, तरी इतर दोन्ही संस्था शतकानुशतकांच्या परंपरेने लोकजीवनात स्थिरपद झाल्या होत्या; आणि आपापल्या क्षेत्रात तर त्या स्वायत्तच होत्या. देशमुख-देशपांडे, पाटील कुलकर्णी हे वतनदार राजसत्तेला जबाबदार असले, तरी ते राजसेवक नव्हते. आपल्या अखत्यारीतील मुलखात ते जणू प्रतिराजेच होते. रामचंद्रपंत अमात्यांनी म्हटल्याप्रमाणे "राज्यातील वतनदार, देशमुख व देश-कुलकर्णी पाटील आदिकरून यांसी वतनदार म्हणोन म्हणावे, हे प्राकृत परिभाषा मात्र आहे. ते स्वल्पच परंतु स्वतंत्र देशनायकच आहेत. सार्वभौमापासून बलन्यूनतेने

उतरती परंपरा बलिवंत राखोन दुर्बल वर्ततच आहेत. परंतु त्यांस साधारण गणावे ऐसे नाही. हे लोक म्हणजे राज्याचे दायादच आहेत."[1] या दृष्टीनेच देशमुख हा देशाचा अधिपती आणि पाटील हा गावचा राजा अशी त्यांची ख्याती होती. हे वतनदार एका अर्थी पिढीजात परंपरागत लोकप्रतिनिधी होते. राजा आणि रयत यांना जोडणाऱ्या दुव्यासारखे त्यांचे समाजजीवनातील स्थान होते. जनसमुदायात त्यांचा मान व प्रतिष्ठा फार मोठी होती. "देशात मुलकांचे पाटील कुळकर्णी यांचे हाती [ व ] देशमुखांचे हाती कुळ रयत"[2] असे जागोजाग दिसून येत असल्यास नवल नाही. जमिनीची मालकी येथे बहुतांशी शेतकऱ्यांपाशी होती. पण त्याच्या निव्वळ उत्पन्नातील बराचसा भाग जमीनमहसुलाच्या रूपाने शासनाकडे जाई, मात्र शासनकर्त्यांचा व रयतेचा प्रत्यक्ष संबंध क्वचितच येत असे. "राज्य चालविण्यास राजाला जो पैका व धान्यादी सामग्री पाहिजे ती ह्या देशमुख-देशपांडे वतनदारां-करवी मिळावयाची. देशमुख-देशपांड्यांच्या जोडीला राज्यसूत्र–चालकांकडून सुभेदार नेमलेले असतात; पण तेही देशमुख देशपांडे हे आपले काम बरोबर करतात न करतात हे पाहण्यासाठी असतात. म्हणजे त्यांनीही देशमुखादिकांचेकडूनच हे वसुलीचे काम करवून घ्यावयाचे आहे. स्वातंत्र्याने नाही."[3] अशी कार्यपद्धती पूर्वापार रूढ झालेली होती.

शेतकऱ्यांकडून जमीनमहसुलाच्या रूपाने जो पैसा राज्याच्या खजिन्यात जमा होई, त्यापैकी फारच थोडा अंश शासनाकडून त्यांच्यासाठी खर्च होत असे. कारण त्या काळी ग्रामीण भागाच्या संदर्भात परचक्रनिवारण आणि शांततारक्षण एवढेच सामान्यतः राजाचे कर्तव्य मानले जाई. शिक्षण, शेतीसुधारणा, वैद्यकीय मदत यांच्या बाबतीत खेड्यांतील जनतेची शासनाकडून कोणतीच अपेक्षा नव्हती. त्यांच्या या गरजा ग्रामसंस्थेच्या मार्फत स्वायत्ततेने पुऱ्या होत असत. मध्ययुगातील राजे-रजवाड्यांचे ऐश्वर्य व धनसंपत्ती ही युद्धातील लुटीचा ऐवज सोडला, तर गरीब शेतकऱ्यांच्या पिळवणुकीतूनच त्यांना प्राप्त होत होती. सरकारी खजिन्यात जमा झालेला पैसा राजेरजवाड्यांची ख्यालीखुशाली, फौजफाटा, देवस्थानांची इनामे, शास्त्रीपंडितांचा पुरस्कार व अमीरउमरावांचे सरंजाम व मानमरातब इत्यादी अनुत्पादक बाबींसाठीच वापरला जाई. शेतीचे उत्पादन कसे वाढवता येईल या प्रश्नाच्या बाबतीत येथील राजे, जहागिरदार व वतनदार यांपैकी कुणालाच खास आस्था नव्हती. कराच्या ओझ्याखाली दडपला गेलेला शेतकरी कशीबशी स्वतःची गुजराण करीत होता. त्यामुळे शतकामागून शतके लोटली, तरी येथील शेतीत कोणतीच सुधारणा झालेली नाही.

देशमुखपाटीलप्रभृती वतनदारांचा पदाधिकार हा राजाच्या मर्जीवर अवलंबून

नव्हता. म्हणून त्यांना ‘ शाश्वत ’ अधिकारी असे मानले जाई. एक राजवट जाऊन तिच्या जागी दुसरी आली, तरी त्यांच्या सत्तास्थानाला सहसा धक्का पोचत नसे. युद्धातील जयापजयामुळे राज्याच्या सीमा बदलल्या, तरी देशमुखपाटलादिकांच्या अधिकारक्षेत्रात बदल होत नसे. तेव्हा राजकीय स्थित्यंतराविषयी हे वतनदार प्रायः उदासीन असत. त्यांची दृष्टी केवळ स्वतःच्या वतनावर खिळलेली असे. कठीण प्रसंगी ते राजाशी एकनिष्ठ राहतीलच अशी खात्री नसे. उलट “ परचक्र आले म्हणजे वतनाचे आशेने अगोधर सलूख करितात; स्वतः भेटतात, तिकडील भेद इकडे, इकडील भेद तिकडे करून राज्यात शत्रूचा प्रवेश करितात. ”[४] अशा तऱ्हेची फितुरीही त्यांच्या हातून कित्येकदा घडत असे. आपल्या सामूहिक जीवनाचे मूलभूत घटक गाव व जात हेच होते. या दोन्ही संस्था स्थिर पायावर उभ्या होत्या; त्यांची संघटना चांगली मजबूत होती. पण त्यामुळे आपले समग्र सामाजिक जीवन मात्र सुसंघटित न बनता समुच्चयात्मकच राहिले. अनेक गावांचा समुदाय म्हणजे देश आणि अनेक जातींचा समुदाय म्हणजे समाज अशीच येथील वस्तुस्थिती होती. या घटकांना एकमेकांशी जोडणारे बंध अजिबात नव्हते असे नाही; परंतु ते बरेचसे सैल व डळमळीत होते. त्यामुळे येथील राजसत्तेचा पाया बहुतांशी अस्थिर राहिला. आपले राजेमहाराजे आपसात लढताना काय पराक्रम गाजवीत असतील ते असोत; पण परकीय आक्रमणाला मात्र ते एकजुटीने व खंबीरपणे तोंड देऊ शकले नाहीत.

## जातिसंस्था व ग्रामसंस्था

जातिसंस्था हा परंपरागत हिंदू समाजव्यवस्थेचा कणा आहे. या व्यवस्थेत प्रत्येक मनुष्याची अस्मिता आणि सामाजिक दर्जा ही दोन्ही त्याच्या जातीशी निगडित आहेत. जातिबहिष्कृत माणसाला हिंदू समाजात तत्त्वतः कुठेच स्थान नाही. आपल्या एकंदर लौकिक व्यवहारावर जातिसंस्थेचे अधिराज्य होते. आहार, पोशाख, व्यवसाय, धर्मकृत्ये, कुटुंबनीती, सामाजिक संबंध इत्यादी लहानमोठ्या सर्व बाबतींत जातिसंस्थेने प्रत्येक जातीच्या सभासदांवर कडक निर्बंध घातले होते. जातिधर्माचे रक्षण करण्याची जबाबदारी जातपंचायतीची होती; आणि त्याप्रमाणे न वागणाऱ्या माणसांची चौकशी करून त्यांना शिक्षा ठोठावण्याचाही तिला अधिकार होता. जातिसंस्था ही स्वायत्त होती. ही स्वायत्तता अबाधित राहावी म्हणून सरकार कोणत्याही जातीच्या अंतर्गत व्यवहारात सहसा हस्तक्षेप करीत नसे. शिवाजीमहाराजांनी जेव्हा आपली सागरसेना उभारली, तेव्हा अलीबागकडील भंडारीकोळी ज्ञातीने त्यांच्याकडून स्पष्टपणे कबूल करून घेतले की, “ आमच्या ज्ञातिधर्माचे आम्ही धनी, आमची न्यायमनसुबी सरकारात न्यावयासी प्रयोजन नाही. ”[५]

जातिव्यवस्था ही जन्मसिद्ध उच्चनीचभाव आणि अधिकारभेद यांवर आधारलेली असून ती ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंतच्या अनेकविध सामाजिक घटकांची उतरंड आहे. शिवाय निरनिराळ्या जातींचा जीवनक्रम पिढ्यान्‌पिढ्या एका ठराविक चाकोरीतच गुंतून पडला होता. त्यामुळे राजकीय क्षेत्रात जरी मोठमोठी स्थित्यंतरे झाली, तरी आपले सामाजिक जीवन कधी तळापासून ढवळून निघाले नाही; त्याच्या साचेबंद स्वरूपात कधी लक्षणीय बदल घडून आला नाही. अर्थातच जातीजातींच्या सामाजिक व सांस्कृतिक जीवनातील अंतरही होते तसेच कायम राहिले. सामूहिक जीवनाला आवश्यक असणारा श्रमविभाग जातिव्यवस्थेत अंतर्भूत होता. सर्वांनाच उदरनिर्वाहासाठी आपापल्या जातीचा व्यवसाय करण्याखेरीज गत्यंतर नव्हते. त्यामुळे समाजाचा नित्याचा व्यवहार निर्वेधपणे चालू राहिला, पण त्यातून व्यापक सामाजिक जाणिवा विकास पावण्याऐवजी संकुचित जातिनिष्ठेचेच पोषण होत गेले.

जातिसंस्थेप्रमाणे समाजजीवनाला आधारभूत दिसणारी दुसरी संस्था म्हणजे ग्रामसंस्था होय. ग्रामसंस्थेतील आर्थिक श्रमविभाग निरनिराळ्या जातींच्या सहकार्या-वर आधारलेला होता. प्रत्येक गावातील मिरासदार शेतकरी बहुजनसमाजातील त्या त्या भागातील कोणत्यातरी एका प्रमुख जातीचे असत; आणि गावातील बहुतांश जमिनीची मालकी त्यांच्याकडे असे. भारतातील ही ग्रामसंस्था स्वायत्त होती हे खरे, परंतु ग्रामपंचायती म्हणजे लोकसत्ताक शासनपद्धतीचाच एक प्रकार आहे, अशी जी समजूत रूढ झाली आहे, तिला वास्तवात कोणताही आधार नाही; ग्रामपंचायतीतील सभासदांना स्वतंत्रपणे निर्णय घेण्यास फारच थोडा वाव होता. कारण तत्कालीन सर्वच लोकव्यवहार रूढीने व परंपरेने बांधलेला होता. शिवाय गावातील वरिष्ठ वतन-दार, पाटील, कुळकर्णी व जोशी यांच्या सामाजिक प्रतिष्ठेला व विशेषाधिकारांना राजसत्तेचे व धर्मसत्तेचे पाठबळ असल्याने त्यांची शोषकवर्गातच गणना केली पाहिजे. म्हणून राज्यसंस्था व जातिसंस्था यांच्याप्रमाणे ग्रामसंस्थादेखील आपल्या देशातील सामाजिक व आर्थिक विषमतेला पोषकच ठरली आहे.

### जनतेच्या अगतिकतेची कारणमीमांसा

आर्थिक व सामाजिक विषमतेवर आधारलेल्या आपल्या या समाजव्यवस्थेविरुद्ध अत्यंत हलाखीचे जिणे जगणाऱ्या बहुसंख्य जनतेचा असंतोष कधीच कसा उफाळून आला नाही असा प्रश्न उत्पन्न होणे साहजिक आहे. आपल्या देशातील जनतेच्या या अगतिकतेचे मूळ आपल्या समाजरचनेमधील सत्तास्थानांच्या विभागणीत आणि धर्माने लादलेल्या बौद्धिक गुलामगिरीत आहे. येथील मध्ययुगीन समाजव्यवस्थेत राजा व त्याच्या शासनयंत्रणेतील अधिकारी, इनामदार, जहागिरदार आणि देशमुख-

पाटीलप्रभृती वतनदार यांचे हितसंबंध गुंतलेले होते. या व्यवस्थेला धर्मसंस्थेचा आशीर्वाद होता. कारण धर्मसत्तेचा मान राखणे, धार्मिक परंपरेला व चालीरीतींना संरक्षण देणे हे तिने राजाचे एक पवित्र कर्तव्य मानले होते. देवस्थानांना सरकारकडून इनामे मिळाली होती. शास्त्री, पुराणिक व पुरोहित यांना राजाश्रयाचा आधार हवा होता. तेव्हा त्यांनी प्रस्थापित समाजव्यवस्थेचे गोडवे गाइले, सामाजिक संस्थांना स्वतःसिद्ध पावित्र्य बहाल केले तर त्यात काहीच आश्चर्य नाही. राजा हा ईश्वराचा अंश आहे अशी प्रजाजनांची धारणा होती. मात्र राजाचा साक्षात संबंध लोकांशी कधीच येत नसे. राजछत्राखाली निरनिराळ्या संस्थांच्या द्वारे लोकांचा व्यवहार सुरळीत चालू असे. देशमुख हाच आपल्या मुलखाचा धनी; त्याची रयत म्हणवून घेण्यात लोकांना धन्यता वाटे. स्वामिनिष्ठा, सेवकधर्म, प्राप्तकर्म इत्यादी कल्पना जनमानसात खोलवर रुजलेल्या होत्या. त्यामुळे धन्याविरुद्ध ब्र काढणेदेखील महत्पाप समजले जाई. या कृषिप्रधान देशात गावगाड्याला अनन्यसाधारण महत्त्व होते. गावकीच्या व्यवहारात एक प्रकारचा कौटुंबिक जिव्हाळा होता. गावातील पाटलाचे स्थान कुटुंबप्रमुखासारखे होते. तो गावकामगार असला, तरी लोकांचा प्रतिनिधी म्हणून त्याला शासनात व समाजात मान्यता होती. अडीअडचणींच्या प्रसंगी त्यांना तत्परतेने मदत व मार्गदर्शन करणारा तो त्यांचा पाठीराखा होता. गावातील कोणाचाही वृत्तिच्छेद होऊ नये, कुणीही उपाशी राहू नये म्हणून त्याला खबरदारी घ्यावी लागत असे. हे वरिष्ठ वतनदार, राजा व त्याचे शासनाधिकारी यांच्याप्रमाणे शेतकऱ्यांच्या आर्थिक शोषणात सहभागी होते हे तर खरेच; परंतु त्या काळात शोषक व शोषित यांचे संबंध सध्याच्या उद्योगप्रधान आधुनिक युगातील संबंधाइतके रुक्ष, व्यक्तिनिरपेक्ष व उघडउघड बाजारी स्वरूपाचे नव्हते; तर त्यावर मध्ययुगातील खानदानी दिलदारपणाचे ऐसपैस आवरण होते.

ओढगस्त जीवन असह्य होत असताही लोक अगदी उदासीन व निष्क्रिय राहिले, याचे मुख्य कारण त्यांची अज्ञानमूलक व आंधळी धर्मश्रद्धा हेच होय. धर्म हा तेव्हा जीवनविषयक जाणिवांचा केंद्रबिंदू होता; आणि तो नित्य व अपरिवर्तनीय आहे अशी यच्चयावत लोकांची दृढ श्रद्धा होती. उच्चवर्णियांच्या आचारविचारात शब्दप्रामाण्याचे अधिराज्य होते; तर जनसामान्यांच्या व्यवहारात रूढिवादाचे वर्चस्व होते. लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांच्या मनावर स्थितिशीलतेचे संस्कार झालेले होते 'बलीयसी केवलमीश्वरेच्छा' 'मर्जी देवाची, मिथ्या धाव मनाची' अशी त्यांची धारणा होती. म्हणून जे घडते ते ईश्वरेच्छेने व आपल्या भल्यासाठीच होते असे ते मानत असत. कर्मविपाकाचा सिद्धान्त भारतीयांच्या रोमरोमात भिनलेला होता. कथाकीर्तनांतून, पुराणप्रवचनांतून त्याचे नित्यशः पाठ दिले जात होते. वर्ण-

विभाग आणि जातिभेद हा ईश्वरी योजनेचा परिपाक आहे असे धर्मग्रंथांचे प्रतिपादन होते. साहजिकच सामाजिक संस्थांतील गुणदोषांची चिकित्सा करण्याचा व त्यांत बदल घडवून आणण्याचा प्रश्नच कधी उद्भवला नाही. आपल्या मूल्यविचारात धर्माची पुनःस्थापना, समाजाची धारणा, लोकसंस्थांचे रक्षण इत्यादी गोष्टींना प्राधान्य आहे; उलट व्यक्तिविकास, संस्थात्मक परिवर्तन, सामाजिक प्रगती यांसारख्या संकल्पनांचा अभाव आहे. मानवी व्यवहार हा सृष्टिक्रमाचाच एक भाग आहे असे मानून भारतीय तत्त्ववेत्त्यांनी त्याचे विश्लेषण केले आहे. सृष्टीतील घडामोडी हा त्रिगुणात्मक प्रकृतीचा खेळ आहे. मानवी समाजाची उभारणी त्याच धर्तीवर झालेली आहे असा त्यांचा निष्कर्ष होता. वर्ण आणि जाती यांतील गुणकर्मविभाग हीदेखील एक व्यवस्थाच होती. ती कोणी कावेबाजपणाने व दुष्टबुद्धीने लादली होती असे समजणे बरोबर नाही. मात्र ती सदोष व अन्यायमूलक होती. तिच्यात पक्षपातीपणा ओतप्रोत भरून राहिला होता. या व्यवस्थेत ब्राह्मणक्षत्रियांना विशेषाधिकार होते. त्यांच्या हाती सुखसमृद्धीची साधने होती. शूद्रातिशूद्रांच्या वाट्याला मात्र जन्मभर कुचंबणा व काबाडकष्ट यांखेरीज दुसरे काही नव्हते. ही विषमता जुन्या काळातील साधुसंतांना आणि सामान्य जनांनाही अजिबात जाणवली नव्हती असे नाही. परंतु आपल्या सांस्कृतिक परंपरेत मुळातच ज्ञान व श्रम यांची फारकत होती. तेव्हा अशिक्षित श्रमजीवी जनतेच्या मनात या व्यवस्थेची छाननी करण्याचा विचार कुठून येणार ? शिवाय सृष्टीतील विषमतेप्रमाणेच सामाजिक विषमता ही नैसर्गिक व अपरिहार्य आहे अशी धर्मसंस्थेची शिकवण त्यांच्या अंतःकरणात खोलवर रुजलेली होती. अग्नी शीतल का नाही ? चंदनच दाहकतेला विघातक का ? हे प्रश्न निरर्थक आहेत. एखादा मनुष्य जन्मतःच काळा किंवा गोरा, कुरूप किंवा देखणा असला, तर त्याबद्दल तक्रार करण्यात काय हशील ? त्याप्रमाणेच एक शूद्र समाजात जन्मला आणि दुसरा ब्राह्मणवर्णात जन्मला म्हणून खेद करणे सयुक्तिक नाही. वर्णधर्म हे स्वभावविहित आहेत. त्यांच्या परिपालनातच सर्वांचे कल्याण आहे.

" तैसें वर्णाश्रमवशें । जें करणें आलें असे ।
गोरेया आंगा जैसें । गोरेपण ॥ "[६]

याबद्दल कुणाच्याही मनात संदेह नव्हता. तीव्र संवेदनशील स्वाभिमानी माणसाला कधीकधी आपली यातिहीनता व विपन्नावस्था बोचत असे. चोखा मेळ्यासारख्या संतालाही कित्येकदा काही प्रश्न पडत. ईश्वर न्यायी व दयाळू आहे, मग त्याच्या राज्यात " एकासी कदान्न, एकासी मिष्टान्न । एका न मिळे कोरान्न मागतांचि "[७] असे का ? आपण स्वतः सश्रद्ध व सदाचरणी असूनही समाजात पदोपदी अशा

आपली अवहेलना का ? अशा प्रश्नांची उत्तरे काही केल्या त्यांना सापडत नसत आणि अखेरीस “ कृष्णनिंदा घडली होती । म्हणोनि महारजन्मप्राप्ती ”८ अशी ते आपली समजूत करून घेत. संतांच्या अध्यात्मनिरूपणातील अंतःसामर्थ्याच्या जोपासनेचे तत्त्व लाखांतून एखाद्याच्या पचनी पडले असेल; पण संसार हा दुःखमय आहे या त्यांच्या विचाराचा मात्र असंख्य लोकांना घडोघडी प्रत्यय येत होता म्हणून आपले मन मारून स्वतःच्या कष्टातून जे काही अल्पस्वल्प मिळेल त्यावर ते आपले दैन्यावस्थेतील जीवन कंठत राहिले. मनाची स्वाभाविक सुखप्रवृत्ती कधीमधी उसळून वर येत असेल; पण नैसर्गिक प्रेरणांचा उद्रेक आणि पूर्वसंस्कारांची पकड यांच्यातील येथील संघर्षाला कधीच धार चढली नाही. त्यामुळे समन्वयदृष्टी हा आपल्या सामाजिक जीवनाचा स्थायीभाव होऊन बसला. त्यात बंडखोरपणाला थारा मिळाला नाही.

## नवी शासनपद्धती

महाराष्ट्रात इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर आपल्यातील नवशिक्षितांना हळूहळू पाश्चात्त्यांच्या उद्योगप्रधान आधुनिक संस्कृतीची ओळख होऊ लागली. आपल्या सामाजिक जाणिवांत व जीवनात मूलगामी परिवर्तन होत चालल्याची चिन्हे दिसू लागली. ही प्रक्रिया अगदी संथपणे व सावकाश चालू होती. सामाजिक जीवनाचा प्रवाह कधीच सरळ, सुसंगत व एकजिनसी असत नाही. त्यात निरनिराळ्या प्रेरणा व प्रवृत्ती उद्‌भवतात; आणि त्या आपापल्या परीने या प्रवाहाला इष्ट ते वळण लावण्याची धडपड करीत राहतात. प्रत्येक प्रेरणेचे व प्रवृत्तीचे काही अंगभूत सामर्थ्य असते. या अनेकविध शक्तींच्या सहकार्यातून, संघर्षातून व समन्वयातून सामाजिक जीवन घडत असते. त्याची साक्षेपी दृष्टीने दखल घेतल्याखेरीज कोणत्याही कालखंडाचे स्वरूप ध्यानात येत नाही.

पेशवाईचा अस्त होऊन इंग्रजांचे राज्य आले याची मूठभर हितसंबंधी लोक सोडले, तर कुणालाही विशेष खंत वाटली नाही. शिवाय तत्कालीन इंग्रज राज्यकर्ते व प्रशासक शासनव्यवहारात चांगले मुरब्बी व वाकबगार होते. त्यांनी आपल्या येथील राज्यकारभाराची घडी बसवण्याचे काम अल्पावकाशातच अतिशय सावध-गिरीने, पण खंबीरपणे व शिताफीने तडीस नेले. हे राज्य कायद्याचे आहे; त्यात कुणावर अन्याय होणार नाही, कुणाच्या हितसंबंधांना अकारण धक्का लावला जाणार नाही असे त्यांनी सर्वांना जाहीर आश्वासन दिले. देशात सर्वत्र शांतता व सुव्यवस्था नांदू लागली. आधुनिक औद्योगिक युगात जाती व कूळ यांचा विचार बाजूला पडून व्यक्ती हा समाजाचा मूलभूत घटक मानला गेला होता. व्यक्तिगत जबाबदारी,

खुली स्पर्धा व करार यांना मान्यता, आणि न्यायव्यवस्थेची प्रतिष्ठा यांवर आधारलेली नवी कायदेपद्धती अस्तित्वात आली. नागरिकांचे जीवित, मालमत्ता आणि स्वातंत्र्य यांच्या रक्षणाची जबाबदारी सरकारने स्वीकारली होती. व्यक्तिस्वातंत्र्यात अर्थातच संचारस्वातंत्र्य आणि व्यवसायस्वातंत्र्य यांचाही अंतर्भाव होता. स्थावरजंगम संपत्तीचा उपभोग, संचय आणि खरेदीविक्री यांवरील निर्बंध दूर झाले. १८३६ साली गोल्डस्मिड आणि विंगेट या अधिकाऱ्यांच्या देखरेखीखाली जमिनीची मोजणी करण्यात येऊन तिची प्रतवारी लावण्यात आली. मालकांचे परंपरागत हक्क शासनाने मान्य केले; आणि तीस वर्षांच्या कालावधीसाठी जमाबंदी करण्यात आली. रयतवारी पद्धतीत जमीन ही इतर वस्तूंप्रमाणे खरेदीविक्रीची एक बाब होऊन बसली. स्मृतिप्रणीत धर्मशास्त्रावर हिंदू कायद्याची उभारणी झालेली होती. त्यात व्यक्तीपेक्षा जातीला महत्त्व दिलेले होते. प्रत्येक मनुष्याचे हक्क त्याच्या जातीवर अवलंबून होते. निरनिराळ्या जातींच्या माणसांना एकाच गुन्ह्याबद्दल वेगवेगळ्या शिक्षा दिल्या जात. पण कायद्यापुढे सर्व नागरिक समान आहेत हे इंग्रजांच्या कायदेपद्धतीचे एक प्रमुख तत्त्व होते. भारतीय दंडसंहिता सिद्ध करताना त्यांनी हे तत्त्व प्रमाण मानले होते. त्यामुळे जातीपातीचा विचार न करता 'गुन्ह्याप्रमाणे शिक्षा' या तत्त्वाची अंमलबजावणी सुरू झाली. प्रत्येक व्यक्ती ही स्वतंत्र आहे. आपल्या मनाप्रमाणे वागण्याचा तिला निसर्गतःच अधिकार आहे. एका व्यक्तीच्या आचरणामुळे जोपर्यंत दुसऱ्याच्या स्वातंत्र्यावर व न्याय्य हक्कांवर अतिक्रमण होत नाही तोपर्यंत शासनाने तिच्यावर निर्बंध घालणे योग्य नाही असेही एक तत्त्व इंग्रजांच्या कायदेपद्धतीत समाविष्ट केलेले होते. त्यामुळे जुन्या जमान्यात कनिष्ठ जातींवर लादलेल्या निर्बंधांना कायदेशीरपणा राहिला नाही. मराठेशाहीतही गुन्हेगारीच्या बाबतीत, विशेषतः राजकीय गुन्हेगारीच्या बाबतीत स्मृतिग्रंथांतील वचनांचे नेहमीच काटेकोरपणे पालन होत असे असे नाही. गुन्ह्याचे गांभीर्य लक्षात घेऊन शिक्षेच्या जातिसापेक्षतेचे तत्त्व बाजूला सारले जाई. 'ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करू पाहतो?'[९] हे शिवाजीराजांचे वाक्य तर प्रसिद्धच आहे. त्यामुळे हिंदू, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती यांना एकच दंडसंहिता लागू करणे शक्य झाले. नागरी कायद्याच्या बाबतीत लोकांच्या भावना अगदी वेगळ्या होत्या. आपला प्रत्येक कौटुंबिक व सामाजिक प्रश्न धर्माशी निगडित होता. येथील एकंदर परिस्थिती विचारात घेऊन इंग्रज सरकारने धार्मिक तटस्थतेचे धोरण स्वीकारले होते. तरीदेखील सती व कन्याहत्या यांसारख्या अमानुष व घृणास्पद रूढी दंडसत्तेच्या बळावर नष्ट करणे सरकारला अगत्याचे वाटले. कायद्याचे सामान्यतः आदेशात्मक, प्रतिबंधक व अनुज्ञापक असे तीन प्रकार संभवतात. सतीचा कायदा प्रतिबंधक स्वरूपाचा आहे. याबाबतीत सरकारचे धोरण काय होते ते

पुनर्विवाहाच्या कायद्याची चर्चा चालू असताना पुन्हा एकदा स्पष्ट करण्यात आले होते. " हिंदुस्थानात राज्य करण्याच्या बाबतीत ब्रिटिश सरकारची जी काही मूलभूत तत्त्वे आहेत त्यांपेक्षा वेगळे काही आचरण करण्याचा सरकारचा बेत नाही. त्या मूलतत्त्वांपैकी एक म्हणजे सर्व जातींच्या लोकांना आपल्या धर्माप्रमाणे आचरणास मुभा असावी. फक्त ते धर्माचरण न्यायाची सर्वोच्च तत्त्वे व माणुसकी यांचे उलट नसावे. "[१०] उद्या जर एखादा मनुष्य नरबली देणे हा माझ्या धर्मसाधनेतील एक आवश्यक विधी आहे असे म्हणेल, तर त्याला प्रतिबंध करणे हे सरकारचे कर्तव्य ठरेल. त्यामुळे धार्मिक तटस्थतेच्या धोरणाला बाध येतो असे म्हणणे रास्त होणार नाही. या दृष्टीने धर्मांतर व पुनर्विवाह यांसंबंधी कायदे करतानाही सरकारने बुद्धिपुरःसर तारतम्य सांभाळले होते. धर्मांतर करणे न करणे हा ज्याच्या त्याच्या मर्जीचा प्रश्न आहे. त्याच्याशी सरकारला काही कर्तव्य नाही. परंतु कोणत्याही माणसाला आत्मकल्याणासाठी आपला धर्म सोडून देऊन दुसरा धर्म स्वीकारणे श्रेयस्कर वाटले, तर तसे करण्याचा त्याला अधिकार आहे. त्यामुळे त्याचे पूर्वीचे हक्क नष्ट होणार नाहीत एवढी हमी देण्याचाच काय तो धर्मांतर कायद्याचा उद्देश होता. पुनर्विवाहाच्या कायद्यालाही हाच न्याय लागू पडतो. सरकारने आपण होऊन या प्रश्नात लक्ष घातले नव्हते. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्यासारखा धर्मशील व व्युत्पन्न पुढारी आणि त्यांच्या मताचे अनेक प्रतिष्ठित लोक यांच्या मागणीवरून सरकारने हा कायदा करण्याचे ठरविले. पुनर्विवाहासंबंधीच्या चर्चेत दोन पक्ष पुढे आले होते, त्यांपैकी एका पक्षाला पुनर्विवाह रूढीविरुद्ध असला, तरी शास्त्रसंमत आहे असे वाटत होते. दुसऱ्या पक्षाचे मत त्याला धर्मशास्त्रात शास्त्राचा आधार नाही असे होते. यांपैकी कोणत्या पक्षाचे मत बरोबर हे ठरविणे हे अर्थातच सरकारचे काम नव्हे. परंतु ज्या स्त्रीला पुनर्विवाह हा आपल्या धर्मशास्त्राला धरून आहे असे वाटत असेल, तिच्या मार्गातील कायदेशीर अडचण दूर करण्यासाठी ब्रिटिश सरकारने हा कायदा केला. त्यामुळे सनातनी लोकांचा विरोध झाला, तरी आपले लग्न बेकायदेशीर ठरणार नाही; व आपली संतती अनौरस मानली जाणार नाही असा तिला दिलासा मिळणार होता. हा कायदा तसा कुणावरच बंधनकारक नव्हता. ज्या स्त्रीला पुनर्विवाह धर्मबाह्य वाटत असेल, तिला तो न करता वैधव्यदशेत आयुष्य कंठण्याची मोकळीक होती. वरील दोन्ही कायद्यांत सक्तीचा भाग बिलकुल नव्हता. उलट त्यात स्त्रीपुरुष नागरिकांच्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला संरक्षण दिले होते. अव्वल इंग्रजीत आपले राजकीय हितसंबंध धोक्यात न येतील अशा बेताने येथील प्रागतिकांच्या सामाजिक सुधारणेच्या कार्याला जमेल तितके शासकीय पाठबळ देण्याइतपत उदार दृष्टिकोण राज्यकर्त्यांनी ठेवला होता. पण १८५७ च्या उठावानंतर

मात्र धर्माशी संबंधित असलेल्या सामाजिक बाबतीत ते बाजवीपेक्षा जास्त सावधगिरीने वागू लागले.

## इंग्रजी शिक्षण

सार्वत्रिक शिक्षणप्रसार ही शासनाची जबाबदारी आहे हे तत्त्व इंग्रज राज्यकर्त्यांना मान्य होते. शिवाय राज्यकारभाराच्या सोयीसाठी इंग्रजी शिक्षण घेऊन आपल्या खास तालमीत तयार झालेल्या सेवकवर्गाची त्यांना गरज भासत होती. म्हणून काही प्रमुख शहरांमध्ये शाळा स्थापन करून त्यांनी लोकांना शिक्षण देण्याचा उपक्रम सुरू केला. या विद्यालयांची दारे तत्त्वतः सर्व जातींच्या मुलांना खुली होती. पण ज्यांना पूर्वीपासून विद्याध्ययनाची परंपरा होती अशा ब्राह्मण, सारस्वत, प्रभू अशा जातींनीच या संधीचा तत्परतेने फायदा घेतला. बहुजनसमाजाला शिक्षणाचे महत्त्व अद्याप कळले नव्हते. आपल्या राज्याच्या सुस्थिरतेसाठी इंग्रजांना येथील वरिष्ठ व वजनदार वर्गाच्या सदिच्छा व सहकार्य मिळवण्याची गरज भासत होती. 'इंग्रजांची भाषा शिकली, तर ब्राह्मणपणा जातो'[११] अशी तत्कालीन पुराणमतवादी उच्चवर्णियांची समजूत होती. त्यातच आपल्या शाळेत कनिष्ठ जातींतील मुलांचा जास्त भरणा झाला, तर समाजातील प्रतिष्ठित वर्ग तिच्यात आपली मुले पाठवणार नाही. सामाजिक जीवनात ज्यांना मानाचे स्थान नाही असे लोक आधुनिक शिक्षण घेऊन प्रथम पुढे आले, आणि त्यांनी शासनातील अधिकारांच्या जागा हस्तगत केल्या, तर इंग्रजी विद्येची व आपल्या शासनयंत्रणेचीही प्रतिष्ठा कमी होईल, अशी राज्यकर्त्यांना भीती वाटत होती. म्हणून होता होईल तो आपल्या विद्यालयात सधन व प्रतिष्ठित समाजातील मुलांना प्रथम प्रवेश द्यावा अशी शासनाधिकाऱ्यांची स्पष्ट शिफारस होती. शिक्षणकार्यासाठी सरकारने मंजूर केलेली रक्कम इतकी कमी होती, की तिच्या बळावर जनता–शिक्षणाचा अवाढव्य कार्यक्रम हाती घेणे शक्य नाही असे शिक्षणमंडळाच्या (Board of Education) सदस्यांचे मत होते. तेव्हा बहुजनसमाजात शिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून या मंडळाने काही खास प्रयत्न केले नाहीत. उलट वरिष्ठ जातींतील सुशिक्षित वर्ग मागासलेल्या जातींच्या शिक्षणासाठी स्वयंस्फूर्तीने प्रयत्न करील; आणि आधुनिक विद्येचा हा प्रवाह झिरपत झिरपत अगदी खालच्या थरापर्यंत जाऊन पोहोचेल अशी ब्रिटिश राज्यकर्त्यांनी उगीचच स्वतःची समजूत करून घेतली होती. साहजिकच खेड्यापाड्यांतून प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्याची त्यांना अजिबात निकड वाटली नाही. महाराष्ट्रात पूर्वीपासून उच्चवर्णियांकडे विद्येची मक्तेदारी होती. इतर जातींच्या लोकांनी इंग्रजी शिक्षण घेतल्यास आपल्या

जन्मसिद्ध श्रेष्ठत्वाला हादरा बसेल, हरएक क्षेत्रात ते आपली बरोबरी करू लागतील, आणि आपल्या लिखापढीच्या व्यवसायात नव्याने स्पर्धा निर्माण होईल अशी त्यांना धास्ती वाटत होती. म्हणून खालच्या जातींना शिक्षण देण्याच्या कल्पनेला त्यांनी वेळोवेळी उघडपणे विरोध केला. सनातनी वळणाचे एक प्रतिष्ठित गृहस्थ धाकजी दादाजी परभू हे मुंबईच्या शिक्षामंडळीचे सदस्य होते. त्यांनी इतर सदस्यांची मने वळवून असा ठराव करून घेतला की शिक्षामंडळीच्या शाळांत 'मराठे, कोळी, कुळंबी, भंडारी' या जातींची जितकी मुले असतील त्या सर्वांना काढून टाकावे, आणि पुढे या जातींच्या मुलांना प्रवेश देऊ नये, असे न झाल्यास आम्ही आमची मुले त्या शाळांत धाडणार नाही अशी धमकीही त्यांनी दिली. त्यामुळे वरच्या वर्गात गेलेल्या आणि चांगला अभ्यास असलेल्या या जातींच्या मुलांना इ. स. १८२६ मध्ये काढून टाकण्यात आले. मात्र हा निर्बंध फार काळ टिकला नाही. तरीसुद्धा "जर हे हलक्या जातीचे लोक शिकून पुढे हुशार झाले, तर उंच जातीच्या लोकात इंग्रजीत रोजगार मिळणार नाही व त्यांची आपली बरोबरी होत जाईल."[१२] हे धाकजी दादाजींचे म्हणणे त्या वेळी पुष्कळांना प्रशंसनीय व दूरदर्शीपणाचे वाटले. याच शिक्षामंडळीच्या शाळेतील एक व्यासंगी शिक्षक बापूशास्त्री शुक्ल यांनाही परभू, शेणवी, सोनार, वैश्य अशा जातींच्या मुलास मराठी व्याकरण शिकवण्याचे काम फारच हलक्या प्रतीचे वाटत असे. इ. स. १८५१ पर्यंत पुण्याच्या संस्कृत पाठशाळेत ब्राह्मणाव्यतिरिक्त इतर जातींच्या विद्यार्थ्यांना घेत नसत. पुढे या पाठशाळेचे पुणे कॉलेजात रूपांतर झाले; आणि सर्व जातींच्या मुलांना ते खुले झाले. त्यानंतर मोठमोठ्या शास्त्रीपंडितांनी या मुलांना संस्कृत शिकवण्यास नकार दिला होता. पण जेव्हा कॉलेजप्रमुख मेजर कँडी यांनी त्यांना शिकवलेच पाहिजे असे निक्षून सांगितले, आणि नोकरी गमावण्याचा प्रसंग येईल असे दिसून आले तेव्हा संस्कृत शिकवण्यास त्यांनी मुकाट्याने संमती दिली. या संदर्भात ज्ञान-प्रकाश या प्रगमनशील वृत्तपत्रात प्रसिद्ध झालेली बातमीही लक्षणीय आहे.

"वाडा विश्रामबाग येथील पाठशाळेत राजश्री नारायणशास्त्री अभ्यंकर व गोपाळशास्त्री गोखले ह्यांनी सरकारपाशी सर्व जातींच्या मुलांस संस्कृत शिकवण्याचे कबूल केले. तारीख १ माहे मजकुरापासून शिकवू लागले. आम्ही त्या दिवशी मुद्दाम विश्रामबागेत जाऊन पाहिले, तो वर लिहिलेले शास्त्रीबुवा स्वधर्माचा आणि स्वजातीचा अभिमान सोडून फक्त आपले पोट भरण्यावरच नजर देऊन सोनार, शिंपी, परभू, फारसी, शूद्र इत्यादी जातीच्या मुलास पुढे घेऊन संस्कृत कौमुदीतील नियम त्यांस सांगत होते. हर! हर! हर! हर! हे दुष्ट कर्म पाहून आमचे मनास तर फारच विस्मय झाला."[१३] मुंबईला जी प्रभू मंडळी सनातनी पक्षाची कड घेऊन इतर

जातींना दूर लोटत होती, त्या प्रभू जातीच्या मुलांनाही संस्कृत शिकवणे हा अधर्म आहे अशी पुण्याच्या शास्त्रीवर्गाची समजूत होती. वरिष्ठ जातींतही असे उच्चनीच-भावाचे व अधिकारभेदाचे प्रस्थ होते. दादोबा पांडुरंग यांना मुंबईस फार मोठी मान्यता होती. पण त्यांनाही पुण्यातील धर्ममार्तंडांच्या सनातनीपणाची झळ लागल्या-खेरीज राहिली नाही. शाळा-तपासनीस म्हणून त्यांची नेमणूक झाल्यावर ते प्रथमच पुण्यास आले होते. "दादासाहेब वैश्य असून त्यांची गती वेदान्तापावेतो झालेली पाहून संस्कृतचे शास्त्रीपंडित पोटातून (त्यांचा) मत्सर करीत. कारण परमेश्वराने वेदशास्त्राभ्यासाचा अधिकार ब्राह्मणांसच दिलेला आहे. 'स्वधर्मी' राज्य असते, तर असला प्रकार झाला नसता. 'अध्यापक' व 'अध्यायी' या उभयतांचे पारिपत्य झाले असते वगैरे (ते म्हणत)"[१४] ही झाली परंपरावादी लोकांची कथा. या गोष्टीला चाळीस वर्षे होऊन गेल्यावरही आधुनिक शिक्षण घेतलेल्या लोकांच्या मनावर देखील जुन्या कालबाह्य विचारांचा पगडा कायम होता. "आता इतके शिक्षित लोक झाले आहेत व सुधारलेपणाचा मोठा अभिमान बाळगतात. त्यांच्याही मनांतून अद्यापि ही ग्रंथी सुटत नाही, किंबहुना तेव्हापेक्षा आता जातिद्वेष आतून अधिक वाढल्यासारखा वाटतो."[१५] या दादोबांच्या उद्‌गारांचा इत्यर्थही तोच आहे. अव्वल इंग्रजीतील लब्धप्रतिष्ठितांची ही मनोवृत्ती पाहिली, म्हणजे विद्येच्या क्षेत्रात उच्चवर्णियांचे वर्चस्व कसे कायम राहिले आणि बहुजनसमाजात शिक्षणाचा प्रसार इतक्या मंदगतीने का झाला ते समजून घेण्यास अडचण पडत नाही. इंग्रजी शिक्षणामुळे आपल्या पांढरपेशा वर्गातील सुशिक्षितांना पाश्चात्त्य विद्येचे व संस्कृतीचे महत्त्व कळून आले; आणि त्यांतील काही नव्या कल्पना व मूल्ये आत्मसात करण्याचा त्यांनी आपल्या परीने प्रयत्न चालू ठेवला. त्यामुळे त्यांच्या राहणीत व विचारांत उत्तरोत्तर फरक पडत गेला. इतर बहुसंख्य लोक मात्र अज्ञान व रूढिवाद यांच्या पाशातच अडकून राहिले होते. जुन्या काळात बुद्धिजीवी गीर्वाणभाषापंडित आणि श्रमजीवी सर्वसामान्य लोक हे दोन समाजघटक अगदी वेगवेगळ्या वातावरणात वावरत होते. त्याचप्रमाणे या नव्या जमान्यातही शहरवासी उच्चवर्णीय सुशिक्षितांचे एक जग आणि खेड्यापाड्यांतील जनसामान्यांचे दुसरे जग अशी एकाच समाजात दोन भिन्न जगे अस्तित्वात आली होती. एका जगातील काही लोक नोकरीच्या निमित्ताने खेड्यात जाऊन राहिले, आणि दुसऱ्या जगातील काहीजण रोजगारासाठी शहरांत आले, तरी तेवढ्याने या दोन जगांतील अंतर अणुमात्र कमी होऊ शकले नाही.

### ख्रिस्तीधर्मप्रचार

इंग्रजी अमदानीत आपल्या सामाजिक जीवनात महत्त्वपूर्ण बदल घडवून

आणणाऱ्या दोन नव्या बाह्य शक्ती म्हणजे विज्ञान व ख्रिस्तीधर्म या होत. मात्र विज्ञाननिष्ठेपेक्षा आपल्या सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या मनावर ख्रिस्तप्रणीत मानवतावादाचा ठसाच अधिकांशाने उमटला होता. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात पाश्चात्त्य देशांतून प्रॉटेस्टंट संप्रदायाचे अनेक धर्मोपदेशक येथे येऊन दाखल झाले; आणि ख्रिस्तीधर्मप्रसारासाठी त्यांनी ठिकठिकाणी प्रचारकेंद्रे स्थापन केली. तसे पाहिले तर ख्रिस्ती धर्मोपदेशक भारतात कित्येक शतकांपूर्वीच आले होते. पण मध्ययुगात हिंदू आणि ख्रिस्ती धर्मांच्या अनुयायांच्या जीवनदृष्टीत काही मूलभूत फरक नव्हता. त्या काळात येथे आलेल्या कॅथॉलिक पथाच्या धर्मांतराच्या चळवळीत सक्तीचा किंवा फसवणुकीचा भाग जास्त होता. शिवाय येथील जातिव्यवस्थेशी त्यांना नित्याच्या व्यवहारात तडजोड करावी लागली होती. प्रॉटेस्टंट पंथाची भूमिका मूलतःच याहून अगदी वेगळी होती. त्याची घडण व कार्यपद्धती ही आधुनिक युगाशी जवळीक साधणारी होती. म्हणूनच ल्यूथर-कॅल्व्हिनप्रभृती धर्मसुधारकांची चळवळ ही युरोपच्या इतिहासातील नव्या युगाची नांदी ठरली. धार्मिक स्वातंत्र्यासाठी पोपशाही व पुरोहितशाही यांच्याविरुद्ध उभारलेल्या ह्या आंदोलनातून लोकांत व्यक्तिस्वातंत्र्य, सामाजिक समता आणि नागरिकांचे अविच्छेद्य असे मूलभूत राजकीय हक्क यांची आकांक्षा निर्माण झाली. त्यासाठी युरोपात पुढे जो निकराचा सामाजिक संघर्ष झाला, त्यातूनच नवेनवे विचारप्रवाह उदयास आले. सामाजिक जीवनाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांत त्यांचे पडसाद उमटले. धर्मविषयक विचारांचेही नवसंस्करण होऊन ते अधिक शुद्ध व सकस, प्रगत व अद्ययावत बनले. या उन्नत विचारांचा काही भाग प्रॉटेस्टंट धर्मोपदेशकांच्या प्रचारकार्यामधून आपल्या देशात येऊन पोहोचला. भारतातील जास्तीत जास्त लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देणे हेच या धर्मोपदेशकांचे प्रमुख उद्दिष्ट होते यात मुळीच शंका नाही. पण त्यांची कार्यपद्धती बहुतांशी सुज्ञतेची व सुसंस्कृतपणाची होती. व्यक्तीच्या अंतःप्रेरणेचे पावित्र्य आणि तिचे निर्णयस्वातंत्र्य ह्या दोन्ही गोष्टी ते मानत होते. त्यामुळे आपल्य प्रचारतंत्रात त्यांनी शिक्षण सेवा आणि धर्मतत्त्वनिरूपण यांवर विशेष भर दिला. विचारपरिवर्तनावर त्यांची मुख्य भिस्त होती. "कोणीही हिंदूने उगीच खाण्यापिण्याकरिता आपली जात मोडू नये, तर जातिभेद पाळणे पाप आहे व ईश्वराला ते आवडत नाही अशी ज्याची खातरी झाली असेल त्यानेच तो मोडावा, म्हणजे त्याबद्दल त्याचा छळ झाला असता तो सोसण्यास त्याला ईश्वर शक्ती देतो."[१६] हे डॉ. जॉन विल्सन यांचे मत बाबा पदमनजी यांनी उद्धृत केले आहे. आरंभी इंग्रज सरकारचा प्रत्यक्ष धर्मांतराच्या प्रचाराला विरोध होता. शिवाय या देशात राष्ट्रीयत्वाच्या भावनेपेक्षा धर्माभिमानाचे प्राबल्य अधिक आहे हे ख्रिस्ती

धर्मोपदेशकांना कळून चुकले होते. म्हणून प्रथम येथील लोकांत मिळून मिसळून त्यांची सहानुभूती मिळवण्याचा त्यांनी प्रयत्न केला. लोकांची भाषा ते शिकले. त्यांच्या अडीअडचणी त्यांनी जाणून घेतल्या. त्यांच्या धर्माचा व चालीरीतींचा त्यांनी अभ्यास केला. त्यांच्या मुलांसाठी शाळा उघडल्या. विद्येचा अधिकार सर्वांना आहे हे इंग्रज सरकारलाही तत्त्वतः मान्य होते, तरी त्यांनी उच्चवर्णीयांच्या शिक्षणावरच आपले लक्ष केंद्रित केले होते. ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी मात्र शूद्रातिशूद्रांना शिक्षणाची गोडी लावण्याची खटपट केली. गरीब मुलांना पाट्यापुस्तके त्यांनी मोफत वाटली. त्यांच्या घरच्या आजारी माणसांच्या औषधोपचारासाठी रुग्णालये काढली. खेड्यापाड्यांतील निराश्रित मुलांसाठी अनाथालये स्थापन केली. आपल्या ध्येयसिद्धीसाठी सर्वस्व वेचण्याची आणि लहानसहान कामेही अंतरीच्या जिव्हाळ्याने पार पाडण्याची ख्रिस्ती धर्मोपदेशकांची ही जी समर्पणशीलता होती, तिचा सर्वसामान्य लोकांवर प्रभाव पडला नसता तरच नवल! आपल्या समाजातही अडीअडचणीला एकमेकांच्या उपयोगी पडण्याची प्रवृत्ती नव्हती असे नाही.अशा तऱ्हेची सहानुभूती व सहकार्य यांच्या अभावी कोणताच समाज शतकानुशतके टिकून राहिला नसता. परंतु अशा आत्मीयतेची व सहानुभूतीची व्याप्ती बहुधा आपापल्या जातीपुरती मर्यादित असे. वेळप्रसंगी दीन-दुबळ्यांना साहाय्य केल्यास त्यात सामान्यतः दयेची व उपकाराची भावना असे; भ्रातृभावाची जाणीव क्वचितच दिसून येई. शिवाय ईश्वरोपासनेच्या प्रेरणेने जनसामान्यांच्या, गोरगरिबांच्या ऐहिक कल्याणासाठी योजनापूर्वक संघटितपणे झटणे हे आपल्या परंपरेत आढळत नाही. दुःख हाच संसाराचा स्थायीभाव आहे, त्यात खऱ्या सुखाची अपेक्षा बाळगणे व्यर्थ आहे. म्हणून मनुष्यमात्राचे तात्कालिक दुःख कमी करणे आणि त्याला कायमच्या दुःखमुक्तीचा, मोक्षसुखाचा मार्ग दाखवणे हेच येथील संतमहंतांनी आपले जीवितकार्य मानले होते. आपल्या जुन्या जीवनसरणीत आत्मस्वातंत्र्याच्या तत्त्वाचा उदोउदो आहे. पण इच्छास्वातंत्र्याची तेवढी महती गाइलेली नाही. "यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः"[१७] हा आपला जीवनादर्श होता. "अन्न मान धन। हे तों प्रारब्धा आधीन"[१८] अशी सर्वांची धारणा होती. सोळाव्या शतकात युरोपात विज्ञानाचा उदय झाला; आणि सतराव्या शतकाच्या प्रारंभापासून प्रत्यक्षात त्याचा प्रभाव जाणवू लागला. निसर्गावर प्रभुत्व मिळवण्याची आकांक्षा माणसाच्या मनात बळावली. समाजाच्या प्रगतीसाठी व सुखसमृद्धीसाठी निसर्गाच्या शक्ती काही प्रमाणात राबवता येतील असा विश्वास त्याच्या ठिकाणी निर्माण झाला. तेव्हा न्यायी, दयाळू व समदर्शी अशा परमेश्वराचे राज्य अवनीतलावर आणण्याच्या ख्रिस्तप्रणीत मानवतावादातील ध्येयसाधनेला नवा अर्थ

प्राप्त झाला. खिस्ती धर्माची उदात्त तत्त्वे ही केवळ मनुष्याच्या पारमार्थिक कल्याणालाच नव्हे, तर ऐहिक उत्कर्षालाही पोषक आहेत असा खिस्ती धर्मोपदेशकांचा दावा होता. आपल्या उक्तीने व कृतीने हे सर्वांना पटवून देण्यासाठी ते प्रयत्नांची पराकाष्ठा करीत होते. या त्यांच्या कार्याच्या मुळाशी असलेल्या ' मिशन '-च्या संकल्पनेचे दादोबा पांडुरंग, महात्मा फुले, भांडारकर, रानडे इत्यादी महाराष्ट्रीय समाजचिंतकांना विलक्षण आकर्षण वाटले. स्वामी विवेकानंदांनी आपल्या जगद्वंद्य गुरूच्या स्मारकासाठी जी संस्था उभारली तिला ' रामकृष्ण मिशन ' असे नाव दिले होते. महर्षी शिंदे यांनी आपल्या संस्थेला ' डिप्रेस्ड क्लासेस मिशन ' असे नाव दिले होते; आणि त्याचे समर्थन करताना त्यांनी मिशन या कल्पनेतील उदात्ततेकडे लोकांचे आवर्जून लक्ष वेधले होते. भारतसेवक गोखले यांनी देखील आपल्या अनुयायांच्या ध्येयवादाला आणि कर्तव्यतत्परतेला आवाहन करताना ' true missionary spirit ' चा उल्लेख केला होता. परमेश्वर आणि भक्त यांच्या संबंधात मध्यस्थांची आवश्यकता नाही हे प्रॉटेस्टंट धर्मपंथाचे एक महत्त्वाचे तत्त्व होते. त्यामुळे पुरोहितशाहीला त्यांचा विरोध होता. खिस्ती धर्म स्वीकारण्यातच भारतवासियांचे हित आहे अशी त्यांची समजूत होती. म्हणून गावोगाव फिरून ते आपले धर्ममत लोकांना पुन्हा पुन्हा ऐकवत होते. उलट हिंदू धर्माचा आधुनिक दृष्टीने व समर्थपणे पद्धतशीर प्रचार करणारी यंत्रणा त्या काळी अस्तित्वात नव्हती. पुराणकीर्तनातून जे प्रत्यही लोकांच्या कानी पडत होते, त्यामुळे धर्माच्या शुद्ध स्वरूपाचे ज्ञान न होता धर्मभोळेपणालाच प्रोत्साहन मिळत होते. उपनिषदे, गीता, षड्दर्शने, भाष्यग्रंथ यांतील तत्त्वज्ञानाचा फारच थोड्या लोकांना परिचय घडत होता. बहुसंख्य लोकांच्या श्रवणात व वाचनात हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, भक्तविजय, संतलीलामृत, शिवलीलामृत इत्यादी ग्रंथ होते- " मला जे धर्मज्ञान झाले होते ते पौराणिक हिंदू धर्माचे होते. वेद व वेदान्त याविषयी मला काही माहिती नव्हती व ती करून देण्याचा माझ्या वडिलांनी किंवा उपाध्यायांनी कधीच प्रयत्न केला नाही. आणि तसे करण्याचे त्यांच्या व माझ्या मनात सुद्धा आले नाही, वेळगावात कधीकधी एखादा हरदास कथेच्या आरंभी अध्यात्मविषयावर काही व्याख्यान देत असे, पण ते ऐकायास फारच थोडे लोक जमत, व ते संपून कथानुसंधान केव्हा लागेल याची वाट पाहात. तसेच मलाही स्वतःला वेदान्तविचार कधी आवडला नाही. हीच स्थिती हजारो व लाखो लोकांची आहे."[१९] असा बाबा पदमनजी यांनी आपला अनुभव सांगितला आहे. लक्षावधी शूद्रातिशूद्रांच्या धर्मजीवनात तत्त्वजिज्ञासा व सत्त्वसंपन्नता आणण्याची येथे कोणाला गरज भासली नाही. आपले पुरोहित व शास्त्रीपुराणिक संकुचित व स्वयंकेंद्रित वृत्तीचे होते. शूद्रातिशूद्रांना

तुच्छतेने वागवण्यातच त्यांना धन्यता वाटत होती. बहुजनसमाजाच्या धार्मिक प्रबोधनासाठी जो भागवत संप्रदाय उदयास आला होता, त्यातही अंधश्रद्धेचे, कर्मकांडाचे व मठ-महंतीचे प्रस्थ माजले होते. त्यामुळे हिंदुधर्माचे दोषाविष्करण करण्याची खिस्ती धर्मोपदेशकांना आयतीच संधी मिळाली. त्रैविद्या त्रिगुणात्मिका, भगवद्‌गीतेचे सार, ब्राह्मणांचे महत्त्व, हिंदुधर्मप्रसिद्धीकरण, मूर्तीचा उच्छेद, पुनर्जन्मनिर्णय इत्यादी पुस्तके प्रसिद्ध करून त्यांनी हिंदू समाजाचे धर्मग्रंथ, रीतिरिवाज, यात्रा-उत्सव यांवर टीकेची झोड उठवली. आपल्या धर्मग्रंथांची भाषांतरे लोकांना उपलब्ध करून दिली. विविध स्वरूपाच्या प्रचारपुस्तिका तयार करून त्या मोफत वाटल्या. हे धार्मिक आक्रमण परतवून लावण्यासाठी काही कडवे परंपराभिमानी पुढे सरसावले. त्याबरोबरच खिस्ती धर्मोपदेशकांच्या टीकेतील तथ्यांश विचारात घेऊन काही नवशिक्षित विचारवंतही आत्मसंशोधन करण्यास उद्युक्त झाले.

**संदर्भ व टीपा :**


१. आज्ञापत्र, पृ. ३६
२. शिवछत्रपतीचे चरित्र, पृ. २९
३. मराठेकालीन समाजदर्शन, पृ. ५४
४. आज्ञापत्र, पृ. ३७
५. मराठेकालीन समाजदर्शन, पृ. ३
६. ज्ञानेश्वरी, १८–८८३
७. सकलसंतगाथा–चोखामेळा, १४८
८. सकलसंतगाथा–चोखामेळा, ८९
९. इतिहासमंजिरी, पृ. ९०
१०. स्त्रियांच्या कायद्याची वाटचाल, पृ. ९१–९२
११. लोकहितवादी–निबंधसंग्रह, पृ. ७८
१२. दादोबा पांडुरंग–आत्मचरित्र व चरित्र, पृ. ४६
१३. ज्ञानोदयाची पहिली शंभर वर्षे, पृ. ९९
१४. भवाळकर–आत्मवृत्त, पृ. ८९–९०
१५. दादोबा पांडुरंग–आत्मचरित्र व चरित्र, पृ. ४६–४७
१६. अरुणोदय, पृ. ९५
१७. भगवद्गीता, ४–२२
१८. तुकारामगाथा, २६८
१९. अरुणोदय. पृ. ७०

# २



## नव्या प्रेरणा नवे विचारप्रवाह

आपण जगात का मागे पडलो? इंग्रजांशी लढताना आपला पराभव कशामुळे झाला? आपल्या सामाजिक जीवनात एकात्मता निर्माण न होण्याची कारणे कोणती? इत्यादी प्रश्नांची चिकित्सा करताना आपल्यातील सुशिक्षित समाजचिंतकांना प्रथम जर कोणती गोष्ट जाणवली असेल, तर आपण दीर्घकाळ व्यावहारिक विद्येची, उपयुक्त ज्ञानाची उपेक्षा केली आहे ही होय. आपल्या सैद्धान्तिक विचारांचा ओघ कित्येक शतके अध्यात्मविद्येकडे वळला होता. 'अध्यात्मविद्या विद्यानाम्'[१] हे गीतावचन सर्वश्रुत आहे. धर्मग्रंथांचा अर्थनिर्णय करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या न्याय, व्याकरण, व्युत्पत्ती इत्यादी शास्त्रांच्या व्यासंगात आपल्या शास्त्रीपंडितांची बुद्धि-शक्ती खर्ची पडत असे. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात इंग्रजी विद्येच्या संस्कारामुळे आपल्या समाजातील नवशिक्षितांना पाश्चात्त्य देशांच्या सर्वांगीण प्रगतीची कल्पना आली, आणि तिचे बीज त्यांच्या निखळ ज्ञानसाधनेत आहे याची साक्ष पटली. या नव्या जमान्यात आधुनिक विद्येचे सारसर्वस्व आत्मसात केल्याशिवाय आपल्या समाजाला तरणोपाय नाही अशी त्यांनी आपल्या मनाशी खूणगाठ बांधली. 'विद्या हेच बळ', 'ज्ञान हीच शक्ती' ही सूत्रवचने त्या काळी सुशिक्षिताच्या तोंडी सर्रास खेळत होती. ज्ञान ही ऐहिक अभ्युदयाची गुरुकिल्ली आहे. त्यामुळे आपल्या जुन्या भ्रामक कल्पना नष्ट होतील; आणि रूढिवादाचा जोर कमी होऊन सामाजिक प्रगतीचा मार्ग खुला होईल असा विश्वास त्यांना वाटू लागला. ज्ञानाच्या व्यावहारिक उपयुक्ततेच्या तत्त्वाने ते सुशिक्षित तरुण एकदम भारले गेले होते. मुंबईतील नवशिक्षितांनी सुरुवातीस जी संस्था स्थापन केली, तिचे नाव 'उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा' असे होते. "शास्त्रीय व व्यावहारिक विषय स्वभाषेमध्ये शुद्ध रीतीने लिहिता

यावे, व स्वदेशामध्ये उपयुक्त ज्ञानप्रसार व्हावा हा या सभेचा मुख्य उद्देश होता." पुण्यातही याच उद्देशाने 'ज्ञानप्रकाश सभा' स्थापन झाली होती. ज्ञानचंद्रोदय, ज्ञानदर्शन, ज्ञानदर्पण, ज्ञानाकार, ज्ञानसंग्रह इत्यादी तत्कालीन नियतकालिकांची नुसती नावे जरी पाहिली, तरी तेव्हा ज्ञानार्जनाची व ज्ञानप्रसाराची प्रेरणा किती प्रबळ होती ते ध्यानात येते. भूगोल, भूप्रकृतिविद्या, खगोलविद्या, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र, प्राणिशास्त्र, शारीर, इंद्रियविज्ञान, अर्थशास्त्र, इतिहास इत्यादी विषयांवर या नवोदित लेखकांनी स्फुट लेख आणि लहानमोठी पुस्तके लिहिली. त्यांतील बरीचशी पुस्तके विद्यालयीन पाठ्यपुस्तकांच्या धर्तीची असली, तरी शिक्षणप्रसाराच्या दृष्टीने त्यांची उपयुक्तता फार मोठी होती. मुंबई-पुण्यासारख्या शहरांतील सुशिक्षित वर्गात अशा तऱ्हेचा उत्साह दिसून येत होता, तरी इतरत्र सर्वसामान्य लोकांत इंग्रजी शिक्षणाविषयी अनेक गैरसमज पसरलेले होते. "त्या वेळची सर्व मराठी पुस्तके मुलांस फुकट वाचावयास देत असत. त्या पुस्तकांत (म्हणजे) भूगोलात पृथ्वी गोलाकार आहे, पृथ्वी सूर्याभोवती फिरते, ती आकाशात निराधार असून फिरते, पृथ्वी व चंद्राची छाया पडून सूर्य व चंद्रग्रहणे होतात ह्या गोष्टी पुराणादी मताच्या विरुद्ध (आहेत); तसेच इसापनीती वगैरे पुस्तकांतील पशुपक्ष्यादिकांच्या गोष्टी (की) ते बोलतात हे सर्व खोटे (आहे). आणि ही पुस्तके शिकवून सरकारने लोकांस ख्रिस्ती करून बाटवण्याची तजवीज काढली आहे, यास्तव त्या शाळेत मुलांस पाठवू नये अशा वेड्यावाकड्या व बेअकलीच्या चर्चा ग्रामस्थ लोक आपसात करीत व मुले सरकारी शाळेत पाठविण्यास एकमेकांस अडकाठी घालीत."[२] हे गैरसमज दूर करण्याची अनेक समंजस लोकांची खटपट चालू होती. शिवाय बदलत्या परिस्थितीच्या दडपणाखाली हळूहळू लोकमत बदलत गेले; आणि सवंग सरकारी नोकरीच्या अपेक्षेने का होईना, पांढरपेशा वर्गात इंग्रजी शिक्षणाची ओढ निर्माण झाली या मतपरिवर्तनाला काही अंशी सुशिक्षितांच्या पहिल्या पिढीचे प्रयत्न कारणीभूत झाले आहेत यात शंका नाही.

### धर्मजिज्ञासा व समाजसुधारणा

अव्वल इंग्रजातील ज्ञानप्रसाराइतक्याच दुसऱ्या दोन अर्थपूर्ण प्रेरणा म्हणजे धर्मजिज्ञासा व समाजसुधारणा या होत. ह्या दोन्ही प्रेरणा परस्परपूरक ठरल्या आहेत. कारण आपला प्रत्येक सामाजिक प्रश्न हा धर्मभावनेशी निगडित आहे. हिंदू समाजाचे धर्मजीवन हे प्रायः समुच्चयात्मक व संमिश्र स्वरूपाचे आहे. 'साधनानामनेकता' हे लोकमान्यांनी सांगितलेले धर्मलक्षण हिंदु धर्माला अक्षरशः लागू पडते. त्यांत विश्वात्मैक्यभावापासून ते मंत्रतंत्र व नवससायास यांच्यापर्यंत नानाविध

कल्पनांचा अंतर्भाव झालेला आहे. समाजाच्या वेगवेगळ्या थरांत वेगवेगळे धार्मिक आचार व उपासनापद्धती तर रूढ आहेतच; पण एकाच कुटुंबातही वेगवेगळ्या पातळीवरचे धर्माचरण पाहावयास मिळते. लोकहितवादींच्या शतपत्रांत व बाबा पदमनजींच्या अरुणोदयात त्या वेळच्या धर्मजीवनाचे चित्र रेखाटलेले आहे. "श्रेष्ठ (मानिलेल्या) देवांची उपासना व क्षुद्र दैवतांची भक्ती एकाच काली मजकडून चालली होती. एकीकडे शिवरात्री व एकादशी करावी व दुसरीकडे छांछू करणाऱ्या पंचाक्षऱ्याच्या नादी लागावे. एका दिवशी पुराण कीर्तन श्रवण करावे, दुसऱ्या दिवशी नागांची कहाणी ऐकत बसावे. देवळात विष्णू किंवा कृष्ण सर्व देवांत थोर आहे, रामनामासारिखे दुसरे काही नाही असे साधूंच्या मुखे ऐकावे; व तिकडे घरात खंडोबाची तळी भरताना 'एलकोट' म्हणावे व मुरळयांचे गाणे ऐकावे. (खंडोबा हा आमचे कुलदैवत होता हे मागे सांगितलेच आहे.) एकदा ब्राह्मणाचे चरणतीर्थ घ्यावे व दुसरेंदा देवीचे तीर्थ (मद्य) प्यावे. एकदा कपाळास गंध लावावे, व दुसरेंदा भस्म चर्चावे. पुनः खंडोबाचा भंडार (हळद) चोळावा व त्याच्यामागून विठोबाचा अबिरबुक्का फासावा, आणि शेवटी देवीचा कुंकुमतिलक लावावा, आणि होळीत सर्वांगावर धूळ घ्यावी! संध्येतील मंत्र जपत असता गोसाव्यापासून घेतलेला साधकमंत्रही मी पुटपुटत असे. शिवस्तोत्र व सर्पस्तोत्र ही दोन्ही मला सारख्याच मोलाची वाटू लागली. कोणी म्हणतील की ही अज्ञानपणातील पोरकट समजूत होती; तर असे नाही. आता मला समजते की, हिंदू लोकांत जे मोठेमोठे ज्ञानी व साधुसंत होऊन गेले, ते लोकांस ब्रह्मज्ञान शिकवीत असता, व स्वतः वेदान्तविचार करीत असता अनेक दैवतांचे भजन करीत असत, व क्षुद्र दैवतांचे भय बाळगीत."[३] याशिवाय देवपूजेतील भावशून्य बाह्योपचार, अर्थहीन व अन्यायमूलक रूढी, भिक्षुकांचा लोभीपणा व लाचारी, व्रतवैकल्यातील संपत्तीचा व काळाचा अपव्यय, दानधर्मातील अविचार व अनौचित्य इत्यादी गोष्टी धर्माच्या नावाखाली राजरोस खपून जात होत्या. धर्माचरणातील या अपप्रवृत्ती त्यांना ढळढळीत दिसत होत्या. त्याबरोबरच सामाजिक जीवनातील स्त्रीशिक्षण, बालविवाह, पुनर्विवाह इत्यादी प्रश्नांकडे दुर्लक्ष करणेही त्यांना शक्य नव्हते. ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी मुलींच्या शाळा काढल्या होत्या, आणि त्यांत कनिष्ठ जातींतील मुली शिकू लागल्या होत्या. तेव्हा आपल्या मुली अशिक्षित राहिल्या, तर आपल्या सामाजिक प्रतिष्ठेला धक्का बसेल याची उच्च-वर्णीयांना जाणीव झाली. अस्पृश्यतेच्या प्रश्नालाही या धर्मोपदेशकांनी वाचा फोडली होती. अशा स्थितीत आपल्या धार्मिक व सामाजिक कल्पनांचा फेरविचार केल्या-खेरीज ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या हल्ल्याला आपण यशस्वीपणे तोंड देऊ शकणार नाही अशी आपल्यातील जबाबदार समाजचिंतकांची खात्री झाली. त्यामुळे धर्म-

विषयक विचाराला चालना मिळाली आणि सामाजिक समस्यांचा ऊहापोह होऊ लागला. धर्माचे शुद्ध स्वरूप कोणते ? धर्माचे सिद्धान्त शाश्वत का परिवर्तनशील ? धर्मशास्त्रातील विधिनिषेध त्रिकालाबाधित का कालसापेक्ष ? धर्म आणि नीती यांचा संबंध काय ? कालमानाप्रमाणे आचारविचारांत बदल घडवून आणायचा झाल्यास कोणते निकष प्रमाण मानणे श्रेयस्कर ? सामाजिक सुधारणेतील साध्यसाधनविवेक कसा करायचा ? इत्यादी प्रश्न आपल्यातील नव्या चिंतनशील सुशिक्षितांच्या पुढे उभे राहिले. त्यांची उकल करण्याच्या प्रयत्नांमधून अनेक विचारप्रवाह येथे अस्तित्वात आले.

( १ ) श्रुतिस्मृतिपुराणोक्त हिंदू धर्म आणि समाजव्यवस्था ही ईश्वरनिर्मित आहेत. ती सर्वश्रेष्ठ व अपरिवर्तनीय आहेत. त्यांच्यात बदल करण्याचा विचार हा पाखंडीपणाचा आहे. या आपल्या सनातन वैदिक धर्माचे रक्षण हेच आपले कर्तव्य आहे असे मानणारे आणि त्या दृष्टीने ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या मतांचे खंडन करण्यास उद्युक्त झालेले मोरभट दांडेकर, कृष्णशास्त्री साटे यांचा परंपराभिमानी स्थितिवादी विचारप्रवाह.

( २ ) सामान्यजनांचा बुद्धिभेद होऊ नये म्हणून जुन्या परंपरेवर एकदम आघात न करता प्रमाणभूत शास्त्रवचनांच्या आधारे धिमेपणाने सुधारणा करू पाहणारे बाळशास्त्री जांभेकर व गंगाधरशास्त्री फडके यांचा नेमस्त पण प्रगमनशील विचारप्रवाह.

( ३ ) कोणत्याही एका धर्माचे निरपवाद प्रामाण्य न मानता वेगवेगळ्या धर्मग्रंथांतील सर्वमान्य उदात्त तत्त्वांच्या आधारे धर्मसाधना आणि समाजसुधारणा करणारे दादोबा पांडुरंग आणि रामचंद्र बाळकृष्ण यांचा धर्मनिष्ठ विवेकप्रधान विचारप्रवाह.

( ४ ) परमार्थ आणि सामाजिक व्यवहार यांचे प्रांत अलग समजून ईश्वरभक्तीत भावबुद्धी व सदाचरण यांना प्राधान्य देणारे आणि सामाजिक प्रश्नांचा निर्णय करताना निखळ बुद्धिनिष्ठेची व सामाजिक उपयुक्ततेची दुहेरी कसोटी लावणारे लोकहितवादी यांचा धर्मनिरपेक्ष इहवादी विचारप्रवाह.

एल्फिन्स्टन विद्यालयात शिकलेले काही अज्ञेयवादी तरुण होते. त्यांचा हिंदू धर्मावरचा विश्वास उडाला होता. पण त्यांना ख्रिस्ती धर्मातील दोषही दिसत होते. 'त्यांस इंग्लिशांचा येशू व हिंदूंचा कृष्ण हे दोघेही समान धुतारे'[४] वाटत होते. पुणे कॉलेजातील एक अध्यापक हेन्री ग्रीन हे अज्ञेयवादी होते; आणि इतिहास व अर्थशास्त्र या विषयांचा त्यांचा गाढा व्यासंग होता. या संस्थेतील काही विद्यार्थ्यांच्या मनावर त्यांच्या विचारांची छाप होती. " पुण्याकडील प्रोफेसर ग्रीन यांचे कित्येक शिष्यांनी या सृष्टीचा कर्ता म्हणून कोणी नाही व नीतीसंबंधी नेम हे समाजाच्या

बंदोबस्ताकरिता मात्र पाळिले पाहिजेत इत्यादी विषयांवर आम्हांस एकांती बोध केला होता. " [१] असे परमहंस मंडळीच्या अहमदनगर शाखेच्या एका सभासदाने आपल्या पत्रात नमूद केले आहे. ग्रीनच्या विद्यार्थ्यांत कृष्णशास्त्री चिपळूणकर हे प्रमुख होते. अंतिम सद्‌वस्तूच्या संदर्भात ते अज्ञेयवादी होते, तरी सामाजिक प्रश्नांच्या बाबतीत परंपरानिष्ठ समन्वयशील सुधारकांच्या कार्यालाच त्यांनी पाठिंबा दिला होता. पुण्यामुंबईच्या या विद्यार्थ्यांची संख्या अगदीच थोडी होती. त्यामुळे त्यांची विचारसरणी प्रातिनिधिक होती असे म्हणता येत नाही. तेव्हा वर उल्लेखिलेले चार मतप्रवाहच विशेष महत्त्वाचे व तत्कालीन परिस्थितीच्या संदर्भात विचारात घेण्याजोगे आहेत.

## स्थितिवादी विचारप्रवाह

ख्रिस्ती धर्मोपदेशकांचा मतप्रचार आणि कार्यपद्धती यांकडे अनेक उच्चवर्णीय नवशिक्षित तरुण ओढले जात आहेत हे पाहून सनातनी पक्षाच्या गोटात खळबळ उडाली. आपल्या धर्माच्या रक्षणासाठी पद्धतशीर हालचाल करण्याची निकड त्यांना भासू लागली. विल्सन-निजबिटप्रभृती धर्मोपदेकांना हिंदू शास्त्रीपंडितांशी समोरासमोर सामना करण्याची उत्कंठा होतीच. त्याप्रमाणे प्रथम इ. स. १८३० मध्ये जॉन विल्सन यांच्या निवासस्थानी पंडित लक्ष्मणशास्त्री आणि धर्मांतरित रामचंद्र पुराणिक यांच्यात धर्मसंबंधी वाद झाला. त्यानंतर मोरभट दांडेकर आणि साताऱ्याच्या विद्यालयातील एक शिक्षक नारायणराव यांनी खुद्द विल्सनशीच सविस्तर चर्चा केली. त्यांच्या अनेक बैठकी झाल्या. ह्या वादविवादाचा वृत्तान्त त्या वेळी प्रसिद्ध झाला होता. शिवाय मोरभट व नारायणराव यांनी विल्सन यांच्या आक्षेपांचे खंडन करून हिंदुधर्माची स्थापना करणारी दोन पुस्तके प्रसिद्ध केली होती. या वादाच्या निमित्तानेच जॉन विल्सन यांची दोन्ही हिंदुधर्मप्रसिद्धिकरणे लिहिली गेली होती. मोरभट हे शाक्तपंथी होते. गंगाधरशास्त्री फडके यांनी आपल्या ' हिंदुधर्मतत्त्व ' या ग्रंथात शक्तिपूजकांचा वाममार्ग हा नरकास नेणारा आहे असे प्रतिपादन केले होते. लोकहितवादींनी या पंथावर अत्यंत कडक टीका केली होती. मोरभटाचे लोकांत कितपत वजन असेल कोण जाणे ! मात्र हिंदू धर्माची बाजू घेऊन ख्रिस्ती धर्मोपदेशकांवर प्रहार करण्यास मोरभटच प्रथम पुढे सरसावले हे खरे आहे. शिवाय कृष्णशास्त्री साठे यांनी मुंबईस ठाकुरद्वारात इ. स. १८५२ मध्ये दर रविवारी हिंदुधर्मप्रतिपादक व्याख्याने देण्यास प्रारंभ केला होता. ही व्याख्यानमाला जवळपास वर्षभर चालू होती. त्यांतील मुद्द्यांना उत्तरे देणारी बाबा पदमनजी यांची सुमारे पंचवीस पत्रे ज्ञानोदयात प्रसिद्ध झाली. हा धर्मविषयक वाक्संग्राम दीर्घकाळ चालू

होता. उपदेशचंद्रिका, ज्ञानसिंधू, विचारलहरी, वर्तमानदीपिका, सद्धर्मदीपिका इत्यादी मासिके व वृत्तपत्रेही हिंदू धर्माच्या रक्षणासाठी वादाच्या आखाड्यात उतरली होती. पुण्यात मोरशास्त्री साठे यांच्या प्रेरणेने ‘ कल्याणोन्नायक मंडळी ’ ही संस्था स्थापन झाली होती. मुंबईमध्ये देखील एक ‘ हिंदुधर्मसभा ’ या दृष्टीने कार्य करीत होती. धर्मरक्षणासाठी सुरू झालेल्या या मोहिमेत ब्राह्मणांच्या बरोबरीने प्रभू समाजातील अनेक प्रतिष्ठित लोक आघाडीवर होते. या हिंदुधर्मसभेच्या स्थापनेत वासुदेव नारायण परभु यांनी पुढाकार घेतला होता. “ हिंदुधर्मसभेच्या स्थापनेविषयी आम्हांस एक आश्चर्य वाटते ते हे की, इचा पुढारी परभु आहे. पूर्वी धर्मस्थापक व धर्मरक्षक ब्राह्मण असत; आणि हल्ली असा विपरीतपणा दिसतो.”[१६] हा ज्ञानोदयाचा अभिप्राय लक्षात घेण्याजोगा आहे. खिस्ती धर्मोपदेशकांची हिंदू धर्मावरील टीका ही पुष्कळदा उथळ व अनुदारपणाची असे. तिला उत्तर देताना हिंदू लेखकांनीही खोल तत्त्वचर्चेत न शिरता कोटीला प्रतिकोटी लढविण्याचे व टोल्याला प्रतिटोला देण्याचे तंत्रच प्रायः अवलंबिले होते. त्यांच्या लेखनात विचाराची प्रगल्भता कमी असून पढिकतेचा व अभिनिवेशाचा भागच जास्त होता. त्यामुळे सामाजिक प्रबोधनाच्या व परिवर्तनाच्या दृष्टीने त्याचा काही उपयोग झाला नाही हे उघड आहे.

## शास्त्रप्रामाण्यवादी प्रगमनशील विचारप्रवाह

इंग्रजी शिक्षण घेऊन आधुनिक दृष्टीने विचार करू लागलेल्या पहिल्या पिढीचे प्रतिनिधी बाळशास्त्री जांभेकर हे होत. त्या काळात पश्चिम भारतात तरी त्यांच्या तोडीचा कल्पक व कर्तबगार विद्यावंत दुसरा कोणी नव्हता. इंग्रजी, मराठी व संस्कृत या भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. अनेक जुन्यानव्या शास्त्रांचा त्यांचा गाढा व्यासंग होता. शिक्षण हेच आपल्या आर्थिक, राजकीय व सांस्कृतिक उन्नतीचे हुकमी साधन आहे असा त्यांचा दृढ विश्वास होता. म्हणून ज्ञानसाधना व ज्ञानप्रसार हे अर्थातच त्यांच्या जीवितकार्याचे प्रमुख अंग राहिले. अध्यापन, लेखन, संपादन, पुरातत्त्वसंशोधन इत्यादी क्षेत्रांत त्यांनी प्रवेश केला आणि त्यांवर आपल्या व्यक्तित्वाचा व विद्वत्तेचा ठसा उमटविला. अव्वल दर्जाची बुद्धिमत्ता असूनही काळाची गरज म्हणून शालेय पुस्तके लिहिण्यात त्यांनी कमीपणा मानला नाही. आपल्या जुन्या परंपरागत विद्येची त्यांनी कधी उपेक्षा केली नाही; परंतु नवे नवे ज्ञान व विचार ग्रहण करण्यास ते सदैव उत्सुक असत. भोवतालची परिस्थिती बदलली की, जुन्या कालबाह्य कल्पनांचा त्याग करून नव्या प्रगत कल्पना आत्मसात करणे हे आपले कर्तव्य ठरते असे त्यांनी निःसंदिग्धपणे प्रतिपादिले आहे. हा विचार आपण लोकांपर्यंत नेऊन पोचवला पाहिजे असे त्यांच्या मनाने घेतले. वृत्तपत्रे ही आधुनिक

युगातील लोकमत घडवणारी व संघटित करणारी, त्याला शब्दरूप देऊन त्याचा प्रसार करणारी एक अपूर्व शक्ती आहे. म्हणूनच लोकहितवादींनी मुद्रणस्वातंत्र्याचा महिमा गाताना वृत्तपत्राला 'बृहत्तर जिव्हा' असे संबोधले आहे. बाळशास्त्री जांभेकर हे महाराष्ट्रातील वृत्तपत्रसंस्थेचे जनक होत. त्यांनी 'दर्पण' हे इंग्रजी-मराठी वृत्तपत्र सुरू केले आणि त्यानंतर काही वर्षांनी 'दिग्दर्शन' हे मासिक काढले. ज्ञानप्रसार व सामाजिक प्रबोधन या दोन्ही बाबतींत त्यांनी बंगाली विद्यावंतांचा आदर्श डोळ्यांपुढे ठेवला होता. त्यांच्या विचारसरणीत संकुचितपणाचा लवलेशही नव्हता, तरी देखील स्वधर्मावर त्यांचा पूर्ण विश्वास होता, आणि आपल्या नित्य-नैमित्तिक धर्मपालनात ते कधी खंड पडू देत नसत. सरकारने आपल्या शासन-व्यवहारात आणि शिक्षणव्यवस्थेत धार्मिक तटस्थतेचे धोरण काटेकोरपणे सांभाळले पाहिजे असे त्यांचे मत होते. सरकारी शाळांतून धर्मशिक्षण दिले जात नाही, म्हणून मुले बिघडतात अशी सनातनी हिंदूंची, तशीच ख्रिस्ती धर्मोपदेशकांचीही तक्रार होती. मुंबई शिक्षणमंडळीच्या शिक्षणविषयक धोरणावरील प्रतिकूल टीकेला उत्तर देताना या धोरणातील धर्मनिरपेक्षतेचे तत्त्व कसे न्याय्य व दूरदर्शीपणाचे आहे; उलट सरकार प्रजेच्या धर्मकारणात हस्तक्षेप करू लागल्यास त्यातून किती अनर्थ ओढवतील ते जांभेकरांनी स्पष्टपणे दाखवून दिलेले आहे. धर्मशिक्षण आवश्यक आहे हे त्यांना मान्य होते. परंतु ही जबाबदारी त्या त्या समाजाने पार पाडली पाहिजे असे त्यांचे मत होते.

बाळशास्त्री जांभेकरांनी सामाजिक प्रश्नांच्या बाबतीतही वेळोवेळी लक्ष घातले होते. मात्र त्यांचा दृष्टिकोण शास्त्रप्रामाण्यवादी होता. 'हिंदुधर्मस्थापना' हा ग्रंथ प्रसिद्ध केल्याबद्दल त्यांनी मोरभट दांडेकरांचे अभिनंदन केले होते. परंतु त्यांच्या स्वतःच्या धर्मविचारात मोरभटांप्रमाणे केवळ फड जिंकण्याची प्रवृत्ती नव्हती. त्यांच्या विचारसरणीत अधिक गांभीर्य, विवेकपरता व सावधपण होते. आपले सामाजिक जीवन धर्माधिष्ठित आहे. ही धर्मश्रद्धाच नष्ट झाली, धर्मग्रंथांवरचा लोकांचा विश्वा-सच जर उडाला, तर त्यांच्या वर्तनाला धरबंध राहणार नाही, सामाजिक व्यव-हाराचे नियामक तत्त्वच आपण गमावून बसू अशी त्यांना धास्ती वाटत होती. धर्मशास्त्राच्या आधारेच जितकी सुधारणा करता येईल तितकी करण्याचा त्यांनी निश्चय केला. सामाजिक प्रश्नांत लक्ष घालणारे त्यांचे जे सहकारी होते ते बहुतेक सर्व जुन्या पठडीतील शास्त्रीपंडित होते. शास्त्रवचनांची चिकित्सा न करता सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करणे त्यांना मानवले नसते. शिवाय खुद्द जांभेकरांच्या मना-वरही येथील जुन्या सनातनी परंपरेचे संस्कार होतेच. म्हणून स्त्रीशिक्षण, बालविवाह, पुनर्विवाह यांसारख्या प्रश्नांचा विचार करताना त्यांनी धर्मशास्त्राचे अनुसंधान कधी

सोडले नाही. स्मृतिग्रंथातील एखादे वचनसुद्धा इतर पोथ्यापुराणांतील अनेक ऐसपैस अवतरणांपेक्षा शतपटीने अधिक मोलाचे आहे असे त्यांनी अनेकदा निक्षून सांगितले आहे. मुलीचे लग्न बाराव्या वर्षी किंवा ऋतुप्राप्तीनंतर लगेच करावे. त्यामुळे जसे पुण्य लाभणार नाही, तसे पापही घडणार नाही. हा गौणपक्ष आहे हे तर खरेच; पण त्यातील दोषाचे लहानशा शास्त्रोक्त प्रायश्चित्ताने परिमार्जन होऊ शकेल. मात्र अशा तऱ्हेचा विवाह वधूवरांना खचितच सुखावह व श्रेयस्कर होईल असे मत व्यक्त करून त्याला जांभेकरांनी मनुस्मृतीचा आधार दिला आहे. पुनर्विवाहाला मात्र असा निर्णायक शास्त्राधार त्यांना आढळला नाही म्हणून इतर सर्व बाजूंनी पाहता तो कितीही उचित व समर्थनीय असला, तरी सद्यःस्थितीत तो रूढ होण्याचा संभव फार कमी आहे असे त्यांना वाटत होते. श्रीपत शेषाद्रीच्या शुद्धिप्रकरणातही त्यांनी सुरुवातीपासून शेवटपर्यंत आपली शास्त्रनिष्ठा अबाधित राखली होती. महादेवभट शेंड्ये, गंगाधरशास्त्री फडके, त्रिंबकशास्त्री शाळिग्राम, नारायणशास्त्री थत्ते इत्यादी ज्येष्ठ धर्मशास्त्रज्ञांचा त्यांच्या उपक्रमाला पाठिंबा होता. पुणे, नाशिक, मुंबई येथील अनेक शास्त्रीपंडितांनी त्यांना संमती दिली होती. करवीर मठाच्या शंकराचार्यांचे आज्ञापत्रही त्यांनी आणविले होते, पण पुढे या प्रश्नावर मुंबईत दोन तट पडले. दीड दोन वर्षे हे प्रकरण चालू होते. अखेरीस जेव्हा काशीच्या पंडितांनी विरोधी निर्णय कळविला, तेव्हा बाळशास्त्री जांभेकर आणि त्यांचे सहकारी यांनी धर्मपीठाचा आदेश प्रमाण मानून प्रायश्चित्त घेतले. शासनव्यवहारात त्यांनी धर्मनिरपेक्षतेचा आग्रह धरला होता. परंतु सामाजिक क्षेत्रातील धर्माच्या वर्चस्वाला मात्र त्यांनी मनापासून मान्यता दिली होती. बाळशास्त्री जांभेकरांच्या भूमिकेत असा हा दुलग-पणा दृष्टीस पडतो.

### परमहंस सभा

जांभेकरांच्या सुधारणावादाच्या मर्यादा अगदी स्पष्ट होत्या. लोकांच्या मनावरची धर्मशास्त्राची पकड ज्यामुळे सैल होईल असा मतप्रचार त्यांनी वर्ज्य मानला होता. ही त्यांच्या प्रगमनशीलतेची लक्ष्मणरेषा होती; आणि त्यांनी ती कधी ओलांडली नाही. पण त्या काळातही कित्येक नवशिक्षित तरुण असे होते की, ज्यांचा स्वधर्मावर विश्वास उरला नव्हता. त्यातच पुन्हा ते ख्रिस्तप्रणीत मानवतावादाने प्रभावित झाले होते. त्यांनी वैदिक तत्त्वज्ञानाचा व हिंदू समाजव्यवस्थेचा खोल अभ्यास केला होता अशातला भाग नाही. परंतु आपल्या धर्मजीवनातील दुष्ट रूढींचा, कर्मकांडाचा, विद्वज्जडतेचा आणि माणसामाणसांत वैषम्य व विसंवाद निर्माण करणाऱ्या जाति-भेदाचा त्यांना उबग आला होता. आपल्या धर्मग्रंथांचे पावित्र्य व प्रामाण्य कायम

ठेवून या समाजस्थितीत अर्थपूर्ण बदल घडवून आणता येईल अशी त्यांना आशा वाटत नव्हती, म्हणून त्यांनी एकदम वेगळा मार्ग स्वीकारला; आणि १८५० च्या सुमारास परमहंस सभेची स्थापना केली. दादोबा पांडुरंग यांच्या प्रेरणेनेच ही सभा अस्तित्वात आली, इतकेच नव्हे तर 'धर्मविवेचन' आणि 'पारमहंसिक ब्राह्मधर्म' या दोन पुस्तिका लिहून त्यांनी तिच्यासाठी धर्मतत्त्वविचाराची आधुनिक पद्धतीने मांडणी केली होती. मात्र आपले विचार कृतीत उतरवण्यासाठी आवश्यक असलेले नीतिधैर्य त्यांच्या अंगी नव्हते. त्यामुळे या सभेच्या प्रत्यक्ष कार्यात त्यांनी अधिकृतपणे व उत्साहाने कधीच भाग घेतला नाही. त्यांचे स्नेही रामचंद्र बाळकृष्ण हे या संस्थेचे अध्यक्ष होते. पुणे, सातारा, अहमदनगर, बेळगाव, रत्नागिरी इत्यादी शहरांत तिच्या शाखा निघाल्या होत्या. मात्र "उघडें सांगावें। आहों ब्राह्म आम्ही"[८] अशी मुळात अपेक्षा असतानाही सभेच्या बैठकी गुप्तपणे भरत असत. सभासदांची संख्या बरीच वाढली म्हणजे उघडपणे काम चालू करायचे असा संस्थाचालकांचा बेत होता. त्यापूर्वीच सभासदांची नावे बाहेर फुटली; आणि सभेचे कार्य थंडावले. परंतु धर्मसुधारणेची ही प्रेरणा अजिबात नष्ट झाली नाही. काही थोडे निष्ठावंत लोक आपल्या तत्त्वांना चिकटून राहिले होते; आणि त्यांनीच पुढे सन १८६७ मध्ये प्रार्थनासमाजाची स्थापना केली.

धर्माची पारमार्थिक आणि व्यावहारिक अशी दोन रूपे आहेत. लोक व्यावहारिक धर्मालाच मुख्य धर्म असे समजतात, पण ते खरे नाही. पारमार्थिक धर्म हाच सर्वश्रेष्ठ धर्म होय; आणि तो निर्विकार व शाश्वत असतो. व्यावहारिक धर्मात मात्र स्थलकालानुसार बदल होत राहतो. परमेश्वराला प्रसन्न करून घेण्याचे साधन म्हणजे पारमार्थिक धर्म. परंतु अखिल सृष्टीचा निर्माता व नियंता जो परमेश्वर तो जसा एक आहे, तसा त्याच्या उपासनेचा मार्गही वास्तविक एकच असला पाहिजे; आणि तोच मनुष्यमात्राचा सनातन पारमार्थिक धर्म होय. पण जगात आज अनेक लहानमोठे धर्म आहेत. त्यांपैकी प्रत्येकाचे काही प्रमाणग्रंथ आहेत. हे ग्रंथ ईश्वरदत्त असून त्यांतच संपूर्ण सत्य साठवलेले आहे अशी त्या त्या धर्माच्या अनुयायांची धारणा असते. तसे पाहिले तर वेद, बायबल, कुराण यांसारखे धर्मग्रंथ ह्या 'पौरुष कृती'च आहेत. त्यात सत्याचे शुद्ध व शबल, शाश्वत व सापेक्ष अंश एकमेकात मिसळलेले आहेत. "मनुष्याच्या मनात जे सद्विचार व सद्वासना उत्पन्न होतात, ती मात्र ईश्वरी प्रेरणा होय."[९] तिच्या प्रकाशात निरनिराळ्या धर्मग्रंथांतील उदात्त तत्त्वांचे परिशीलन केले, तर त्यात खचितच एकवाक्यता आढळून येईल. परमेश्वराच्या अस्तित्वाचा मनुष्याला जरी मनोमन प्रत्यय आला, तरी त्याच्या सत्यस्वरूपाचे माणसाच्या स्खलनशील अल्पबुद्धीला साकल्याने ज्ञान होणे शक्य नाही. म्हणून

त्याला अनन्यभावाने शरण जाऊन त्याची प्रार्थना करणे; व्यवहारात सत्याने, न्यायाने व नीतीने वागणे, आपल्या अभागी दीनबांधवांचे दुःख निवारण करणे आणि सर्वांच्या सुखासाठी झटणे हेच ईशभक्तीचे प्राणतत्त्व आहे, आणि ते सर्व धर्मग्रंथांत अनुस्यूत आहे. आचारउपचार हे धर्माचे बाह्यांग. ते केवळ प्रतीकात्मक आहे. पण पुष्कळदा लोक त्यातच गुंतून पडतात. म्हणून त्याचा व्याप शक्य तितका कमी केला पाहिजे. इतकेही करून प्रत्येक धर्मांत जे किमान विधी व बाह्योपचार अत्यावश्यक ठरतील त्यांच्या बाबतीत आपण सहिष्णुता बाळगली पाहिजे, इतकेच नव्हे, तर त्या धर्मभावनेचा आदर राखला पाहिजे.

व्यावहारिक धर्म हा मात्र मूलतःच परिवर्तनशील आहे. आपल्या जुन्या परंपरेतील "मन्वादी ज्या अष्टादश स्मृती, ही केवळ त्या त्या काळाची लोकव्यवहारप्रवर्तक शास्त्रे होत. व यांत जे विधिनिषेध म्हणून सांगितले आहेत, ते त्या त्या काळाच्या लोकव्यवहारावरून सांगितले आहेत. परंतु हा लोकव्यवहार सर्वत्र सर्वदा एकसारिखा चालतो असा अगदी नियम नाही. म्हणून हे व्यावहारिक नियम त्या त्या काळाचे बुद्धिवान, न्यायी, दयाळू असे राजकीय पुरुष जसजसे करितील, त्या त्या प्रमाणे तेथील लोकांनी चालावे व त्यांत जे सर्वांच्या व्यावहारिक सुखास प्रतिकूल असतील, ते त्यांस निवेदन करून त्यांजकडून फिरवून घ्यावे."[१] दादोबांची ही विचारप्रणाली परमहंस सभेने सश्रद्ध मनाने स्वीकारली होती.

सामाजिक जीवनात निरनिराळ्या संस्था उदयास येतात, स्थिरावतात आणि कालांतराने ऱ्हासही पावतात. या संस्थांचा व्यवहारधर्माशी निकटचा संबंध असतो. जातिव्यवस्था ही आपल्या समाजात दृढमूल झालेली एक अग्रगण्य संस्था आहे. ज्ञातिधर्म हाच काय तो आपला मुख्य धर्म अशी आपल्या बहुसंख्य लोकांची प्रामाणिक समजूत आहे. परंतु जातिसंस्था ही ईश्वरकृत तर नाहीच; पण आपले मूळचे धर्मग्रंथ, युक्तिवाद आणि व्यवहार अशा तिन्ही दृष्टींनी पाहिले, तरी ती समर्थनीय ठरत नाही. उलट ही संस्था आजच्या परिस्थितीत सामाजिक प्रगतीच्या आड येणारी भली मोठी धोंड होऊन राहिली आहे. म्हणून ज्ञातिबंधने नष्ट करण्याचा आपण निर्धार केला पाहिजे. त्यासाठी या संस्थेला दैवी अधिष्ठान मिळवून देणारे धर्मशास्त्र झुगारून द्यावे लागेल. तसेच ती टिकवून धरण्यासाठी जिवाचा आटापिटा करणाऱ्या प्रतिगामी लोकांशी झगडावे लागेल यात शंका नाही. पण सामाजिक संस्था कशा निर्माण होतात, त्यांना कुठून बळ मिळते आणि त्या नष्ट करण्यासाठी कोणते उपाय प्रभावी ठरतात याचा शांतपणे तात्त्विक पातळीवर विचार करताना शास्त्र आणि व्यवहार यांचा परस्परसंबंध नीट समजून घेतला पाहिजे. "शास्त्र तर व्यवहारदर्शक आहे. व्यवहार पहिला आणि शास्त्र मागून असा क्रम असतो. तेव्हा

यावरून स्पष्ट असे अनुमान होते की, या प्रकारचे अन्नव्यवहार आणि लग्नव्यवहार यांचा प्रतिबंध करून या देशात निरनिराळ्या जाती झाल्या आहेत. त्यांचे मुख्यत्वे-करून मूळ लोकांचेच अज्ञान आणि दुरभिमान यात किमपि संशय नाही. सुमारे दीड हजार वर्षांपासून या देशात परस्परांचा अन्नादिव्यवहार बंद करून, अभि-मानाने लोक आपापले वर्ग बांधून निरनिराळ्या जाती करू लागले होते. पुढे जे व्यवहारशास्त्रकार झाले, तेही, या अशा बांधलेल्या वर्गातलेच होते, म्हणून या बंधनाचे निराकरण न करिता त्यांच्या मनाचा कल याच्या समर्थनाकडेच जाऊन, त्या त्या काळी उपलब्ध जे वर्ग, ते तसेच राहावे अशा हेतूने वर सांगितल्या सारख्या युक्ती काढून, त्याही शास्त्रात या व्यवहाराचे उपपादन केले, इतकाच त्यांजकडेस दोष. या ज्ञातिनिबंधाचे हे मूळ प्रवर्तविते हा दुष्ट आरोप त्यांजवर अशा दृष्टीने शास्त्रविवेचन केले असता घालिता येत नाही. लोकांचे अज्ञान आणि दुरभिमान हेच या ज्ञाती उत्पन्न होण्यास मुख्य कारण. व्यवहारशास्त्र देखील कारण नाही." [३]

ज्ञातिबंधन व रूढिवाद यांतून मुक्त झालेल्या प्रत्येक मनुष्याला विचार, आचार व उपासना यांचे स्वातंत्र्य असले पाहिजे. जोपर्यंत त्यांच्या वागण्यामुळे दुसऱ्याच्या हक्कावर गदा येत नाही, किंवा कुणाला उपद्रव होत नाही, तोपर्यंत त्याच्यावर कुठलेही दडपण येणे इष्ट नाही. परंतु एखाद्याच्या वर्तनामुळे दुसऱ्याला पीडा होत असेल किंवा त्याचे स्वातंत्र्य धोक्यात येत असेल, तर मात्र अशा कृत्यापासून त्याला सक्तीने परावृत्त केले पाहिजे, या व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वानुसार परमहंस सभेने स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह व पुनर्विवाह या सुधारणांचा पुरस्कार केला होता. आपल्या समाजातील असंख्य लोकांच्या दुरवस्थेचे व दुःखाचे मूळ बहुतांशी त्यांच्या अज्ञानात आहे. तेव्हा शिक्षणाचा प्रसार झाला म्हणजे बरेचसे प्रश्न सुटतील असे या संस्थेतील विचारवंतांचे मत होते. म्हणून यापुढे विद्येची मक्तेदारी नष्ट करून सर्व थरांतील स्त्रीपुरुषांना विद्यामंदिराची द्वारे खुली केली पाहिजेत असा त्यांचा रास्त आग्रह होता. मात्र व्यवहारोपयोगी लौकिक विद्येची जरी आज नितांत आव-श्यकता आहे, तरी तिला पारमार्थिक ज्ञानाची जोड दिल्याखेरीज समाज खऱ्या अर्थाने प्रगत व सुखी होणार नाही. आपला सर्व विचार आणि व्यवहार शाश्वत धर्म आणि चिरंतन नीतिमूल्ये यांना धरून असला पाहिजे. काही तत्त्वचिंतक धर्मनिरपेक्ष नीतीचा सिद्धान्त मांडतात. पण परमहंस सभेचे प्रवक्ते दादोबा पांडुरंग यांना हे मत अर्थातच मान्य नव्हते.

"बाप मानुनीया । भजू एकदेवा । सर्व या मानवां । बंधू मानूं ॥
आमुच्चिया धर्मी । नसे जातभेद । नसे आम्हां खेद । स्पर्शास्पर्शी ॥" [३३]

या दोन सूत्रवचनांत परमहंस सभेचा दृष्टिकोण ग्रथित झाला आहे.

दादोबा पांडुरंग यांच्यासारखे काही मोजके लोक वगळले, तर या संस्थेतील सभासदांच्या धर्मजिज्ञासेत उथळपणाचाच भाग अधिक होता. धर्मतत्त्वाचे खरे स्वरूप जाणून घेण्यासाठी त्यांनी स्वतंत्रपणे चिंतन केलेले नव्हते. शिवाय स्वतःला पटलेले विचार आचरणात आणण्यासाठी लागणारे मनोधैर्य त्यांच्यापाशी नव्हते. त्यामुळे संस्थेच्या कार्यात गुप्तता आली, आणि तिचे कार्यक्षेत्र अगदीच आकुंचित राहिले. अनेक सभासदांचे विल्सनप्रभृती धर्मोपदेशकांशी जवळचे संबंध होते. सभेचा दीक्षाविधीही ख्रिस्ती वळणाचा होता. तेव्हा या मंडळींच्या हेतूविषयी लोकांची मने साशंक बनली असल्यास नवल नाही. अशा कमकुवत मनाच्या आणि अपरिपक्व बुद्धीच्या लोकांकडून धर्मसुधारणेचे कार्य तडीस जाण्याचा यत्किंचितही संभव नव्हता. 'कोणताही धर्म ईश्वरदत्त नाही, व कोणतेही शास्त्र ईश्वरप्रणीत नाही' हे मत कित्येक सभासदांना मान्य नव्हते. त्यांचे खंडन करण्यासाठी बाबा पदमनजींनी 'निःशास्त्र-वादपरीक्षा' हे पुस्तक लिहिले.[१२] परमहंस सभेतील प्रार्थना ही केवळ स्वतःची फसवणूक आहे असा त्यांचा ग्रह झाला. "जोपर्यंत आपणास आपली मते प्रसिद्धपणे अंगीकारून चालण्याचे धैर्य होत नाही व वारंवार लबाडी करण्याचे प्रसंग येतात, तोपर्यंत प्रार्थना करण्यात काही अर्थ नाही."[१३] या भावनेने बाबा पदमनजी, नारायण रघुनाथ, शाहू दाजी, कासम महंमद इत्यादिकांनी परमहंस सभा सोडली, आणि यथावकाश त्यांनी सरळ ख्रिस्ती धर्म स्वीकारला. महाराष्ट्रातील सातआठ शहरांपलीकडे सभेचे कार्य पसरले नाही असे दिसते. उलट लोकांचा रोष ओढवण्याची चिन्हे दिसताच बरेचजण तिच्यातून बाहेर पडले; आणि काही तर दुसऱ्या टोकाला जाऊन "पूर्ववत सोवळेओवळे पाहू लागले खाण्याजेवण्याचा प्रतिबंध ठेवू लागले, व कित्येक पहिल्यापेक्षा अधिक देवदेवतार्चन मांडून गोमुखीत हात घालून जप करू लागले."[१४] डॉ. आत्माराम पांडुरंग, भिकोबा लक्ष्मण, मोरोबा विनोबा यांच्यासारख्या काही व्यक्ती मात्र आपल्या विशुद्ध धर्मभावनेशी एकनिष्ठ राहिल्या. महात्मा फुले यांचाही या संस्थेशी संबंध आला असावा. त्याची चर्चा पुढे येणारच आहे.

## लोकहितवादी

लोकहितवादी हे अव्वल इंग्रजीतील एक स्वतंत्र प्रज्ञेचे समाजचिंतक होते. 'कालाचा प्रवाह पाहून, कालमान ओळखून आपल्या विचारांत आणि आचारांत सुधारणा करा' हे त्यांच्या शतपत्रांतील एकंदर विचाराचे पालुपद आहे. आधुनिक युगातील मूलभूत प्रेरणांची व प्रवृत्तींची त्यांना साकल्याने ओळख पटली होती. सामाजिक जीवनाच्या हरएक क्षेत्रात परिवर्तन होणे यापुढे केवळ इष्टच नव्हे तर

अपरिहार्य आहे. जुन्या विद्या, व्यवसाय, धर्मकल्पना, सामाजिक संस्था, नेतृत्व या सर्व गोष्टी आता कालबाह्य व निकामी झाल्या आहेत. त्यांना त्वरित सोडचिठ्ठी देऊन नव्या गोष्टी डोळसपणे आत्मसात केल्याखेरीज बदललेल्या जमान्यात आपला निभाव लागणार नाही हे त्यांनी वारंवार निक्षून सांगितले आहे. या दृष्टीने त्यांनी आपल्या समग्र सामाजिक जीवनाची परखडपणे चिकित्सा केली. लायब्ररीची स्थापना, छापण्याची कला, नादविद्या, संस्कृत आणि इंग्रजी विद्या, ब्राह्मणांचे महत्त्व, भटांनी लावून दिलेले वेड, शाक्त मार्ग, धर्मसुधारणा, नीतिप्रशंसा, पुनर्विवाह, बालविवाह, वर्णविचार, एकत्र कुटुंबपद्धती, मद्यपान, राज्यसुधारणा, स्वदेशप्रीती, सरकारी कामदार, डौल व नेटिव राजे, हिंदुलोकांचा व्यापार हे त्यांच्या शतपत्रांतील नुसते मथळे पाहिले, तरी त्यांचा दृष्टिकोण कसा सर्वस्पर्शी होता ते ध्यानात येते. त्या काळातील कोणताही महत्त्वाचा सामाजिक प्रश्न त्यांच्या नजरेतून निसटला नाही.

आपल्या सामाजिक प्रश्नांचा विचार करायचा म्हटले की, त्यात धर्माची चर्चा ओघानेच येते. वास्तविक पाहता धर्म म्हणजे केवळ परमार्थसिद्धीचा, ईश्वरप्राप्तीचा मार्ग होय. पण समाजातील बहुसंख्य लोक लौकिक रूढी, विवाहादी संस्कार यांचीही धर्मातच गणना करतात. या गोष्टींचा आत्मनिष्ठ ईश्वरविषयक धर्मभावनेशी अर्था-अर्थी काही संबंध नाही. स्मृतिप्रणीत धर्मशास्त्र ही वस्तुतः सामाजिक व्यवहाराचे नियंत्रण करणारी एक परंपरागत व्यवस्था आहे. पण आपल्या "प्राचीन ग्रंथकारांनी व्यवहाराची व धर्माची पुस्तके वेगळाली लिहिली नाहीत, म्हणून व्यवहाराचा व धर्माचा भेद राहिला नाही." [१५] जुन्या काळी हा भेद न जाणवणे स्वाभाविक असले, तरी आता आपण हा भेद नीट समजून घेण्याची गरज आहे, म्हणूनच लोकहित-वादींनी "संसार आणि परमार्थ ही दोन कामे पृथक आहेत. त्याची मिसळ करू नये." [१६] असे निःसंदिग्धपणे बजावले आहे. मनुष्यमात्राने परमार्थाची चिंता अवश्य वाहिली पाहिजे. परंतु स्नानसंध्येचा बडेजाव, पूजाअर्चेचा डामडौल किंवा क्षुद्र देवताभक्तीतील बाह्योपचार म्हणजे खरा परमार्थ नव्हे. ईश्वर हा सर्वसमर्थ व सर्वांगपरिपूर्ण आहे. त्याला कशाचीही अपेक्षा नाही. या सृष्टीत जे असंख्य पदार्थ त्याने उत्पन्न केले आहेत, ते जीवमात्राच्या पोषणासाठी व उपभोगासाठी आहेत. म्हणून ईश्वराला प्रसन्न करून घेण्यासाठी जर काही अर्पण करायचेच असेल, तर ते गरजू माणसाला द्यावे. कारण परमेश्वराचे व्यक्त स्वरूप जी ही सृष्टी तिच्यातील सर्वश्रेष्ठ प्राणी मनुष्य हाच होय. म्हणून जे अनाथ अपंग असतील त्याना अन्नवस्त्र द्यावे, जे आजारी असतील त्यांच्या औषधोपचाराची सोय करावी. जे धट्टेकट्टे असतील त्यांना व्यवसायाला लावावे, जे अज्ञानी असतील त्यांच्या शिक्षणासाठी मदत करावी, हीच उत्कृष्ट ईश्वरोपासना होय. उलट व्रतवैकल्ये आणि नवससायास यांचे स्तोम

माजवून त्यासाठी द्रव्याचा, श्रमाचा व काळाचा अपव्यय करणे हे परमेश्वराला कदापि मान्य होणार नाही. कारण अशी धर्मकृत्ये ही ईश्वरी योजनेच्या मूळ हेतूशीच विसंगत आहेत. परमात्म्याचे गुणसंकीर्तन करावे, त्याचे भय बाळगून नीतीने चालावे, आणि आपल्या सदसद्विवेकबुद्धीला स्मरून आपले कर्तव्य करीत राहावे याहून दुसरी कोणतीही श्रेष्ठ उपासना नाही.

परमार्थविचारात अंतःशुद्धीला, अंतःप्रेरणेलाच अग्रस्थान दिले पाहिजे असे कितीही कंठरवाने सांगितले, तरी सर्वसामान्यजन बाह्योपचारांना अजिबात फाटा देण्याचा संभव पुष्कळच कमी आहे हे लोकहितवादींना कळत होते. तेव्हा पुण्यप्राप्तीसाठी दानधर्म करायचाच तर औचित्यविवेक आणि पात्रापात्रविचार तरी पाहावा असे त्यांचे म्हणणे होते त्यासाठी अंतःकरणाची शुद्धता आणि सामाजिक उपयुक्तता अशा दुहेरी कसोटीचा त्यांनी आग्रह धरला. “ कार्तिक मासी लोक दीपदान करितात व करंडाफण्यांची वायने देतात. हा धर्म अगदी उलटा आहे. कारण दोन पैशांचे टिवळे, त्यात दमडीचे तूप घालून ब्राह्मणास देतात. त्यापासून जो दान घेतो त्याचा काही उपयोग नाही. आणि निरुपयोगी पदार्थ करण्यात कारीगराचा वेळ मात्र जातो. तसेच भटाचे. करंडेफण्या करतात, यात काय अर्थ आहे ? ते जिन्नस कोणाचेही उपयोगी नाहीत. व्यर्थ पैसा जातो. ” [१७] त्यापेक्षा ज्ञानप्रसारासाठी, छापखाने काढण्यासाठी, व्यापारवृद्धीसाठी, कारखाने उभारण्यासाठी, व्यवहारोपयोगी नवे नवे शोध लावण्यासाठी पैसा खर्च केला, तर ते दातृत्व सत्कारणी लागेल. धर्मप्रवण धनिक लोक हजारो रुपये खर्चून देवळे बांधतात. परंतु “ मातीत पैसा कितीही घातला, तरी त्याचा काही फायदा आहे काय ? माणसे ही जिवंत माती; त्यांस काही सुखाचा उपयोग व्हावा, ते टाकून मातीच्या शोभेत द्रव्य खर्च करून काय उपयोग ? ...हल्ली इंग्रज लोक सर्व जिन्नस विलायतेतून आणतात व इकडील व्यापारी, कोष्टी वगैरे उपाशी मरतात, तर त्या विद्या इकडे आणून लक्षावधी जीवांचे हित करण्याचा उद्योग कोणी केला आहे काय ? नाही. ” [१८] लोकहितवादी यांचे हे विचार त्यांच्या मानवतावादी दृष्टिकोणातून स्फुरलेले आहेत. पण सर्वसामान्य लोकांना ते सहजासहजी मानवणार नाहीत. पंडित, पुराणिक, पुरोहित यांनी लोकांच्या मनात भलभलत्या वेडेपणाच्या कल्पना भरवून दिलेल्या आहेत, आणि त्यांच्या या धर्मभोळेपणावर पुरोहितांची उपजीविका अवलंबून आहे. तेव्हा आपला वृत्तिच्छेद होईल या भीतीने ते कोणत्याही रूढिबाह्य नव्या उपक्रमाला विरोध करणारच, हे लोकहितवादी जाणून होते. या वर्गाच्या स्वार्थीपणावर त्यांनी कठोरपणे प्रहार केले आहेत. परंतु कित्येकदा त्यांची माणुसकीची भावनाच त्यांच्या विचारांतील जहालपणावर मात करून प्रत्यक्ष व्यवहाराच्या संदर्भात त्यांना नेमस्तपणा स्वीकारण्यास भाग पाडत

असे. पुरोहितशाहीला त्यांचा कडवा विरोध होता. पण जे भट वृद्ध झालेले आहेत, ज्यांना दुसरा व्यवसाय करणे शक्य नाही, त्यांना एकदम निराश्रित करून त्यांचे अन्न तोडू नये. त्यांचा आधार हळूहळू काढून घ्यावा. मात्र त्यांचे अज्ञान लोकांच्या निदर्शनास आणून द्यावे, भटाची उत्पत्ती मोडावी, नवा भिक्षुकवर्ग तयार होणार नाही याची खबरदारी घ्यावी असा त्यांच्या मतप्रतिपादनाचा रोख आहे.

सामाजिक प्रश्नांकडे पाहण्याची लोकहितवादींची दृष्टी ही बहुतांशी धर्मनिरपेक्ष होती. धर्मशास्त्राविषयी शतपत्रांत जागोजाग जे विवेचन केले आहे, त्यावरून याची साक्ष पटते. लोकांचा नित्यनैमित्तिक व्यवहार निर्वेधपणे चालू राहावा, सर्वांना सुरक्षितता व सुखस्वास्थ्य लाभावे, यासाठी समाजातील प्रतिष्ठित चिंतनशील विद्यावंतांनी त्या त्या काळी जे नियम घालून दिले, त्यांनाच शास्त्र अशी संज्ञा दिलेली आहे. आपल्या परंपरेत या शास्त्राचा धर्माशी अतूट संबंध जोडण्यात आला होता. परंतु या धर्मशास्त्राचे प्रयोजन आणि सत्यस्वरूप विचारात घेतले, तर तो केवळ कायदा आहे; त्याचा पारमार्थिक धर्माशी तत्त्वतः काही संबंध नाही हे सहज ध्यानात येईल. ईश्वरविषयक धर्म हा त्रिकालाबाधित आहे; त्याची तत्त्वे सर्वकाळ सर्वांना सारखीच लागू पडण्याजोगी असतात. परंतु आचार आणि व्यवहार यांत मात्र परिस्थितीप्रमाणे कमीजास्त बदल झाल्याखेरीज राहात नाही म्हणून "कालेकरून ( धर्म ) शास्त्रास चालन पाहिजे." "युगपरत्वेकरून शास्त्रही फिरले असे समजले पाहिजे."[१९] अशा तऱ्हेचे विचार लोकहितवादींनी निःशंकपणे प्रदर्शित केले आहेत. जुन्या धर्मग्रंथांवर टीका करताना त्यांनी इतिहासक्रमाकडे दुर्लक्ष केले नाही. प्राचीन ऋषींनी हे जे ग्रंथ लिहिले, ते त्या वेळच्या परिस्थितीला धरून सामाजिक हितबुद्धीनेच लिहिले आहेत. त्यांच्या ज्ञानाला त्या काळच्या मर्यादा होत्या. वर्णवर्चस्वाच्या भावनेचाही त्यांच्या मनावर प्रभाव पडला असेल. पण तो काळ आता राहिलेला नाही. आपल्या जाणिवांत आणि जीवनक्रमातही आमूलाग्र बदल झालेला आहे. जुन्या काळातील तत्त्वचिंतकांना ज्यांची कल्पनाही नसेल, असे अनेक लहानमोठे प्रश्न आता निर्माण झालेले आहेत. त्यांचा आपण स्वतंत्रबुद्धीनेच उलगडा केला पाहिजे. शेकडो वर्षांपूर्वीचे ग्रंथ आज आपल्या उपयोगाचे नाहीत. पापपुण्य, कार्याकार्य, नीति-अनीती यांचा निर्णय करण्यासाठी ईश्वराने आपल्याला विचारशक्ती दिलेली आहे. चांगल्याची ओढ आणि वाइटाबद्दल तिरस्कार ही मानवी मनाची स्वाभाविक प्रवृत्ती आहे. तेव्हा "मन हेच मोठे शास्त्र आहे व लिहिलेली शास्त्रे सर्व याचे खाली आहेत." "मनूचे वचन असो, याज्ञवल्क्याचे असो, कोणाचेही असो, ब्रह्मदेवाचे का असेना; 'बुद्धिरेव बलीयसी' असे आहे. त्यापेक्षा तुम्ही जे उघड पाहता त्याचा बंदोबस्त शास्त्रात नाही म्हणून करीत नाही हे योग्य नाही. शास्त्रास येकीकडे ठेवा, आपुली बुद्धी चालवा, विचार

करून पाहा. घातक वचनावर हरताळ लावा" [२०] अशी लोकहितवादींची निखळ बुद्धिनिष्ठ विचारसरणी होती.

स्त्रीशिक्षण, बालविवाह, पुनर्विवाह इत्यादी प्रश्नांवर लोकहितवादींनी विशेष भर दिला आहे, आणि हे प्रश्न त्या काळी उच्चवर्णियांनाच नडत होते हे उघड आहे. परंतु या प्रश्नांची चर्चा करताना लोकहितवादींनी व्यक्तिस्वातंत्र्य आणि सामाजिक समता या तत्त्वांचा सातत्याने पुरस्कार केला आहे. ही दोन्ही तत्त्वे समाजाच्या सर्व थरांतील लोकांच्या प्रगतीला पोषकच होती. स्त्रिया आणि पुरुष स्वभावाने व बुद्धीने सारखेच आहेत. तेव्हा विद्या, विवाह, संसार आणि धर्मसाधना या सर्व बाबतींत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने अधिकार मिळाले पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. स्त्रीदास्यविमोचनावरच तत्कालीन पांढरपेशा वर्गाची सामाजिक सुधारणेची चळवळ केंद्रित झाली होती. म्हणून लोकहितवादींनी या विषयाचे तपशीलवार विवेचन केले. पण जेव्हा त्यांनी कनिष्ठ जातींतील लोकांच्या स्थितीसंबंधी काही लिहिले, तेव्हा त्यांनी प्रत्येक वेळी समतेचे तत्त्वच उचलून धरले आहे. आणि बहुजनसमाजाच्या अज्ञानाला, रूढिप्रियतेला आणि दैन्यावस्थेला वरिष्ठ वर्ग कसा जबाबदार आहे ते कुणाची भीडमुर्वत न ठेवता त्यांनी सडेतोडपणाने दाखवून दिले आहे. "ईश्वराने सर्व मनुष्ये सारखी निर्माण केली आहेत. तेव्हा ईश्वरकृपेने किंवा काळगतीने जे थोरपणास चढतील, त्यांनी आपल्याहून जे नीच त्यांस सन्मार्गास लावण्याचा प्रयत्न करावा, हाच सद्धर्म आहे. परंतु ब्राह्मणांचे समजुतीस हे विरुद्ध आहे......वास्तविक पाहिले तर कैकाडी लोक हे सुधारल्याच्या अंगी ब्राह्मणांसारखे शाहाणे होतील हे खचित आहे." [२१] तेव्हा ब्राह्मणांनी वर्णश्रेष्ठत्वाचा टेंभा मिरवण्यात काय हशील? ज्ञानोपासना, राज्यकारभार व सेनाविभाग यांतील अधिकारपदे आणि उद्योगधंदे व व्यापार ही त्रैवर्णिकांची कार्यक्षेत्रे बहुतांशी इंग्रजांनी हस्तगत केली आहेत. सरकारी आणि खाजगी नोकऱ्या व शेतीव्यवसाय ही शूद्रवर्णाची कामेच काय ती आता आपल्या वाट्याला आली आहेत. म्हणून वरिष्ठ जातींतील लोकांनी जन्मसिद्ध विशेषाधिकाराच्या कल्पना सोडून द्याव्या; आधुनिक युगाशी सुसंगत अशा समतेच्या तत्त्वाचा मनापासून स्वीकार करावा असे लोकहितवादींनी वारंवार आवर्जून सांगितले आहे. तसेच काही पुढारलेल्या जातींतील सुशिक्षित लोक ब्राह्मणी आचारविचारांचा अंगीकार करून सामाजिक प्रतिष्ठा मिळवण्यासाठी धडपडतात. पण हा न्यूनगंड त्यांनी टाकून द्यावा. हल्लीचे ब्राह्मण आणि इतर जातींचे लोक यांचे चारित्र्य व गुणावगुण यांत वस्तुतः काहीच फरक दिसून येत नाही. तेव्हा "आपण सर्व मिळोन एक होण्याचा यत्न केला तर बरे होईल" [२२] असा एकात्मतेचा सूर लोकहितवादींनी आपल्या शतपत्रांत सतत आळवला आहे.

धार्मिक व सामाजिक प्रश्नांप्रमाणेच लोकहितवादींनी राजकीय व आर्थिक प्रश्नांचीही दखल घेतली होती. त्यांची विचारप्रणाली इंग्रजधार्जिणेपणाची होती असा आक्षेप नेहमी घेतला जातो; पण त्यात काही तथ्य नाही. जगात जे काही घडते ते ईश्वरी सत्तेने आपल्या भल्यासाठी घडते, तेव्हा हिंदुस्थानातील इंग्रजी राज्याची स्थापना हा ईश्वरी योजनेचा एक भाग आहे अशी त्यांची धारणा होती. इंग्रजांची शासनपद्धती ही आपल्या देशातील आधीच्या शासनपद्धतीपेक्षा खचितच अधिक प्रगत व सुनियंत्रित होती, तेव्हा या राजवटीत आपल्या समाजाचे आधुनिकीकरण होऊन स्वतंत्रपणे राज्यकारभार करण्याची योग्यता आपल्याला यथावकाश प्राप्त करून घेता येईल असा त्यांना विश्वास वाटत होता. परंतु इंग्रजांच्या राज्यकारभारातील दोषांकडे त्यांनी कधी डोळेझाक केली नाही. इंग्रज अधिकारी माहितगार नसतात. प्रत्येक प्रकरणाचा तपशील स्वतः जाणून घेण्याचा ते प्रयत्न करीत नाहीत. त्यामुळे त्यांच्या हातून अनेक चुका होतात. त्यांच्या या बेजबाबदारपणावर लोकहितवादींनी परखडपणे टीका केली आहे. शिवाय हे राज्य परकीयांचे आहे हे शल्य त्यांच्या मनात सदैव सलत होते. कित्येक हिंदू लोक राज्य करणे व मर्दुमकी गाजवणे हे आपले कामच नव्हे असे मानू लागले होते. परंतु मुसलमान आणि इंग्रज येथे येण्यापूर्वी जे अनेक पराक्रमी राजे होऊन गेले ते हिंदूच होते. “ सर्व हिंदू लोक निर्बळ व अपौरुष आहेत की काय ? परंतु ही गोष्ट विसरले आणि सोवळे घरात आले. देश सोवळा राखावयाचा विसरले. आणि जो तो आपला स्वार्थ पाहू लागला. ”[२३] या उद्गारांचा आशय अगदी स्पष्ट आहे. “ जर इंग्रेज पहिल्याने आले, तेव्हा हिंदू लोक सावध असते आणि समजते की, हे लोक आज थोडे दिसतात. उदमाकरिता आले आहेत. परंतु यांचे पाठीमागे पेडे फार लांब आहे. यास फार जपले पाहिजे. व यांस फौज वगैरे ठेवू देऊ नये; कारण की हे उद्या राज्य बळकावतील असा जर आमचे वडील, आजे, पणजे यांनी उद्याचा विचार पाहिला असता तर आज हे लोक इंग्रजांचे अमलात दीनवाणे का फिरते ? ”[२४] आपल्या लोकांच्या इंग्रजधार्जिणेपणाविषयी लोकहितवादींना किती खत वाटत होती ! इंग्रज लोक इकडे आले म्हणजे स्वर्गातून इंद्र खाली उतरल्यासारखे आपल्या लोकांना वाटते; आणि त्यांच्याशी ते भिऊन वागतात. आपसात जरी हे प्राणपणाने भांडतात, तरी परक्यांच्या लाथा खाऊनही त्यांचा अनुनय करण्यात धन्यता मानतात. हा न्यूनगंड, ही लाचारी यांचा लोकहितवादींनी स्पष्टपणे निषेध केला आहे युरोपातील लोक देशहित पाहणे हा आपला धर्म मानतात. आपणही अहोरात्र देशहिताची चिंता वाहिली पाहिजे. शासनापेक्षा प्रजेचे अधिकार अधिक असावेत; म्हणजे रयतेच्या हिताचे जे कायदे आहेत, त्याची नीट अंमलबजावणी होण्यासाठी लोकांना सरकारशी भांडता येईल.

लोकसत्ताक शासनपद्धती ही सर्वोत्तम पद्धती आहे. जे सरकार लोकांवर जुलूम करते त्याच्याविरुद्ध लोक बंड करून उठतात, हे त्यांचे कृत्य स्वाभाविक आणि न्यायाला धरून आहे. अशा तऱ्हेचे देशभक्तीचे व लोकाभिमुखतेचे विचार त्यांनी जागोजाग प्रगट केले आहेत. त्यामुळे त्यांच्या ' लोकहितवादी ' या नावाची सार्थता पटते.

इंग्रज राज्यकर्ते परकीय आहेत; आणि त्यांच्या अमदानीत आपल्यातील कर्तबगार लोकांना मोठमोठ्या जबाबदारीच्या जागा मिळत नाहीत हे तर खरेच. पण त्यासाठी त्यांना येथून निघून जा म्हणण्याची किंवा त्यांना सक्तीने घालवून देण्याची आज तरी आपल्या अंगी ताकद नाही. शिवाय लोकसत्ताक राज्यपद्धती व्यवस्थितपणे राबवण्याची पात्रताही अजून आपल्यात आलेली नाही. मात्र ही पात्रता जसजशी संधी मिळेल तसतशी प्रत्यक्ष अनुभवातूनच हळूहळू येणार हे उघड आहे. म्हणून सध्या देखील अगदीच स्वस्थ बसून चालणार नाही. सन १८५४ मध्ये विलायतेत कंपनी सरकारच्या सनदेचा फेरविचार होणार आहे त्यापूर्वी गरीब व श्रीमंत या सर्वांनी एकत्र येऊन इंग्लंडच्या राणीसाहेबांकडे अर्ज करावा. " हल्ली राज्यपद्धत आहे, तीपासून आमचा फायदा नाही व आमचे राज्यसंबंधी हक्क चालत नाहीत. व हिंदू लोक जसे तसेच इंग्रज लोक मनुष्ये आहेत. याजकरिता इनसाफ बरोबर होण्याकरिता सर्व इंग्रज व नेटीव लोक यांमध्ये सांप्रत मोठा भेद आहे, तो मोडून एकसारखे होण्याकरिता हिंदुस्थानचे देशात पार्लमेंट ठेवावे. "[२५] अशी मागणी करावी. या सभेत सर्व जातींचे व प्रदेशांचे प्रतिनिधी असावेत. हे प्रतिनिधी शिरस्तेदार, मुनसफ, मामलेदार यांच्यासारखे सरकारी अंमलदार नसून राज्यसत्तेचे ' हिस्सेदार ' आहेत. म्हणून त्यांची निवड करताना गरीब व मातबर, कनिष्ठ व वरिष्ठ जातीचे लोक समान मानावेत " शहाणपण असेल व लोकांचे हाती राज्य असेल, स्वदेशीय अंमलदार असतील आणि त्यांजकडून जशी इंग्रजांकडून इकडे निष्पक्षपाताने वर्तणूक होते अशी होईल तर इंग्रजांचे राज्याहून शंभरपट सुख होईल; आणि मग रामराज्यही मागे सरेल यात संशय नाही. "[२६] लोकहितवादींचे हे विचार पाहिले, म्हणजे त्यांना स्वातंत्र्यवादाची जाण नव्हती किंवा स्वकीय आणि परकीय राज्यांतील गुणात्मक फरक त्यांना कळत नव्हता ही समजूत कशी निराधार आहे आणि त्यांचा राजकीय दृष्टिकोणही किती पायाशुद्ध व प्रगमनशील होता ते लक्षात येते.

लोकहितवादींचे आर्थिक विचारदेखील त्यांच्या सर्वंकष मर्मग्राही दृष्टीचे द्योतक आहेत. ज्ञान, संपत्ती व श्रम यांचा विनियोग देशाच्या उत्कर्षासाठी आणि निरनिराळ्या थरांतील लोकांना स्वस्थता, सुख व समाधान लाभावे यासाठी झाला पाहिजे यावर प्रामुख्याने त्यांचा कटाक्ष होता. आपले राज्यकर्ते इंग्रज असल्याने शेकडो इंग्रज अंमलदार, सैनिक आणि उदमी सावकार इकडे येतात. आपल्या

देशातील द्रव्यार्जनाचे अनेकविध व्यवसाय त्यांनी काबीज केले आहेत. अर्थातच आपल्या येथील संपत्तीचा बराच मोठा वाटा ते इंग्लंडमध्ये घेऊन जातात. त्यामुळे खेड्यापाड्यांतील कितीतरी कष्टकऱ्यांना उपासमार सहन करावी लागते. या आर्थिक शोषणाकडे लोकहितवादींनी आपल्यातील जाणत्या लोकांचे लक्ष वेधले आहे. या गरिबांची उपासमार थांबावयाची असेल, तर बदललेल्या परिस्थितीचा संदर्भ ध्यानात घेऊन आपल्या ज्ञानाचा व द्रव्याचा यथोचित उपयोग करण्यास आपण शिकले पाहिजे. जगातील व्यवहारोपयोगी विद्या संपादन करण्यासाठी, तिच्यात शोधपूर्वक नवी भर घालण्यासाठी आणि तिचा सर्वत्र प्रसार करण्यासाठी आपण पैसा व शक्ती खर्च केली पाहिजे. त्याचप्रमाणे आळशी व ऐतखाऊ लोकांना हजारो रुपयांचा दानधर्म करण्याऐवजी तो पैसा लहानमोठे कारखाने उभारण्यात गुंतवला, तर त्यामुळे द्रव्यवृद्धी तर होईलच; पण शेकडो गरजू लोकांना रोजगार मिळेल. इंग्लंडची औद्योगिक प्रगती पुष्कळच झालेली आहे. म्हणून त्यांनी उत्पादन केलेल्या मालाशी आपण स्पर्धा करू शकणार नाही. पण येथेच आपल्या देशप्रेमाची खरी कसोटी आहे. "लोकांनी एकत्र होऊन जर असा कट केला की, आपले देशात दुसरे मुलखाचा जिन्नस आला तरी घ्यावयाचा नाही. आपले देशात पिकेल तेवढाच माल घ्यावा, आपले लोक कापडे जाडी वाईट करतात, परंतु तीच नेसावी. इकडे छत्र्या करितात, त्याच घ्याव्या. म्हणजे या लोकांत व्यापार राहून इकडे सुख होईल."[२८] अशा प्रकारे त्यांनी देशी कारखानदारीचा व स्वदेशीच्या तत्त्वाचा पाठपुरावा केला आहे.

परदेशातील लोकांकडून भारतीयांचे जे आर्थिक शोषण होते, त्याचे दिग्दर्शन लोकहितवादींनी केले. पण तेवढेच करून ते थांबले नाहीत. तर देशातल्या देशात होणाऱ्या शोषणावरही त्यांनी अचूक बोट ठेवले. संपत्तीचे उगमस्थान मानवी श्रम हे आहे असे त्यांनी आवर्जून सांगितले. "भिकारी आणि श्रीमंत यांचे शरीरामध्ये किंवा बुद्धीमध्ये काही फरक नसतो. इतकेच की काळेकरून एकाने दुसऱ्याचे हरण करून फार माल जमविला असतो. दुसऱ्याचा तो हरण जहाला म्हणून तो भिकारी असतो. ईश्वराने पृथ्वीवर पदार्थ निर्माण केले, हे सर्वांस सारखे पोचावे हा त्याचा हेतू होय. परंतु मनुष्यामध्ये जितके शहाणपण तितकाच मूर्खपणा आणि अज्ञान आहे. याजमुळे पन्नास लोकांस लुटून येक श्रीमंत होतो. पन्नास कुळंबी गावातील नांगर धरून मेहनत करतात आणि एक जहागिरदार किंवा इनामदार त्यांस कोंडा ठेवून त्यांचे दाणे घेतो आणि आपण रेशीमकाठी धोतरे नेसतो, व कामकाज काही एक करीत नाही."[२९] राजा सर्वसत्ताधीश झाला, तरी आपल्या खजिन्यातील पैशाची उधळपट्टी करण्याचा त्याला मुळीच हक्क नाही. कारण "राजाने किंवा

त्याचे पिता अगर प्रपितामहाने द्रव्य आणिले नसते. जे राजाजवळ द्रव्य, ते रयतेपासून सर्व घेतलेले असते याजकरिता त्या द्रव्याचा उपयोग असे दांडगाईने न करावा. परंतु हे मर्म राजे विसरतात आणि विद्वानही विसरतात." [२९] द्रव्यसंचयाचे आणि आर्थिक विषमतेचे लोकहितवादींनी केलेले विश्लेषण हे असे आहे. त्यातून त्यांच्या निर्लेप व मूलग्राही विचारशक्तीचा प्रत्यय येतो. मात्र आर्थिक प्रश्नांच्या बाबतीत लोकहितवादींनीही अखेर समन्वयाचीच कास धरली आहे. गोरगरिबांच्या अडचणी दूर करण्यासाठी ते श्रीमंतांच्या माणुसकीला, दयाबुद्धीला आणि दातृत्वाला आवाहन करतात.

लोकहितवादींनी पुढील काळात विपुल लेखन केले आहे. पण त्यांच्या शतपत्रांचे स्वरूप मुळातच त्याहून अगदी भिन्न आहे. या पत्रांतून त्यांनी आधुनिक युगातील प्रेरक शक्तींचा समग्रतेने वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे महाराष्ट्रातील सामाजिक प्रबोधनाच्या इतिहासात शतपत्रांना एक आगळेच महत्त्व प्राप्त झालेले आहे. पांढरपेशा सुशिक्षित तरुणांना जुन्या परंपरेच्या पाशांतून मुक्त करण्याची आणि नव्या परिस्थितीला खुल्या दिलाने सामोरे जाण्यास उद्युक्त करण्याची लोकहितवादींना उत्कंठा होती. परंतु अव्वल इंग्रजीत जनमनावर जुन्या जमान्यातील प्रतिष्ठित वर्गाची खूपच छाप होती. त्यांत मुख्यतः पंडित व पुरोहित, संस्थानिक व जहागिरदार आणि सरकारी कामदार यांचा समावेश होता. यांपैकी पहिल्या व तिसऱ्या वर्गातील बहुसंख्य लोक ब्राह्मण व तत्सम जातींचे होते. दुसऱ्या वर्गात अन्य जातींचे लोक असले, तरी महाराष्ट्राच्या एकंदर सांस्कृतिक जीवनात ब्राह्मणवर्गाचे वर्चस्व होते. ही वस्तुस्थिती डोळ्यांसमोर ठेवून शतपत्रांचा अन्वयार्थ लावला पाहिजे. "मी आपले पत्रांत ब्राह्मण जातीवर पुष्कळ हल्ला केला आहे. याजकरिता कितीएक ब्राह्मणांस वाईट वाटत असेल. त्यास मी त्यांची क्षमा मागून विनंती करितो की ब्राह्मणांचे दोषविवेचन मी फार केले आहे. याचे कारण आमचे लोकांत मुख्य ब्राह्मण. ते जे करतील तसे इतर वर्ततात. गाव-खेड्यात देखील जो कुळकरणी त्याचे पाया पडतात. म्हणून ब्राह्मणांचे सुधारणुकेस्तव मी झटतो. त्यांची सुधारणा झाली, म्हणजे सर्व हिंदू लोकांची जाहाली."[३०] लोकहितवादींच्या या उद्‌गारांवरून त्यांचे हे लेखन त्यांनी कुणाला उद्देशून केले ते स्पष्ट होते. ब्राह्मणवर्गातही जे वृद्ध आहेत, ज्यांच्या मनाची घडण पूर्वसंस्कारांनी अगदी पक्की बनून गेली आहे, त्यांच्यावर आपल्या विचारांचा परिणाम होणार नाही हे ते जाणून होते. त्यांची सारी भिस्त पंचवीस वर्षांखालील संस्कारक्षम उच्चवर्णीय सुशिक्षितांवर होती. आपल्या प्राचीन परंपरेने उच्चवर्णियांना मोठी प्रतिष्ठा व काही विशेषाधिकार बहाल केले होते. तेव्हा उच्चवर्णीय तरुणही हा पारंपरिक वारसा सुखासुखी आपण होऊन सोडून देण्यास

कसे तयार होणार? साहजिकच धर्मग्रंथांचा आधार घेऊन लहानसहान सुधारणा अंमलात आणण्यापलीकडे त्यांचीसुद्धा मजल गेली नाही. ज्यांच्यासाठी लोकहितवादी लिहीत होते त्यांची दृष्टी संकुचित स्वार्थाने अंध झाली होती. ज्या वर्गांना त्यांचे विचार स्वागतार्ह वाटले असते, ते त्या वेळी जागृत झालेले नव्हते. अर्थातच लोकहितवादींचा आवाज त्यांच्यापर्यंत जाऊन पोहोचला नाही. त्यामुळे त्यांच्या विचारांचा आशय त्या काळात कुणालाच उमगला नाही. मात्र तत्कालीन परंपरावाद्यांच्या स्वयंतुष्टतेला जोरदार धक्का देण्याचे कार्य या शतपत्रांनी खचितच साधले. त्यानंतर सुमारे ऐंशी वर्षांनी दलितांची चळवळ उभी करणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसारख्या राष्ट्रीय नेत्याला या पत्रांचे आपल्या 'बहिष्कृत भारता'त पुनर्मुद्रण करावेसे वाटले, हे त्यातील मूलगामी विचारांच्या कसदारपणाचे गमकच होय.

जोतीरावांनी आपले शिक्षण संपवून इ. स. १८४८ मध्ये सार्वजनिक जीवनात प्रवेश केला. त्यानंतर दोनतीन वर्षांतच त्यांचे शैक्षणिक व सामाजिक कार्य सलगपणे व सुव्यवस्थित रीतीने चालू झाले. त्या सुमारास महाराष्ट्रात अनेक धार्मिक व सामाजिक प्रश्नांच्या अनुषंगाने प्रबोधनाच्या चळवळीस नुकताच प्रारंभ झाला होता. या प्रबोधनाचे स्वरूप हे असे होते.

**संदर्भ व टीपा :**


१ भगवद्गीता, १०–३२
२ मवाळकर–आत्मवृत्त, पृ. ५०
३ अरुणोदय, पृ. ७१
४ दादोबा पांडुरंग, पृ. २३७
५ अरुणोदय, पृ. २०१
६ दादोबा पांडुरंग, पृ. २६५
७ पारमहंसिक ब्राह्मधर्म, २०
८ परमहंस सभा, पृ. ८२
९ परमहंस सभा, पृ. ८७–८८
१० परमहंस सभा, पृ. १११–१२
११ पारमहंसिक ब्राह्मधर्म, ६
१२ अरुणोदय, पृ. १०६
१३ अरुणोदय, पृ. २०२

१४ मुंबईंचे वर्णन, पृ. ३४५
१५ लोकहितवादी–निबंधसंग्रह, पृ. २२१
१६ निबंधसंग्रह, पृ. ६१
१७ निबंधसंग्रह, पृ. १०८–९
१८ निबंधसंग्रह, पृ.८९–९०
१९ निबंधसंग्रह, पृ. १६१, ४४
२० निबंधसंग्रह, पृ. १३४, १७४
२१ निबंधसंग्रह, पृ. ९७
२२ निबंधसंग्रह, पृ. १६४
२३ निबंधसंग्रह, पृ. ११६
२४ निबंधसंग्रह, पृ. १३२
२५ निबंधसंग्रह, पृ. ५९
२६ निबंधसंग्रह, पृ. १९६
२७ निबंधसंग्रह, पृ. १४३–४४
२८ निबंधसंग्रह, पृ. ११९–२०
२९ निबंधसंग्रह, पृ. १२८
३० निबंधसंग्रह, पृ. १६३

# ३



# व्यक्तित्वाची घडण आणि कार्य

महात्मा फुले यांनी आपले व्यक्तित्व स्वयंप्रेरणेने व आपल्या स्वतःच्या प्रयत्नांनी घडवले होते. त्यांचा पिंड हा कृतिशील क्रांतिकारकाचा होता. आपल्या कार्य-सिद्धीला पोषक अशी निरनिराळ्या विषयांवरची अनेक लहानमोठी पुस्तके त्यांनी वाचली असतील. त्यांच्या विचारांना परिपक्वता येण्यास त्यांचा निश्चितच उपयोग झाला असेल. परंतु ग्रंथपांडित्यावर जोतीरावांचा मुख्य भर नव्हता. उलट सामाजिक जीवनातील भल्याबुऱ्या प्रवृत्तींचा अन्वयार्थ लावण्याच्या बाबतीत ते बहुतांशी स्वतःच्या प्रत्यक्ष अनुभवावरच विसंबून राहात. त्यांचा स्वभाव जात्याच चिंतनशील होता. प्रत्येक प्रश्नाच्या मुळाशी जाऊन त्याची उकल करण्याची त्यांची प्रवृत्ती होती. त्या काळातील अनेक सामाजिक चळवळींशी आणि विचारप्रवाहांशी त्यांचा कुठे ना कुठे संबंध आला होता. त्यांच्यातील ग्राह्यांश पारखून घेताना त्यांनी त्यांच्या मर्यादाही बरोबर जोखल्या होत्या. त्यांचे व्यक्तित्व प्रयोगप्रवण व विकसनशील होते. म्हणून एखाद्या विशिष्ट संप्रदायाचा पाईक न बनता त्यांनी आपला मार्ग आपणच शोधून काढण्याची उमेद बाळगली. महाराष्ट्रातील शूद्रातिशूद्रांच्या उन्नतीकरिता ते रात्रंदिवस झटत होते. त्यासाठी त्यांनी वेगवेगळे उपक्रम हाती घेतले. ते पार पाडताना जे बरेवाईट अनुभव आले त्यांतून त्यांना एक नवी दृष्टी मिळाली. या सम्यक दृष्टीमुळे येथील सामाजिक वास्तवाचे त्यांचे आकलन स्वतंत्र व सर्वस्पर्शी ठरले. मूलगामी समाजपरिवर्तनाशिवाय आपल्या देशातील कष्टकरी जनतेचे प्रश्न सुटणार नाहीत हे त्यांना उमगले होते. त्यातूनच त्यांना आपल्या जीवितकार्याची मनोमन ओळख पटली; अचूक दिशा गवसली. त्या दिशेने त्यांची पुढील वाटचाल सुरू झाली. जोतीरावांच्या आयुष्यात त्यांच्या तत्त्वनिष्ठेची कसोटी पाहणारे असे जे

अनेक प्रसंग आले, त्यांत ते जरासुद्धा उणे पडले नाहीत. उलट त्यांतून वेळोवेळी त्यांचे व्यक्तित्व उजळून निघाले. आपले विचार कृतीत उतरवताना जोतीरावांनी ऐन वेळी कधी कच खाल्ली नाही. तत्त्व आणि व्यवहार, संकल्प आणि साधना यांच्या एकात्मतेतच फुले यांचे मोठेपण सामावले आहे. म्हणून "समजले आणि वर्तले। तेचि भाग्यपुरुष जाले"[१] अशा भाग्यपुरुषाच्या मालिकेत त्यांची गणना केली पाहिजे. माळी जातीतील एका सामान्य कुटुंबात जन्मलेल्या जोतीरावांनी द्रष्टेपणा आणि कर्तृत्व या दोन्ही बाबतींत एवढी उंची कशी गाठली हे समजून घेतल्याखेरीज त्यांच्या कार्याची व विचारांची महती आपल्या ध्यानात येणार नाही.

## विद्यार्थिदशेतील संस्कार

जोतीरावांचा जन्म पुणे येथे इ. स. १८२७ मध्ये झाला. त्यांची घरची स्थिती पुष्कळच चांगली होती. त्यांचे वडील गोविंदराव यांनी त्यांना वयाच्या सातव्या वर्षी गावठी मराठी शाळेत घातले. पुढील चार वर्षांत या शाळेतील त्यांचा अभ्यासक्रम पुरा होतो न होतो तोच त्यांच्या शिक्षणक्रमात अचानक खंड पडला; आणि ते आपल्या घरच्या बागेत काम करू लागले. आपल्याकडील जुन्या शहरांची एकंदर रचना पाहिल्यास त्यांत वेगवेगळ्या थरांतील लोक वेगवेगळ्या भागांत विभागलेले असत. नित्य आणि नैमित्तिक पण केवळ औपचारिक अशा व्यवहाराखेरीज त्यांचा एकमेकांशी फारसा संबंधच येत नसे. शिवाय प्रत्येक जनसमूहाचे जिव्हाळ्याचे ऋणानुबंध प्रायः आपापल्या जातीपुरते मर्यादित होते. त्या काळच्या पुण्यातील उच्चवर्णियांची वसती बहुतांशी तीनचार पेठांतच केंद्रित झालेली होती. बरे, मुलांचे स्नेहीसोबती म्हटले, तर अर्थातच ते आसपासच्या भागातील असणार. तेव्हा फुले यांचे बंद पडलेले शिक्षण पुन्हा सुरू होऊन इ. स. १८४१ मध्ये ते इंग्रजी शाळेत जाऊ लागेपर्यंत तरी उच्चवर्णियांची मुले त्यांच्या सहवासात आली नसल्यास नवल नाही. त्यांच्या आरंभीच्या मित्रपरिवारात काही मुसलमान मुले होती. त्यांच्या तोंडून हिंदुधर्मावरची टीका ऐकून जोतीरावांना त्यातील अन्याय, उच्चनीचभाव आणि धर्माचरणातील मतलबीपणा यांची पहिल्याप्रथम जाणीव झाली; आणि आपल्या धर्मसंस्थेचे अंतरंग न्यायनिष्ठुरतेने तपासून पाहण्याची त्यांना गरज भासू लागली. "मी लहान असताना, माझे आसपासचे शेजारी मुसलमान खेळगडी यांच्या संगतीने मतलबी हिंदुधर्माविषयी व त्यातील जातिभेद वगैरे कित्येक खोट्या मतां-विषयी माझ्या मनात खरे विचार येऊ लागले, त्याबद्दल त्यांचे उपकार स्मरतो"[२] असे खुद्द फुले यांनीच नमूद करून ठेवले आहे.

जोतीरावांची चिंतनशीलता व बुद्धिकौशल्य पाहून त्यांच्या बागेशेजारी राहणारे

उर्दू शिक्षक गफव्हार बेग मुनशी आणि मे. लिजिट साहेब यांनी त्यांचे शिक्षण पुन्हा चालू करण्याबद्दल त्यांच्या वडिलांपाशी आग्रह धरला. त्यांचे म्हणणे गोविंदरावांना पटले आणि त्यांनी इंग्रजी शिक्षणासाठी आपल्या मुलाला स्कॉटिश मिशनच्या शाळेत धाडले. इंग्रजी शिक्षणाचा प्रारंभ ही जोतीरावांच्या आयुष्यातील अत्यंत महत्त्वाची घटना होय. यानंतर त्यांच्या जीवनक्रमाला वेगळे वळण लागले. लहानपणापासून गरीब कष्टकऱ्यांची हलाखीची स्थिती ते अगदी जवळून पाहात होते. आता ते समाजाच्या वरच्या थरातील लोकांत वावरू लागले. त्यामुळे आपल्या समाजातील भिन्न भिन्न जातींच्या व थरांच्या परस्परसंबंधांचे निरीक्षण करण्याची त्यांना आयतीच संधी मिळाली. शाळेत येणाऱ्या उच्चवर्णीय मुलांशी लवकरच त्यांच्या ओळखी झाल्या. त्यांपैकी सदाशिव बल्लाळ गोवंडे, मोरो विठ्ठल वाळवेकर आणि सखाराम यशवंत परांजपे हे तिघे ब्राह्मण विद्यार्थी त्यांचे जिवलग मित्र बनले; आणि त्यांची ही मैत्री दीर्घकाळ टिकून राहिली. वाळवेकर हे तर अखेरपर्यंत त्यांच्या पाठीशी उभे होते. "सदसद्विवेकी सुबोधाचा दाता । गृहिणीचा पिता । जोती मित्र"[३] अशा शब्दात त्यांनी या आपल्या मित्राचे गुणवर्णन केले आहे. केवळ कुटुंबपोषणाचीच चिंता करीत न बसता एकंदर समाजाच्या प्रगतीसाठी आपण जन्मभर एकदिलाने काही कार्य केले पाहिजे असे या मित्रमंडळाला सुरुवातीपासूनच वाटत होते. त्यासंबंधी त्यांच्यात वारंवार चर्चा होत असे. देशात काही विशेष घडले की, त्याचा त्यांच्या संस्कारक्षम मनावर परिणाम झाल्याखेरीज राहत नसे. पेशवाई नष्ट होऊन येथे ब्रिटिशांचे राज्य आले, आणि स्थिरावले याचे आपल्या सर्वसामान्य जनतेला काहीच सोयरसुतक नव्हते. मात्र या स्थित्यंतराची ज्यांना तावडतोब झळ लागली होती, त्यांच्या मनात साहजिकच ब्रिटिश सरकारविषयी नाराजी होती. ज्यांचा राजाश्रय तुटला असे शास्त्री-पंडित व भिक्षुक-पुराणिक, ज्यांचा वंशपरंपरागत अधिकार व मानमरातब कमी झाला, ते पाटील-देशमुखादी वतनदार, आणि ज्यांचा रोजगार बुडाला ते जुन्या अमदानीतील अंमलदार व शिपाईगडी हे सर्वच लोक असंतुष्ट होते. "इंग्रज सरकार या देशात आहेत, याविषयी लोक उघड नाही, परंतु मनातले मनात कुरकुर पुष्कळ करतात व मुख्यत्वेकरून भट, पंडित, शास्त्री हे तर फार हैराण आहेत."[४] परंतु ही परकी सत्ता उलथून टाकण्याचा नुसता विचारदेखील मनात आणण्याची कुणाची छाती नव्हती. तेव्हा प्राप्त परिस्थितीशी निमूटपणे जुळते घेण्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हते. खेड्यापाड्यातील शेतकऱ्यांना नव्या प्रशासनातील शांतता व सुव्यवस्था हे वरदान आहे असे वाटत होते. सरकारी नोकरीत शिरलेले उच्चवर्णीय सुशिक्षित आणि आधुनिक उद्योगप्रधान जमान्यात आर्थिक उत्कर्षाची संधी लाभलेले व्यापारी हे इंग्रजांच्या राजनीतीचे मुक्तकंठाने गोडवे गात होते. मात्र

डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या रामोशी, कोळी यांसारख्या जमातींना शांतता व सुरक्षितता यांचे यत्किंचितही आकर्षण नव्हते. उलट इंग्रजांच्या राजवटीतील निर्बंध त्यांना जाचक होत होते. त्यामुळे त्यांच्या स्वच्छंदवृत्तीला, दरोडेखोरीला व लूट-मारीला व्यत्यय येत होता. शिवाय त्यांच्या नैसर्गिक प्रतिकारक्षमतेची धार अजूनही बोथट झालेली नव्हती. इ. स. १८२६ पासून रामोशी व कोळी यांचे उठाव अधून-मधून सारखे होत राहिले. समाजातील वरिष्ठ वर्ग हतबुद्ध व निस्तेज बनला असताना हे वन्य जमातीचे तडफदार तरुण ब्रिटिशांशी शर्थीने झुंजत होते याचे पुष्कळांना कौतुक वाटू लागले. उमाजी नाईक, राघू भांगरे यांच्यासारख्या बंडखोरांचे साहस, शौर्य, आत्मविश्वास, उमदेपणा, गरिबांविषयीची त्यांची सहानुभूती इत्यादी गुणांच्या आख्यायिका सर्वत्र पसरल्या, आणि हजारो लोकांच्या प्रशंसेस ते पात्र ठरले. इंग्रजी राजवट ही आपला सनातन धर्म व संस्कृती यांना हरताळ फासणारी फार मोठी आपत्ती आहे अशी जुन्या पुराणमतवादी ब्राह्मणांची धारणा होती. त्यांना या बंडखोरांच्या उठावाबद्दल विशेष उत्सुकता होती. त्यांच्यापैकी पेशवाईच्या पुनः-स्थापनेची स्वप्ने पाहणारे भाऊ खरे, चिमणाजी जाधव, नाना दरबारे व रामचंद्र गणेश गोरे यांसारखे जे धाडसी तरुण होते, त्यांनी स्वतःच बंडाचा झेंडा उभारला आणि त्यांच्या भोवती तळच्या थरांतील तीनचारशे लोक एकत्र आले. गुलामगिरी, मग ती धार्मिक असो किंवा राजकीय असो, तिची जोतीरावांना अतोनात चीड होती. म्हणून विदेशी राज्यकर्त्यांविरुद्ध बंड पुकारणाऱ्या या लोकांच्या पराक्रमाचे वृत्तान्त ऐकून जोतीराव आणि त्यांचे मित्र यांना स्वातंत्र्यप्राप्तीची प्रेरणा मिळाली. शिवछत्रपती आणि जॉर्ज वॉशिंग्टन यांची चरित्रे वाचून त्यांच्या अंतःकरणात देशाभिमानाची भावना जागृत झाली होती. म्हणून त्यांनी वस्ताद लहूजी मांग यांच्या हाताखाली दांडपट्टा आणि गोळीनिशाण मारण्याची विद्या शिकण्यास प्रारंभ केला आणि 'इंग्रज सरकारास पालथे' घालण्याचे मनसुबे ते रचू लागले.[१] काही विद्वान ब्राह्मणही त्यांना आतून प्रोत्साहन देत होते. परंतु ही ऊर्मी फार काळ टिकली नाही. बंडखोरीचे वरील सर्व प्रयत्न ब्रिटिशांनी किती समर्थपणे व शिताफीने नेस्तनाबूद केले, ते पाहिल्यावर त्यांचे साम्राज्य हे अशा फुटकळ आघातांनी कोसळण्याइतके कमकुवत नाही याची त्यांना खात्री पटली. त्यांनी हा नाद सोडून दिला. त्यांचे विचारचक्र दुसऱ्या दिशेने सुरू झाले. कालांतराने उच्चवर्णियांचे देशप्रेम किती संकुचित व स्वयंकेंद्रित आहे ते त्यांना अनुभवान्ती कळून आले.

## ख्रिस्तप्रणीत मानवतावादाची ओळख

जोतीरावांचे देशप्रेम हे देशातील लोकांविषयीच्या त्यांच्या आपुलकीतून निर्माण

झालेले होते. समाजाच्या अगदी खालच्या थरांतील गरीब व कष्टाळू माणसांशी तादात्म्य ही त्यांची सहजप्रवृत्ती होती. हिंदू धर्मातील अनेक दैवतांची उपासना, जातिभेद, अस्पृश्यता आणि विधिनिषेधांचे अवडंबर या गोष्टी त्यांना मनापासून त्याज्य वाटत होत्या त्यामुळे ख्रिस्तप्रणीत ईश्वरनिष्ठ मानवतावादाचा आणि ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या समर्पित जीवनाचा व कार्यपद्धतीचा त्यांच्या मनावर फार मोठा प्रभाव पडला. जोतीरावांचे सर्व शिक्षण स्कॉटिश मिशनच्या शाळेत झाले किंवा शेवटी काही वर्षे ते सरकारी विद्यालयात जात होते, ते निश्चितपणे सांगता येत नाही. परंतु या दोन्ही शिक्षणसंस्थांतील अध्यापक आणि विद्यार्थी यांच्या वारंवार भेटीगाठी होत असत. सदाशिवराव गोवंडे, वापू रावजी मांडे, विष्णु मोरेश्वर भिडे यांच्यासारखे सरकारी शाळेतील अनेक विद्यार्थी जोतीरावांच्या मित्रमंडळात होते. शिवाय प्रारंभीच्या काळात सरकारी विद्यालयातही धार्मिक शिक्षणाला बंदी नव्हती. १८३३ च्या सुमारास रे. स्टिव्हेन्सन यांनी आपली शाळा सरकारच्या स्वाधीन केली. परंतु त्यानंतरही त्या वेळचे मुंबई प्रांताचे गव्हर्नर लॉर्ड क्लेअर यांच्या आग्रहाखातर रे. स्टिव्हेन्सन काही दिवस त्या शाळेत धार्मिक शिक्षणाचे वर्ग घेत असत. पुढे धार्मिक तटस्थतेच्या धोरणाची अधिक कडक अंमलबजावणी सुरू झाली, आणि सरकारी शाळांतून कोणत्याच धर्माचे शिक्षण द्यावयाचे नाही असे ठरले. मात्र निधर्मीपणाचा हा निर्बंध विद्यालयाच्या चार भिंतींपुरताच मर्यादित राहिला. सरकारी शिक्षणसंस्थांतील ब्रिटिश अध्यापकांची ख्रिस्ती धर्मावर अढळ श्रद्धा होती. विद्यालयाबाहेर शहरात ख्रिस्ती धर्मोपदेशकांची जी जाहीर भाषणे-प्रवचने होत, ती ऐकायला जाण्यास आपल्या विद्यार्थ्यांना त्यांची नेहमीच मूक संमती असे. एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमधील विल्यम हेंडरसन, जॉन वेल आणि पुण्याच्या इंग्रजी शाळेचे मुख्याध्यापक डी. ए. इज्देल यांचे आपल्याला धर्मप्रचाराच्या कार्यात अप्रत्यक्षपणे पुष्कळच साह्य होत आहे असे डॉ. जॉन विल्सन यांनी आपल्या एका भाषणात अगत्यपूर्वक नमूद केले आहे. पुण्यातील संस्कृत पाठशाळेचे प्रमुख मेजर कँडी यांना ख्रिस्ती धर्मसंस्थांच्या कार्याविषयी आस्था होती. इतकेच नव्हे तर त्यांच्यासाठी त्यांनी 'भाव कोणावर ठेवावा याचा विचार,' 'खरा मार्ग कोणता?' 'खऱ्या धर्माची चिन्हे' इत्यादी पुस्तिका लिहून दिल्या होत्या. जेम्स मिचेल, मरे मिचेल, कँडी, इज्देल या सर्वांशी जोतीरावांचा चांगला परिचय होता, आणि त्यांचे विचार आणि कार्य यांची छाप जोतीरावांच्या मनावर पडल्याखेरीज राहिली नाही. आपल्या विचारांना परिपक्वता कसकशी येत गेली ते सांगताना त्यांनी "पुण्यातील स्कॉच मिशनचे व सरकारी इन्स्टिटयूशनचे—ज्यांच्या योगाने मला थोडेबहुत ज्ञान प्राप्त होऊन मनुष्यमात्राचे अधिकार कोणते हे समजले"[२] अशा शब्दात ख्रिस्ती धर्मोपदेशक आणि सरकारी

विद्यालयातील अध्यापक व अधिकारी यांचे ऋण प्रांजळपणे मान्य केले आहे.

ख्रिस्ती धर्मोपदेशकांशी होणाऱ्या चर्चेमधून जोतीरावांची धर्मजिज्ञासा जागृत झाली. त्या काळी शहरात राहणाऱ्या काही बहुजनसमाजातील विद्यार्थ्यांच्या वाचनात हरिविजय, रामविजय, पांडवप्रताप, भक्तिविजय इत्यादी धर्मग्रंथ येत असत. त्यामुळे लहान वयातच त्यांच्यावर जुन्या सनातनी परंपरेचे संस्कार होत असत. अशा तऱ्हेचे धार्मिक संस्कार जोतीरावांच्या मनावर झाल्याचा उल्लेख त्यांच्या लेखनात आढळत नाही. उलट त्यांच्या आयुष्यातील एका विशिष्ट घटनेमुळे अगदी संस्कारक्षम वयातच त्यांचे लक्ष ख्रिस्तप्रणीत मानवतावादाकडे वेधले गेले होते. त्यांची मावसबहीण सगुणाबाई क्षीरसागर यांना बालपणीच वैधव्य आल्याने त्यांनी उदरनिर्वाहासाठी जॉन नावाच्या ख्रिस्ती धर्मोपदेशकाकडे मुले सांभाळण्याची नोकरी धरली होती. त्यामुळे ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या समर्पित जीवनाचे त्यांना अगदी जवळून दर्शन घडले. त्यांच्या कार्यक्षमतेचा व सेवावृत्तीचा त्यांच्या मनावर खोलवर ठसा उमटला होता. जोतीराव हे एक वर्षाचे होण्यापूर्वीच त्यांची आई कालवश झाली होती. तेव्हापासून सगुणाबाईने पोटच्या पोराप्रमाणे त्यांचा सांभाळ केला होता. त्यांनी केवळ त्यांच्या आरोग्याची काळजी घेतली असे नाही, तर त्यांच्या मनावर त्यांनी मानवताधर्माचे संस्कार केले. गोरगरिबांची सेवा हीच ईश्वराची उपासना हे तत्त्व त्यांना पटवून दिले. " आपल्या जोतवाने ख्रिस्ती फादरासारखे व्हावे आणि त्याच्या हातून गोरगरीब व महारमांग समाजाची सेवा व्हावी " [७] अशी सगुणाबाईची मनोमन इच्छा होती. जोतीरावांच्या घडणीतील त्यांचा हा कार्यभाग निःसंशय गौरवास्पद आहे.

स्कॉटिश मिशनच्या शाळेत गेल्यावर जोतीरावांच्या धर्मचिंतनाला खरोखर प्रारंभ झाला. एकेश्वरवाद हे येशू ख्रिस्ताच्या शिकवणीचे एक प्रमुख अंग आहे. त्यामुळे साहजिकच ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या प्रचारमोहिमेचा तो केंद्रबिंदू बनला. या चराचर सृष्टीचा जनक जो परमेश्वर तो एकच एक अद्वितीय आहे, आणि तोच काय तो अनादिसिद्ध आहे. त्यानेच आपल्या अमोघ शब्दशक्तीने शून्यातून ही जड व सजीव सृष्टी निर्माण केली आहे. त्याने न निर्मिलेले असे या जगात काहीही नाही. मात्र या समग्र सृष्टीत एकजिनसीपणा नाही. मनुष्येतर सृष्टी व मनुष्ययोनी यांच्या घडणीत मूलभूत फरक आहे. ईश्वराचे सार्वकालिक अस्तित्व आणि त्याचे अगाध कर्तृत्व यांची जाणीव फक्त माणसालाच होऊ शकते. ईश्वर हा निष्कलंक व सर्वार्थाने परिपूर्ण आहे. सृष्टी आणि सृष्टिकर्ता ही तत्त्वतः अभिन्न आहेत, असे प्रतिपादन करणारे अद्वैतमत हे चुकीचे आहे. तसेच जीव हा परमेश्वराचा अंश आहे हा सिद्धान्तही सत्याला धरून नाही. असे असले तरी ईश्वरावर प्रेम करण्याचा, त्याची मनोभावे सेवा करण्याचा अधिकार फक्त मनुष्यमात्राला आहे. तेव्हा त्याचा यथोचित वापर

करण्याची नैतिक जबाबदारी अर्थातच त्याच्यावर येऊन पडते. सगळी लहानथोर माणसे ही ईश्वराची लेकरे आहेत, तेव्हा सर्व स्त्रीपुरुषांनी एकमेकांशी बहीणभावाच्या नात्याने वागले पाहिजे. ईश्वराचे पितृत्व आणि मानवांचे भ्रातृत्व ही खिस्ती आचार-धर्माची दोन मुख्य सूत्रे आहेत. खिस्ती समाजाच्या लौकिक व्यवहारात भेदाभेद नाहीत असे नाही. परंतु त्यांना ईश्वरी योजनेचा आधार नाही. परमेश्वर हा केवळ जगत्पिता नाही, तर तो न्यायदाताही आहे. म्हणून त्याचे भय बाळगून न्यायाने व नीतीने वागण्याचा प्रयत्न करा अशी खिस्ताची आज्ञा आहे. पण मनुष्याची उत्पत्ती मुळात पापमूलक आहे. त्याचे ज्ञान व शक्ती ही अत्यल्प आहेत. त्यामुळे तो स्वतःच्या बळावर पापमुक्त व सदाचरणी होऊ शकत नाही. म्हणून ईश्वरावर श्रद्धा ठेवून त्याला शरण जाणे, आपल्या उपासनेत बिघाड न होता ती सफल व्हावी यासाठी त्याची नित्यनियमाने प्रार्थना करणे यांवरच मनुष्याने आपली शक्ती एकवटली पाहिजे. येशू खिस्ताच्या उपदेशात घटपटादी बुद्धिगम्य तत्त्वचिकित्सेपेक्षा हृदयसंवेद्य नीतिबोधालाच प्राधान्य आहे. 'वैऱ्यावर प्रीती करा', 'जे तुमचा द्वेष करतात त्यांचे भले करा', 'जसे माणसांनी तुमच्याशी वागावे असे तुम्हांस वाटते, तसे तुम्ही त्यांच्याशी वागा', 'तुमचा पिता परमेश्वर जसा दयाळू आहे तसे तुम्ही दयावंत व्हा' इत्यादी बोधवचने चटकन सामान्य माणसाच्या अंतःकरणाला जाऊन भिडतात. खिस्ती धर्मोपदेशकांच्या उपासनासंप्रदायात निष्क्रियतेला वा कर्मसंन्यासाला थारा नव्हता. श्रद्धेला कृतिशीलतेची जोड आवश्यक आहे असे ते मानत होते. सुविख्यात खिस्तसेवक सेंट जेम्स यांनी आपल्या निरूपणात "चैतन्याशिवाय शरीर जसे प्रेतरूप बनते तशी श्रद्धादेखील प्रत्यक्ष कार्यावाचून निर्जीवच राहते"[८] असा अर्थपूर्ण उद्‌गार काढला आहे. येथे कार्य या शब्दात लोकांची सेवा अभिप्रेत आहे. खुद्द येशू खिस्तानेही "मी या जगात सेवा करून घेण्यासाठी नव्हे, तर इतरांची सेवा करण्याठी आलो आहे" असे म्हटले आहे. त्यांनी जेव्हा आपल्या शिष्यांना धर्मप्रबोधनासाठी जाण्याची आज्ञा केली तेव्हा "रोग्यांना बरे करा, कुष्ठरोग्यांची शुश्रूषा करा, जे मृतप्राय झाले असतील त्यांना संजीवनी द्या, पिशाचबाधा झालेल्यांची सुटका करा"[९] आणि सेवेच्या द्वारे लोकांची मने जिंकून त्यांना मुक्तकंठाने धर्मोपदेश करा असे सांगितले होते. श्रद्धा, नीती आणि दीनदुबळ्यांची सेवा या त्रिपुटीत खिस्तबोधाचे सारसर्वस्व साठवलेले आहे.

## खिस्ती धर्मोपदेशकांच्या कार्यपद्धतीचा प्रभाव

खिस्ती धर्मातील मानवतावादाने जोतीरावांच्या विचारांत अधिक स्पष्टता व सुसूत्रता आली असेल. पण त्यापेक्षाही खिस्ती धर्मोपदेशकांचे व्यक्तित्व आणि

कार्यपद्धती यांची त्यांच्या मनावर दृढ छाप पडली होती. कारण त्यांच्या उक्तीतून व कृतीतून मानवतावादी नीतिधर्माचा त्यांना रोजच्या रोज प्रत्यय येत होता. हिंदू धर्मग्रंथांत अशा उदात्त नीतितत्त्वांचे प्रतिपादन नाही असे म्हणता येणार नाही. उपनिषदे, रामायण, महाभारत, भागवत इत्यादी ग्रंथांतून उच्चतर नीतिमूल्यांची महती गाइलेली आहे. भगवद्‌गीतेत जे दैवी संपत्तीचे वर्णन आहे, त्यात समाजधारणेला उपकारक अशा नैतिक गुणांचाच समावेश आहे. मराठी संतवाङ्मयात तर परमार्थ-सिद्धीसाठी भक्तीइतकीच नीतीची कशी आवश्यकता आहे ते वारंवार आवर्जून सांगितले आहे. हे सर्व खरे असले, तरी या ग्रंथांनी ज्या समाजव्यवस्थेला दैवी अधिष्ठान प्राप्त करून दिले होते, तिने शूद्रातिशूद्रांना माणसाचे साधे नैसर्गिक हक्कही शतकानुशतके नाकारले होते. शिवाय हिंदू धर्माचे परंपरागत प्रवक्ते जे शास्त्रीपंडित, पुराणिक पुरोहित त्यांच्या नेहमीच्या वागण्यात नैतिकतेचा, सहृदयतेचा, समाज-हितबुद्धीचा लवलेशही नव्हता. लोकहितवादींची शतपत्रे वाचली की, अव्वल इंग्रजीत स्वतःला ' भूदेव ' म्हणविणाऱ्या या लोकांचा हरएक बाबतीत किती अधःपात झाला होता, त्याची कल्पना येते. मोठमोठी तत्त्वे जुन्या ग्रंथांतच राहिली, आणि प्रत्यक्ष धर्माचरणात मात्र अज्ञान, गतानुगतिकता, स्वार्थ आणि ढोंगबाजी यांमुळे पदोपदी त्या उदात्त तत्त्वांचे विडंबनच चालू होते. महाराष्ट्रात वारकरी पंथ अत्यंत लोकप्रिय होता. पण त्यातही अनेक मठपती व महाराज उदयास येऊन महंतगिरी वाढीस लागली होती. त्यांच्या कीर्तननिरूपणात बदललेल्या परिस्थितीचे भान ठेवून लोकांना मार्गदर्शन करण्याचे सामर्थ्य उरलेले नव्हते. उलट ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या कार्या-मधून त्यांची विद्याभिरुची, धर्मनिष्ठा, समर्पणशीलता, उद्योगप्रियता, कर्तव्यदक्षता आणि अगदी खालच्या थरांतील माणसाविषयीचा कळवळा इत्यादी गुणांची सर्वांनाच निरंतर साक्ष पटत होती. आपला उपदेश आणि आचरण यांत सुसंवाद राखण्याची त्यांची धडपड खचितच गौरवास्पद होती. आपल्या समाजातील धर्म-मार्तंडांनी कधीतरी खालच्या लोकांशी जवळीक साधली होती का? कुणा ढोर-कोळ्याच्या झोपडीत जाऊन त्याच्या अडचणींची विचारपूस केली होती का? येथील उच्चवर्णीयांनी जे सहसा कधी केले नाही, ते परदेशातून आलेले हे ख्रिस्ती धर्मोपदेशक करीत होते. जोतीरावांना स्वतःलाही त्याचा अनुभव होता. स्वकीयांकडून त्यांची अवहेलना झाली, त्यांच्या कार्यात अडथळे आणले गेले. पण ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी त्यांना सहानुभूती दाखवली, उत्तेजन दिले, साह्य केले. त्यांच्याविषयी जोतीरावांना आदर वाटला, आणि ज्या धर्माने त्यांना जनसेवेची ही प्रेरणा दिली, त्याचे खरे स्वरूप समजून घेण्याची त्यांना इच्छा झाली, तर त्यात काहीच आश्चर्य नाही.

महाराष्ट्रात अमेरिकन मिशन, स्काटिश मिशन, लंडन मिशनरी सोसायटी, चर्च

मिशनरी सोसायटी इत्यादी अनेक संस्था ख्रिस्ती धर्मप्रचाराचे कार्य करीत होत्या. या सर्व संस्थांचे कार्यकर्ते एकोप्याने व परस्परसहकार्याने काम करीत होते. त्यासाठी बॉम्बे मिशनरी युनियन, मुंबई बायबल सोसायटी, बॉम्बे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई टेंपरन्स सोसायटी इत्यादी व्यापक संस्था स्थापन झाल्या होत्या. स्कॉटिश मिशनचे धर्मोपदेशक इ. स. १८२२ मध्ये मुंबई इलाख्यात प्रथम आले. त्यानंतर एकामागून एक जे उपदेशक आले, त्यांत जेम्स मिचेल, जॉन स्टिव्हेन्सन, रॉबर्ट निस्बिट, जॉन विल्सन, मरे मिचेल हे प्रमुख होते. सर्व धर्मोपदेशकांच्या कार्यपद्धतीत एकसूत्रीपणा होता. ज्या प्रदेशात प्रचार करायचा, त्यातील लोकांची भाषा आत्मसात करणे अत्यावश्यक आहे याची त्यांना जाणीव होती. म्हणून येथे आल्यावर अल्पावकाशातच ते मराठी शिकले. इतर कार्यकर्त्यांना ती शिकणे सोपे जावे म्हणून त्यांनी मराठीचे कोश व व्याकरणे रचली. स्टिव्हेन्सन, विल्सन, मिचेल यांना अनेक देशी भाषा अवगत होत्या. हिंदूंचे धर्मग्रंथ पाहता यावेत म्हणून त्यांनी संस्कृतचाही अभ्यास केला. रॉबर्ट निस्बिट यांची तर मराठीच्या बिनचूक उच्चाराविषयी विशेष ख्याती होती. त्यांचे प्रचारकार्य पद्धतशीर व योजनाबद्ध होते. ठिकठिकाणी त्यांनी आपली केंद्रे उघडली. छापखाने घातले. बायबलचा सुबोध मराठीत अनुवाद करून तो प्रसिद्ध केला. ख्रिस्ताच्या तत्त्वप्रणालीवर आधारलेल्या लहान लहान पुस्तिका लिहून त्यांच्या शेकडो प्रती मोफत वाटल्या. हे वाङ्मय वाचणार कोण? आपल्या देशात साक्षरतेचे प्रमाण तर अगदीच कमी होते. म्हणून त्यांनी शक्य तेथे मुलांच्या व मुलींच्याही शाळा काढल्या. पिढ्यान्‌पिढ्या विद्येला वंचित झालेल्या खालच्या जातींतील लोकांना शिक्षणाची गोडी लावण्याची त्यांनी खटपट केली. मुलांना स्वच्छतेचे धडे दिले. त्यांच्या पालकांना भेटून मुलांना न चुकता शाळेत पाठवणे हे कसे त्यांच्या हिताचे आहे ते पटवून दिले. जेथे जेथे लोक जमतात तेथे तेथे जाऊन त्यांच्याशी बोलणे करण्याचा त्यांचा परिपाठ होता. समाजस्थितीचे अवलोकन करण्यासाठी महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या भागात त्यांनी दौरे काढले. देहू, आळंदी, पंढरपूर, जेजुरी, नाशिक, त्र्यंबक इत्यादी क्षेत्रस्थाने समक्ष पाहून त्यांनी त्यांची माहिती करून घेतली. सामाजिक चालीरीती, धार्मिक विधी, सण, उत्सव व समारंभ यांचे बारकाईने निरीक्षण केले. प्राचीन धर्मग्रंथांची छाननी करून त्यांवर त्यांनी टीकात्मक लेखन केले. व्याख्याने, संभाषणे व वादविवाद यांच्या द्वारे ख्रिस्ती धर्माचे श्रेष्ठत्व प्रतिपादन करण्याची त्यांनी शिकस्त केली. मुंबई व पुणे येथे त्यांच्या संस्थेत त्यांची साप्ताहिक व्याख्याने होत. त्यासाठी येणारा श्रोतृसमुदाय बहुतांशी ख्रिस्ती व सरकारी विद्यालयातील विद्यार्थ्यांचा असे. मुंबईस स्कॉटिश मिशनच्या सभागृहात डॉ. विल्सन यांची व्याख्यानमाला कित्येक वर्षे नियमितपणे चालू होती. या मालेतील

एका व्याख्यानसत्रासंबंधी तत्कालीन मराठी वृत्तपत्रात आलेली खालील माहिती खचितच लक्षणीय आहे. "पहिल्या व्याख्यानाला पुष्कळ हिंदी लोक हजर होते. मि. विल्सन यांनी सुरू केलेली ही व्याख्यानमाला श्रोत्यांना चित्तवेधक वाटल्याखेरीज राहणार नाही. परंतु त्याचबरोबर त्यांना सतावणाऱ्या अनेक महत्त्वाच्या प्रश्नांची उकल करण्यासाठी आवश्यक असलेले साधन-साहित्य त्यांना या व्याख्यानातून मिळेल. शिवाय जगाच्या सामान्य इतिहासाविषयी आणि त्यात घडून आलेल्या मोठमोठ्या परिवर्तनांविषयी त्यांना बहुमोल माहिती मिळेल. धर्मांतर घडवून आणणे हे जरी त्यांचे उघड उद्दिष्ट असले, तरी त्यासाठी बुद्धीला खाद्य पुरवून विचाराला चालना देण्याची व स्वतंत्रपणे निर्णय घेण्याची साधने उपलब्ध करून देण्याची त्यांची इच्छा असते."[१०] बाळशास्त्री जांभेकरांच्या 'दर्पण' पत्रातील या व्याख्यानमालेसंबंधीचा हा अभिप्राय आहे. त्यावरून ही व्याख्याने त्या काळी किती गाजली असतील ते कळून येते. "आम्ही युक्तिवाद करतो, बळाचा वापर करून कुणावर जबरदस्ती करत नाही"[११] हा जॉन विल्सनचा दावा त्यांच्या प्रचारपद्धतीतील उदारमतवादी दृष्टीचा द्योतक आहे. धर्मप्रवचने व व्याख्याने यांच्याप्रमाणेच हे धर्मोपदेशक हिंदु-धर्मातील दोषस्थळे दाखवून देणाऱ्या लहान लहान पुस्तिकाही प्रसिद्ध करीत होते. त्यांची छोटीमोठी पुस्तके वाचनासाठी जोतीरावांना उपलब्ध होती. त्यामुळे त्यांचे समाजचिंतन अधिक डोळस व मर्मग्राही बनले. या चिंतनातूनच आपल्या सहजस्फूर्त विचारांना एकत्र गुंफणारे अंतःसूत्र त्यांना गवसले. हिंदू समाजातील शूद्रातिशूद्रांच्या दुरवस्थेला उच्चवर्णीयांचा स्वार्थ, अदूरदृष्टी आणि असहिष्णुता हे व्यक्तिगत दोष तर कारणीभूत आहेतच; पण त्यापेक्षाही त्यांच्या श्रुतिस्मृतिप्रणीत शास्त्रग्रंथांत सामाजिक विषमतेची व गुलामगिरीची बीजे आहेत हे त्यांना कळून चुकले. मात्र जोतीरावांच्या पूर्वायुष्यात तरी या निषेधपर दृष्टीपेक्षाही खिस्ती धर्मोपदेशकांच्या कार्याचे विधायक अंगच त्यांना अधिक उद्‌बोधक व स्फूर्तिदायक वाटले होते. या धर्मोपदेशकांची येथील वाटचाल निष्कंटक नव्हती. जुन्या सनातनी पंडितांचा व पोटभरू भिक्षुकांचा त्यांच्या-वर रोष होता. त्याबरोबरच इतर सामान्यजनांकडूनही त्यांना वारंवार त्रास होत होता. या खिस्ती "उपदेशकांस पाहिजेल त्याने पकडावे.झोडावे, कुटावे, पिटावे व धूर्त ठकांच्या फुसलावणीवरून अज्ञानी शूद्रांच्या पोरासोरांनी त्यांच्या मागे बोंबा आरोळ्या मारता मारता त्यांजवर धूळ-मातीचा भडीमार करून, त्यांस पाहिजेल तिकडे खिदडावे"[१२] असा प्रकार नेहमी ना.होऊन बसला होता. जेम्स मिचेल व जॉन स्टिव्हेन्सन हे स्कॉटिश मिशनचे दोघे उपदेशक धर्मप्रसारासाठी पुण्यास येऊन राहिले होते. हे काम करताना त्यांचा पावलोपावली कसा पाणउतारा केला जात असे, ते पुणेवर्णनकार ना. वि. जोशी यांनी नमूद करून ठेवले आहे. "मिचलसाहेब उपदेशास बाहेर निघाले, म्हणजे लोक

त्यांचे फार हाल करीत. शिव्या देत, टोपी उडवीत, हुर्यो हुर्यो करीत, त्यांच्या पाठीस लागत, धोंडे मारीत, कोणी थापट्या मारीत, कोणी शेणमार करीत; तरी ते इतके सहनशील होते की, कोणास चकार शब्दही न बोलता उलटे त्यांस चांगल्या गोष्टी सांगत." [१३] इतका कडवा विरोध होता, तरीदेखील हे धर्मोपदेशक प्रतिज्ञापूर्वक स्वीकारलेल्या आपल्या मार्गापासून रेसभरही ढळले नाहीत. लूथर, नॉक्स, कॅल्व्हिन यांच्यासारख्या जगद्वंद्य धर्मसुधारकांचा आदर्श त्यांच्यासमोर होता. "माझ्यासाठी लोक जेव्हा तुम्हाला शिव्याशाप देतील, तुमचा छळ करतील, तुमच्यासंबंधी खोट्या-नाट्या कंड्या पिकवतील, तेव्हा तुम्ही आनंदी राहा, स्वतःला धन्य माना. कारण ईश्वराच्या राज्यात तुम्हाला या तपश्चर्येचे पारितोषिक मिळेल. तुमच्या आधीच्या प्रेषितांचाही असाच छळ झाला होता." [१४] येशू ख्रिस्ताचा हा आदेश व आश्वासन हे त्यांनी प्रमाण मानले होते. यातच आपल्या धर्मश्रद्धेची कसोटी आहे अशी त्यांची भावना होती. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात आपल्याकडे अशी क्रियाशील श्रद्धा अगदीच दुर्मिळ होती. त्यामुळे स्वतंत्रपणे विचार करणाऱ्या जोतीरावांसारख्या नव-शिक्षित तरुणांना या उपदेशकांविषयी आदर वाटू लागला. तरीसुद्धा एकदम ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याची त्यांना इच्छा झाली नाही. असा उतावळेपणा त्यांच्या स्वभावातच नव्हता. शिवाय गोवंडे-वाळवेकरप्रभृती त्यांचे मित्र ब्राह्मण होते. त्यांच्या घरीदारी धर्मांतराला अत्यंत प्रतिकूल असे वातावरण होते. इ. स. १८३९ मध्ये मुंबईत दोन पार्शी तरुणांनी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतली. त्या वेळी तेथे फार मोठी खळबळ उडाली; कोर्टकचेऱ्या झाल्या. या प्रक्षोभक घटनेचे पडसाद पुण्यातही उमटले. रे. जेम्स मिचेल यांचे विद्यालय विद्यार्थ्यांच्या अभावी ओस पडले होते. त्यानंतर १८४३ च्या सप्टेंबरमध्ये स्कॉटिश मिशनच्या मुंबईतील शिक्षणसंस्थेत शिकलेल्या नारायण शेषाद्री या ब्राह्मण तरुणाचा बाप्तिस्मा झाला. तेव्हा त्या सुमारास मुंबईत तेथील ब्राह्मणांची सभा भरून त्यांनी ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या शाळेत किंवा इतरत्र त्यांचा उपदेश ऐकण्यास कोणी जाऊ नये असा ठराव पास केला होता. हिंदुधर्मातील अनेक गोष्टी अनिष्ट, अन्यायमूलक व हानिकारक आहेत अशी फुले आणि त्यांचे मित्र यांची खात्री पटली होती. तरी तेवढ्यासाठी ख्रिस्ती धर्मात जाणे त्यांना श्रेयस्कर वाटले नाही जोतीरावांचे मित्र वाळवेकर यांनी आपल्या आत्मवृत्तात यासंबंधीची हकीगत थोडक्यात दिली आहे. "विद्यार्थी असतानाच हिंदुधर्मावरची श्रद्धा उडून ख्रिस्ती धर्माकडे मन वळले व पुढे ख्रिस्ती होऊन त्यात योग्यता संपादन करावी असेही वाटले. परंतु नवीन धर्म स्वीकारणे त्याचा विचार करून आपल्या धर्माशी तुलना करून निर्णय करावा असे वाटले. तशा बुद्धीने ख्रिस्ती धर्माचा अभ्यास करताना त्यात आमच्या धर्माप्रमाणेच कितीएक गोष्टींवर संशय न घेता केवळ विश्वासानेच

त्या घ्याव्या लागतात असे दिसून आले. त्याजवरून आम्हा खिस्ती धर्म अभ्यास करणाऱ्या मित्रमंडळींचा इत्यर्थ असा ठरला की, ज्या अर्थी कितीएक गोष्टींमध्ये मतभेद आहे व त्यांशी सर्वांचा मेळ पडत नाही. तेव्हा कोणताही धर्म प्रत्यक्ष ईश्वराने दिलेला असेल असे म्हणवत नसेल. ज्या गोष्टींत सर्व धर्मांची मूलतत्त्वे सारखी मिळतात व ती सदसद्विचारशक्तीस अनुसरून आहेतच, तो जो स्वाभाविक धर्म तो सर्वत्र लागू असल्यामुळे तो मात्र खरा. त्या धर्माचा सारांश इतकाच की, एक ईश्वर आहे, त्याची भक्ती करावी व सर्वत्र मान्य अशी जी नीतितत्त्वे त्या धोरणाने वर्तन करावे व मुख्य सिद्धान्त परोपकार हे पुण्य व परपीडा हे पाप हा साधारण धर्मविचार ठरला. त्यामुळे खिस्ती होण्याचा बेत रहीत झाला. हा विचार ठरण्यास कै. बाबा साने आमच्या एका मित्राचे वडील यांचा विशेष उपयोग झाला." [११] त्यानंतर लवकरच इ. स. १८४५ मध्ये बाळा गोपाळ जोशी हा पुण्याचा ब्राह्मण तरुण खिस्ती होऊन डॉ. मरे मिचेल यांच्याबरोबर मुंबईस राहण्यास गेला. इ स. १८४६ मध्ये रे. जेम्स मिचेल यांनी पुण्यातील दोघा तरुण ब्राह्मणांस बाप्तिमा दिला. तेव्हा जोतीराव आणि त्यांचे मित्र यांच्या मनाची थोडी चलबिचल झाली. परंतु सामाजिक सुधारणेचे कार्य तडीस न्यायचे असेल, तर प्रत्यक्ष धर्मांतर न करण्यात शहाणपण आहे हा विचारच शेवटी प्रबळ ठरला.

## पेन यांची धर्मचिकित्सा

हिंदू समाजातील सनातनी लोक आणि खिस्ती धर्मोपदेशक यांचा झगडा चालूच होता. परंतु स्वतंत्रपणे विचार करणारे काही नवशिक्षित तरुणही महाराष्ट्रात होते. खिस्ती धर्मातील तथ्यांश ग्रहण करण्याची त्यांची तयारी होती. परंतु विल्सन-स्टिव्हेन्सनप्रभृती धर्मोपदेशकांच्या प्रचाराला बळी न पडण्याची त्यांनी दक्षता घेतली होती. त्यांच्यापैकी काही नास्तिक होते, काही अज्ञेयवादी होते, तर काही सृष्टिजन्य ईश्वरी विद्येचा पुरस्कार करणारे होते. हिंदू व खिस्ती समाजांतील या विचारप्रवाहांचे विरोधक पुष्कळदा या निरनिराळ्या मतप्रणालींची गल्लत करीत असत. येशू खिस्त आणि बायबल यांवर विश्वास नसणाऱ्या सर्वांना पाखंडी म्हणून संबोधण्याची खिस्ती धर्मोपदेशकांची रीत होती. सरकारी विद्यालयातील शिक्षणक्रमामुळे त्यांचे विद्यार्थी खऱ्या धर्मापासून अधिकाधिक दूर जात आहेत अशी त्यांची नेहमीची तक्रार होती. या विद्यार्थ्यांना धर्माची आवश्यकताच जाणवत नाही सर्वच धर्म सदोष व तर्कदुष्ट आहेत. तेव्हा हा धर्म खरा किंवा तो धर्म ग्राह्य अशी निवड करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. धर्माची चर्चा करणे म्हणजे काळाचा व विचारशक्तीचा अपव्यय आहे असे ते समजतात. एल्फिन्स्टन विद्यालयात काही वर्षे अध्यापन करून डॉ.

विल्सनच्या शिक्षणसंस्थेत दाखल झालेले प्रो. हेंडरसन यांचा हा अभिप्राय आहे. पुण्यातील धर्मभोळेपणा अलीकडे कमी होत चालला आहे. पण त्याची जागा दुर्दैवाने पाखंडीपणा घेत आहे; आणि कित्येकदा तर त्याची परिणती नास्तिकपणातच होते. मुंबईतील सुशिक्षित तरुणांपेक्षाही पुण्यातील विद्यार्थिवर्गात ही प्रवृत्ती अधिक प्रमाणात आढळते असे मिचेल व निज्बिट या उभयतांचे मत बनले होते. या अनेकविध मतप्रणालींची जोतीरावांसारख्या चौकस व चिंतनशील माणसाने दखल घेतली असेल यात शंका नाही, परंतु त्यांच्या विचारांत पुन्हा एकवार परिवर्तन घडून येण्यास थॉमस पेन यांचे ग्रंथ कारणीभूत झाले. "आपली सर्वांची चांगली एकी केल्याशिवाय आपल्यास अमेरिकन, फ्रेंच आणि रशियन लोकांची बरोबरी करिता येणार नाही असे त्यांनी (चार सुधारल्या भटविद्वानांनी) मला टॉम्स पेन वगैरे ग्रंथकारांच्या पुस्तकांतील कित्येक वाक्यांच्या आधाराने सिद्ध करून दाखवले. यावरून मी तसले (ब्रिटिशविरोधी) वेडेचार काही दिवस माझ्या लहानपणी करीत होतो. परंतु पुढे मी जेव्हा त्याच ग्रंथांवरून बारीक विचार करून पाहू लागलो; तेव्हा या सुधारल्या भटांच्या मतलबी मसलतींचा खरा अर्थ माझ्या ध्यानात आला."[१६] असे जोतीरावांनी स्वतःच निःसंदिग्धपणे म्हटले आहे. "आम्ही शाळेत असता विलायतेकडील प्रख्यात नास्तिक टामस पेन व वालटेर यांच्या ग्रंथातील काही नास्तिक मताचे निवडक उतारे छापून पुणे मुंबईकडील सुधारलेल्या मंडळीने आम्हाकडे पाठविले होते."[१८] परमहंस मंडळीच्या अहमदनगर शाखेचे जुने सभासद कासम महंमद यांनी बाबा पदमनजी यांना धाडलेल्या पत्रातील या मजकुरावरून अव्वल इंग्रजीत विद्यार्थिवर्गात थोड्या प्रमाणात का होईना, पेनप्रभृती पाश्चात्त्य बंडखोर लेखकांचे वाङ्मय वाचले जात होते; आणि त्याच्या आधारे त्यांच्यात धर्मसंबंधी विचारमंथन चालू होते हे लक्षात येते. आता पेनसारख्या विचारवंताचे लेखन पुण्यातील विद्यार्थ्यांच्या हाती कसे आले असा प्रश्न पडण्याचा संभव आहे. परंतु रे. मरे मिचेल यांनी आपल्या एका ग्रंथात दिलेल्या माहितीवरून त्याचा उलगडा होतो. डॉ. विल्सन यांचा पार्शी धर्मपंडितांशी वादविवाद चालू होता. त्यानंतर पुढे थोड्याच वर्षांत दोन पार्शी तरुणांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. त्यामुळे पार्शी समाज संतप्त झाला. त्याने ख्रिस्तीधर्मविरोधी मोहीम मोठ्या त्वेषाने सुरू केली. त्या निमित्ताने काही पार्शी गृहस्थांनी लंडनहून टॉमस पेनच्या ग्रंथांच्या प्रती मागवल्या होत्या.[१८] एल्फिन्स्टन विद्यालयातील अनेक हिंदू विद्यार्थ्यांचे पार्शी मित्र होते. त्यांच्यामार्फत पेनचे ग्रंथ पुण्यात आले असणार हे उघड आहे.

जोतीराव हे चिकित्सक वृत्तीचे असले, तरी त्यांच्या अंतःकरणात धर्मश्रद्धा खोलवर रुजलेली होती. पेन हे देखील कट्टर एकेश्वरवादी होते. त्यांचा झगडा दुहेरी होता.

एकीकडे लोकांची फसवणूक करणाऱ्या स्वार्थी धर्मसत्तेवर ते हल्ला चढवत होते; तर दुसरीकडे नास्तिकतेशी त्यांना मुकाबला करायचा होता. अशा दोन्ही आघाड्या सांभाळून पुन्हा विशुद्ध धर्मभावनेचा आशय त्यांना लोकांच्या गळी उतरवावयाचा होता. त्यामुळे जोतीरावांना त्यांची जीवनदृष्टी अधिक स्वागतार्ह वाटली. त्यांच्या धर्म–देशविषयक विचारांच्या विकासाला पेनचे प्रतिपादन पोषक ठरले. पेन यांचे लेखन विपुल आहे; आणि त्यात त्यांनी निरनिराळ्या विषयांची चिकित्सा केली आहे. मात्र जोतीरावांच्या कार्याच्या संदर्भात मुख्यतः पेन यांच्या खालील पुस्तिकांचा व ग्रंथांचा उल्लेख करणे उचित होईल.

(1) Justice and Humanity (2) An Occasional Letter on the Female Sex (3) Common Sense (4) Rights of Man (5) Age of Reason.

पेन यांचे राजकीय आणि सामाजिक विचार हे खरोखरीच मौलिक व प्रभावशाली आहेत. परंतु या विचारांचा उगमही त्यांच्या धार्मिक तत्त्वचिंतनातूनच झाला आहे. त्यांनी धर्मसंस्थेवर वारंवार कोरडे ओढले आहेत. पण त्यांची प्रेरणा धर्माच्या शुद्धीकरणाची होती; धर्मभावना नष्ट करण्याची नव्हती. धर्मभोळेपणा आणि ईश्वर विषयक उथळ, अज्ञानमूलक व असत्य मतप्रणाली यांचा बीमोड करताना खरे ईश्वरज्ञान, नीती आणि माणुसकीची भावना यांचा ऱ्हास होऊ देता कामा नये असा त्यांनी धर्मसुधारकांना इशारा दिला आहे. टॉमस पेन यांनी आपल्या धर्ममीमांसेत प्रथम ईश्वराचे एकत्व आणि मानवी समता या दोन तत्त्वांवर आपली दृढ श्रद्धा आहे असे म्हटले आहे. परंतु एवढ्याने आपल्या भूमिकेचा सुस्पष्ट व पुरेसा बोध होणार नाही, म्हणून आपण नेमके काय मानत नाही तेही निवेदन करण्याची त्यांनी दक्षता घेतली आहे. धर्म ही एका अर्थी प्रत्येक ईश्वरोपासकाची अत्यंत जिव्हाळ्याची अशी खाजगी वैयक्तिक बाब आहे. जगाचा निर्माणकर्ता परमेश्वर आणि त्याला अनन्यभावे शरण जाणारा मनुष्य यांच्यात कुणाही मध्यस्थाला अधिकृत स्थान असण्याची मुळीच आवश्यकता नाही. म्हणून मी ज्यू, रोमन, ग्रीक, तुर्की, प्रॉटेस्टंट किंवा इतर कोणतेही धर्मशासन (चर्च) मानत नाही. "My own mind is my own church." [१९] माझे स्वतःचे मन हेच माझे धर्मशासन आहे, धर्मश्रद्धा ही स्वतंत्र व स्वयंस्फूर्त असली पाहिजे. तिच्यावर कुठल्याच बाह्य सत्तेचे अधिराज्य असता कामा नये. एकदा का धर्माला संस्थात्मक रूप प्राप्त झाले; आणि धर्मसंस्था व शासनसंस्था यांचे संबंध परस्परपूरक झाले की, दंडसत्तेच्या जोरावर, मग ती सत्ता राजाची असो वा धर्माध्यक्षाची असो, धर्माच्या मूलतत्त्वांच्या खुल्या चर्चेला प्रतिबंध केला जातो. सामान्य माणसाची धर्मजिज्ञासाच मारली जाते. लोकांची

धर्मश्रद्धा धर्मसंस्थेच्या दावणीला बांधण्याचा खटाटोप सुरू होतो. केवळ बाह्य शक्तीवर विसंबून राहिल्यास ही गोष्ट बिनबोभाट सिद्धीस जाणे कठीण आहे हे लक्षात येताच मनुष्याच्या आंतरिक श्रद्धेची दिशाभूल करण्याचा मार्ग अवलंबिण्यात येतो. त्यासाठी ईश्वरदत्त पवित्र धर्मग्रंथांचा आधार उपयोगी पडतो. वेद, कुराण, बायबल अशा ईश्वरप्रणीत मानल्या गेलेल्या एका विशिष्ट ग्रंथाचे प्रामाण्य हे धर्म-निष्ठेचे पहिले लक्षण मानले जाते. या प्रमाणग्रंथाचे भाष्यकार पुन्हा त्या त्या धर्मसंस्थेचेच प्रतिनिधी असतात. प्रेषित, पोप, धर्मपंडित व पुरोहित अशी अधिकार-श्रेणी अस्तित्वात येते. ईश्वराच्या नावावर साळसूदपणे धर्माचा बाजार मांडला जातो. हे सर्व अनावश्यक व अनिष्टच नव्हे, तर पापमूलक व पाखंडीपणाचे आहे अशी पेन यांची धारणा होती. म्हणून त्यांनी या मायावी धर्मसंस्थेच्या मुळावरच घाव घालण्याचे धाडस केले. जुना व नवा करार हे धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत असणे कसे शक्य नाही ते त्यांनी निःशंकपणे दाखवून दिले. प्रॉटेस्टंट पंथीयांनी पोपशाहीविरुद्ध बंड पुकारले; पण बायबल आणि व्यक्तीची सदसद्विवेकबुद्धी यांचे प्रामाण्य त्यांनी स्वीकारले होते. पेन यांनी बायबलला फाटा दिला आणि सदसद्विवेकबुद्धीचा अधि-कार मात्र अबाधित राखला. त्याबरोबरच त्यांनी सदसद्विवेकबुद्धीला तर्कबुद्धीची ( Reason ) जोड दिली आहे. मात्र ही तर्कबुद्धी विज्ञानप्रवण असली पाहिजे अशी त्यांची अपेक्षा होती. जुन्या व नव्या करारांतील अविश्वसनीय, अनैसर्गिक आणि अन्यायकारक कथांचे विश्लेषण करून या कथांमुळे ईश्वराच्या सर्वोच्चपदाचे किती अवमूल्यन होते ते त्यांनी ‘ The Age of Reason ’ या आपल्या ग्रंथात बिन-तोडपणे दाखवून दिले आहे. जगत्पिता परमेश्वर जर एकच आहे, तर त्यांनी व्यक्त केलेले आपले मनोगत, त्यांनी घोषित केलेले शुभवर्तमान यांचा आशय नक्कीच एक असला पाहिजे. पण वेगवेगळ्या धर्मांच्या पवित्र ग्रंथांची भाषा व मतप्रणाली यांत खूपच तफावत आहे. म्हणून हे ग्रंथ असंख्य सत्प्रवृत्त लोकांनी शतकानुशतके पवित्र व पूजनीय मानले असले, तरी ते ईश्वरप्रणीत आहेत असे समजणे बरोबर नाही. परमेश्वर हा एक आहे. तो न्यायी व समदर्शी आहे. म्हणून ईश्वरप्रणीत ग्रंथ जर कोणता असेल तर तो एकच असला पाहिजे, इतकेच नव्हे, तर तो नित्य प्रगट असला पाहिजे. सर्व काळांतील व सर्व देशांतील लोकांना तो वाचता आला पाहिजे; त्याचा अर्थ लावता आला पाहिजे. असा ग्रंथ सुदैवाने प्रत्यक्ष आपल्यासमोर आहे. तो पुरातन काळापासून सर्वांना उपलब्ध आहे. परमेश्वराने निर्माण केलेली सृष्टी हाच तो ग्रंथ होय. त्यात बनावटपणाला वाव नाही. त्यापासून कुणी कुणाला वंचित करू शकत नाही. खऱ्या ईश्वरनिष्ठांचा ( Deists ) एकमेव पवित्र ग्रंथ सृष्टी हा आहे. तेच त्यांचे बायबल आहे. पेन हे खगोलशास्त्राचे अभ्यासक होते. त्यात कसा गणिती

काटेकोरपणा असतो ते त्यांना ठाऊक होते. म्हणून साहजिकच त्यांना या शास्त्रातील दाखला सुचला. अनंत अवकाशात असंख्य तारे व ग्रहगोल वर्षानुवर्षे किती सुयंत्रितपणे आपापल्या कक्षेत फिरत आहेत हे पाहिले म्हणजे नवल वाटते. त्याबरोबरच सृष्टिकर्त्याच्या सर्वज्ञतेचा, कल्पकतेचा, सामर्थ्याचा, ऐश्वर्याचा, औदार्याचा व कल्याणकारकतेचा प्रत्यय येतो. सृष्टिव्यापाराचे जे नियम आहेत त्यांचा जनक ईश्वर आहे. विश्वातील हरएक लहानमोठ्या दृश्यांचे अवलोकन केले, म्हणजे त्याच्या घडणीमागील ईश्वराचा हात जाणवल्याखेरीज राहात नाही. विश्वातील यच्चयावत घडामोडींचे नियम शोधून काढण्याचा विज्ञानाचा प्रयत्न असतो. या नियमांच्या द्वारा ईश्वरी योजनेचा व इच्छेचा मागोवा घेता येतो. धर्मजीवनाच्या परिपूर्तीसाठी ईश्वरनिष्ठा आणि नैतिक सत्याचे अनुसरण या दोन गोष्टी आवश्यक आहेत. त्यासाठी तथाकथित दैवी साक्षात्कारातून सिद्ध झालेल्या धर्मग्रंथाची गरज आहे का? नाही. मुळीच नाही. ईश्वराचे स्वरूप, गुण आणि शक्ती यांचे पूर्ण ज्ञान माणसाला कधीच होऊ शकणार नाही. परंतु त्याला आत्मकल्याणासाठी जेवढे ज्ञान जरूर आहे, तेवढे त्याला सृष्टिविषयक चिंतनातून मिळवता येते; आणि त्यातून त्याची ईश्वरावरची श्रद्धा अधिकाधिक दृढ होत जाते. नैतिकतेचे उगमस्थान तर प्रत्येक माणसाच्या सदसद्विवेकबुद्धीतच आहे. म्हणून ज्यांना विशुद्ध धर्मसाधनेची खरी आच असेल, त्यांना कोणत्याही सांप्रदायिक प्रमाणग्रंथाची किंवा पंथविशिष्ट उपासनापद्धतीची कास धरण्याचे यत्किंचितही कारण नाही.

## मानवताधर्माचा सामाजिक आशय

मानवी समतेचे तत्त्वही पेन यांना त्यांच्या धर्मचिंतनातून स्फुरले; आणि त्यांच्या धर्मविचाराचे ते एक शक्तिकेंद्र बनले. बायबलमधील अनेक भ्रामक कल्पनांचे आणि निराधार कहाण्यांचे जरी त्यांनी वाभाडे काढले होते, तरी येशू ख्रिस्ताच्या नैतिक शुद्धतेबद्दल आणि सत्त्वसंपन्नतेबद्दल त्यांना तिळमात्र शंका नव्हती. सांप्रदायिकतेचे स्तोम कमी करून ख्रिस्ताच्या मूळ मानवतावादी तत्त्वप्रणालीशी आपण जास्तीत जास्त इमान राखले आहे असा पेन यांचा दावा होता. समता आणि बंधुभाव या तत्त्वांचा येशू ख्रिस्तानेही आग्रह धरला होता. सर्व माणसे ही एकाच ईश्वराची लेकरे आहेत. त्यांचे जीवनसत्त्व एकच आहे. त्यांचा दर्जा तत्त्वतः समान आहे. तर्कबुद्धी आणि सदसद्विवेकबुद्धी या मनुष्यमात्राला स्वभावतःच लाभलेल्या ईश्वराच्या अमूल्य देणग्या आहेत. त्यांत कमीजास्तपणा असेल, पण त्यांचा ज्याच्या ठिकाणी लवलेशही नाही असा माणूस आढळणार नाही. म्हणून माणसामाणसात देश, वंश, पंथ, दर्जा, लिंग इत्यादी बाबींवरून भेदभाव करणे हे ईश्वरी योजनेशी विसंगत आहे. एका

माणसाने दुसऱ्या माणसाच्या मनुष्यत्वाची बूज राखली पाहिजे, आणि सर्वांशी बरोबरीच्या नात्याने वागले पाहिजे असा पेन यांचा दृष्टिकोण होता.

ईश्वर आणि मानव यांचा संबंध लक्षात घेता, जगातील सर्व माणसांचा धर्म वास्तविक एकच असावयास हवा. परंतु नजीकच्या काळात तरी अशा विश्वधर्माची स्थापना अशक्यप्राय आहे हे पेन यांनी ओळखले होते. म्हणून त्यांनी धार्मिक स्वातंत्र्याचा निःशंकपणे पुरस्कार केला. प्रत्येक व्यक्तीला वा लोकसमूहाला आपापल्या श्रद्धेप्रमाणे ईश्वराची उपासना करण्यास मोकळीक मिळाली पाहिजे. या बाबतीत शासनाने किंवा कोणत्याही अन्य संस्थेने ढवळाढवळ करणे योग्य नाही. मात्र कुणाच्याही धार्मिक स्वातंत्र्याला इतरांच्या असहिष्णुतेमुळे किंवा आततायीपणामुळे धोका उत्पन्न झाला, तर त्याला संरक्षण देणे हे शासनाचे कर्तव्य आहे असे त्यांचे ठाम मत होते. पेन यांनी आपल्या या धर्मविषयक मतप्रणालीला 'मानवतेचा धर्म' (Religion of Humanity) असे नाव दिले आहे.[२०] ही संज्ञा त्यांनीच प्रथम उपयोगात आणली असे त्यांचे चरित्रकार डॉ. कॉनवे यांनी म्हटले आहे. पेन यांचे वडील क्वेकर पंथाचे होते. बालपणात पेन यांच्या मनावर क्वेकर पंथाच्या 'अंतःप्रकाशाचा धर्म' (Religion of Inner Light) याचे संस्कार झालेले होते. त्यात व्यक्तीची प्रतिष्ठा व आत्मप्रामाण्य या कल्पना अंतर्भूत आहेत हे उघड आहे. पेन यांच्या ग्रंथांची नुसती नावे जरी पाहिली, तरी त्यांनी व्यक्तीची प्रतिष्ठा, स्वातंत्र्य, समता, न्याय, मनुष्याचे नैसर्गिक हक्क व जबाबदारी, बुद्धिनिष्ठा इत्यादी तत्त्वांना आपल्या मतप्रतिपादनात प्राधान्य दिले आहे हे सहज लक्षात येते. 'The world is my country, my religion is to do good.'[२१] जग हाच माझा देश आहे, सर्वांचे भले करणे हा माझा धर्म आहे. हे पेन यांचे ब्रीदवाक्य पाहिले की, साहजिकच आपल्या विचारसरणीला त्यांनी दिलेले 'मानवतेचा धर्म' हे नाव अन्वर्थक आहे असे वाटल्याखेरीज राहात नाही.

जोतीरावांनी ख्रिस्तप्रणीत मानवतावादाचा आशय आधीच आत्मसात केला होता. पण पेनचे ग्रंथ वाचल्यावर त्यांचे विचार अधिक मूलगामी व धारदार बनले. जगातील बहुधा प्रत्येक धर्माचे प्रवक्ते व अनुयायी आपला मूळ धर्मग्रंथ ईश्वरदत्त आहे असे मानतात. या धर्मग्रंथांची चिकित्सक दृष्टीने छाननी केल्यास त्यांत अनेक उणिवा, दोष व विसंगती आढळतात. तेव्हा यांपैकी कोणताच ग्रंथ ईश्वरदत्त नसल्याने त्याचे निरपवाद प्रामाण्य मान्य करण्याची गरज उरत नाही. माणसाच्या विवेचक बुद्धीला बधिरता आणणारी ही ईश्वरदत्त ग्रंथाची कल्पना पसरवण्यात व लोकप्रिय करण्यात निरनिराळ्या धर्मसंस्थांचा वाटा फार मोठा आहे. वास्तविक पाहता सृष्टिविज्ञान आणि सदसद्विवेकबुद्धी यांच्याद्वारे ईश्वराच्या अस्तित्वाची ओळख पटते;

आणि नैतिक प्रश्नांचा निर्णय करता येतो. त्यासाठी दैवी चमत्कार आणि ईश्वरदत्त ग्रंथ यांवर अवलंबून राहण्याची आवश्यकता नाही. जोतीरावांच्या 'सार्वजनिक सत्यधर्म' पुस्तकातील विवेचन लक्षात घेतले, तर त्यांना पेनची ही विचारसरणी मनोमन पटली होती असे दिसते. धार्मिक सांप्रदायिकतेचे जोतीरावांना पहिल्यापासूनच वावडे होते. त्यामुळे कोणत्याही परंपरागत धर्माच्या चौकटीत बंदिस्त होऊन राहणे त्यांच्या प्रकृतीला मानवले नसते. पेन यांचा विश्वधर्म आणि जोतीरावांचा सार्वजनिक सत्यधर्म यांच्या तात्त्विक बैठकीत पुष्कळच साधर्म्य आहे. बायबल आणि ख्रिस्ती धर्मसंस्था यांच्यावर पेन यांनी जो हल्ला चढवला आहे त्याची जोतीरावांनी निश्चितच दखल घेतली असेल, तरी त्यांच्या मनात येशू ख्रिस्ताविषयी जो पूज्यभाव होता, तो कधी ओसरला नाही. "परंतु पुढे जेव्हा तो एक दीनांचा कैवारी, महापवित्र, सत्यज्ञानी, सत्यवक्ता, बळीराजा या जगात उत्पन्न झाला, तेव्हा त्याने जो आपण सर्वांचा उत्पन्नकर्ता व सर्वांचा महापिता त्याचे हेतू मनी धरून ज्याने आपण सर्वांस दिलेल्या सत्यमय पवित्र ज्ञानाचा व अधिकाराचा सर्वांस सारखा उपभोग घेता यावा, यास्तव त्याने एकंदर सर्व भटांसारख्या कृत्रिमी, दुष्ट आणि मतलबी फासेपारध्यांच्या दास्यत्वापासून आपल्या दीन व दुबळ्या आणि गांजलेल्या बांधवांस सोडवून देवाचे राज्य स्थापन करण्याची सुरुवात करून त्याने आपल्या वडील बापांचे काहीसे भविष्य पूर्ण केलेसे वाटते."[२२] अशा शब्दांत जोतीरावांनी येशू ख्रिस्ताचे स्तुतिस्तोत्र गाइले आहे. बायबल हा पवित्र ग्रंथ आहे असे त्यांनी वारंवार म्हटले आहे. तरी देखील त्यातील अद्‌भुत कथाभाग वगळून उदात्त नीतितत्त्वांचाच त्यांनी उदोउदो केला आहे. तसेच महाराष्ट्रात ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी खालच्या जातींतील लोकांना विद्येची गोडी लावण्याचे कार्य हाती घेतले होते. जोतीरावांच्या स्वतःच्या कामातही त्यांनी त्यांना वेळोवेळी साह्य केले होते. त्यांच्याशी काही मतभेद झाले, तरी त्यांच्याविषयीची कृतज्ञतेची जाणीव जोतीरावांनी सदैव कायम ठेवली होती.

### पेन यांचे राजकीय-सामाजिक विचार

पेन यांच्या धार्मिक विचारांनी जोतीराव प्रभावित झाले होते. त्याबरोबरच त्यांनी त्यांच्या राजकीय व सामाजिक विचारांच्या अंतःसूत्राचाही शोध घेतला होता. मानवतेची प्रतिष्ठा, व्यक्तिस्वातंत्र्याचा आग्रह आणि गुलामगिरीचा निषेध ही तत्त्वत्रयी हेच पेन यांच्या समग्र विचारप्रणालीचे अंतःसूत्र होय. वास्तविक पाहता ही तीन तत्त्वे एकमेकांपासून अलग काढता येत नाहीत. स्वातंत्र्याचा आग्रह आणि गुलामगिरीचा निषेध या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत; आणि ही दोन्ही तत्त्वे मुळात मानवतेच्या प्रतिष्ठेत अंतर्भूत आहेत. जोतीरावांनी देखील आपल्या लेखनातून आणि

कृतीतून याच तत्त्वत्रयीचा सातत्याने पाठपुरावा केला आहे.

पेन यांनी विविध विषयांवर लिहिले आहे, परंतु त्यांचे लक्ष प्रथम निग्रोंच्या गुलामगिरीच्या प्रश्नाकडे गेले. 'Justice and Humanity' हा त्यांचा पहिला लक्षणीय लेख. त्यात त्यांनी या प्रश्नाची चर्चा केली आहे. गुलामांच्या व्यापारात किती अमानुषता भरलेली आहे आणि गुलामगिरीची पद्धत किती असमर्थनीय, अनैतिक व उद्वेगजनक आहे ते पेन यांनी आपल्या अजोड युक्तिवादाने या लेखात सिद्ध करून दाखवले आहे. एवढ्या मोठ्या लोकसमूहाला आपल्या देशात आपण अन्यायाने गुलाम म्हणून राबवतो. तेव्हा आपल्याला ब्रिटिश राज्यकर्त्यांना दोष देण्याचा काय नैतिक अधिकार आहे असा प्रश्न त्यांनी अमेरिकेतील लोकांना विचारला आहे. न्यायमूर्ती रानडे यांनी अस्पृश्यांच्या संदर्भात काढलेला अशा अर्थाचा उद्गारही सर्वश्रुत आहे. पेन यांचा हा लेख प्रसिद्ध झाल्यानंतर अवघ्या पाच आठवड्यांत फिलाडेल्फियात पहिली गुलामगिरीविरोधी संस्था स्थापन झाली. त्यानंतर काही महिन्यांनी लिहिलेल्या दुसऱ्या एका लेखात त्यांनी स्त्रीदास्यविमोचनाच्या प्रश्नाला तोंड फोडले आहे. जगातील सर्व भागांत स्त्रीला पुरुषांचा जुलमी अहंगंड आणि असूया यांचा जाच शतकानुशतके सहन करावा लागतो आहे. या लेखात त्यांनी अत्यंत परखडपणे स्त्रीची कैफियत दिलेली आहे. अज्ञात स्थितीत राहून तिने निमूटपणे व निष्ठेने आपले कर्तव्य करीत राहिले पाहिजे. तिने घराबाहेर पडता कामा नये. प्रसिद्धीची व सामाजिक मानमान्यतेची हाव धरता कामा नये. या बाबतीत पाश्चात्त्य व पौरस्त्य समाजचिंतकांचे एकमत आहे. "The most virtuous woman is she who is least talked of."[२३] जिच्याबद्दल कमीत कमी बोलले जाते ती सर्वश्रेष्ठ सत्त्वसंपन्न स्त्री होय असे एका प्रख्यात ग्रीक पंडितबुवाचे मत पेन यांनी या लेखात नमूद केले आहे. आपल्याकडेही जिला चुकून सुद्धा सूर्यदर्शन घडत नाही अशी 'असूर्यंपश्या' स्त्री ही मोठी साध्वी मानली जात असे. तेच खानदानीपणाचे लक्षण समजण्यात येत होते. सर्व बाजूंनी स्त्रीची सुसंस्कृत समाजातही कशी कुचंबणा होते ते स्पष्ट करून पेन यांनी स्त्रीपुरुषांच्या समतेची आवश्यकता प्रतिपादिली आहे. शूद्रातिशूद्रांची आर्थिक व सामाजिक गुलामगिरीतून सुटका आणि स्त्रीदास्यविमोचन हे दोन्ही प्रश्न जोतीरावांच्या खास जिव्हाळ्याचे होते.

अमेरिकेतील स्वातंत्र्ययुद्ध आणि फ्रेंच राज्यक्रांती या दोन्ही जगप्रसिद्ध घटनांशी पेन यांचा जवळचा संबंध आला होता. अमेरिकेतील स्वातंत्र्यसैनिकांचे नीतिधैर्य खचू लागले होते. अशा वेळी पेन यांनी 'Common Sense' ही पुस्तिका आणि 'The American Crisis' ही लेखमाला लिहिली. या युद्धात केवळ अमेरिकेचा प्रश्न गुंतलेला नाही, तर उभ्या मनुष्यजातीचे भवितव्य त्याच्या यशापयशावर अवलंबून

आहे. "These are the times that try men's souls."[२४] या देशातील माणसांच्या सत्त्वपरीक्षेची ही वेळ आहे. या वेळी आपण कच खाल्ली, तर जगाच्या इतिहासाला नवे प्रगतिपर वळण लावण्याची संधी आपण गमावली असे होईल. अशा प्रकारे सर्व संबंधितांना आवाहन करून त्यांनी युद्धभूमीवरचे वातावरण बदलून टाकले. पेन यांचे हे लेखन विलक्षण प्रभावी ठरले. 'कॉमन सेन्स' या पुस्तिकेच्या पाच लाख प्रती खपल्या; आणि दुसऱ्या लेखमालेलाही फार मोठा प्रतिसाद मिळाला. पेन नुसते लेखन करून थांबले नाहीत; तर ते सैन्यातही दाखल झाले होते. अमेरिकेचे स्वातंत्र्ययुद्ध यशस्वी झाले; याचे श्रेय वाशिंग्टनच्या तलवारीइतकेच पेनच्या लेखणीलाही आहे, याबद्दल त्या काळी कुणालाच शंका नव्हती. पेन यांच्या सर्व लेखनात प्रामुख्याने लोकशाहीच्या मूलतत्त्वांचे विवरण आहे. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर एडमंड बर्क यांचे 'Reflections on the Revolution in France' हे पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यातील प्रतिगामी विचारसरणीचे खंडन करण्यासाठी पेन यांनी 'The Rights of Man' हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाचे दोन भाग आहेत. पहिला भाग अमेरिकेच्या संघराज्याचे पहिले अध्यक्ष जॉर्ज वाशिंग्टन यांना अर्पण केला आहे. दुसरा भाग फ्रान्सच्या राष्ट्रीय सैन्याचे प्रमुख लाफायत यांना अर्पण केला आहे. हे दोघेही पेन यांचे मित्र होते. पुढे पेन आणि वाशिंग्टन यांचे संबंध बिघडले. 'मानवी अधिकार' हा शब्दप्रयोग जोतीरावांच्या लेखनात वारंवार येतो. पेन यांच्या ग्रंथामुळे आपल्या देशभक्तिविषयक भ्रामक कल्पना दूर झाल्या असे त्यांनी स्वतःच म्हटले आहे. याच संदर्भात वाशिंग्टन व लाफायत यांचा उल्लेख त्यांनी केला आहे. आपल्याकडे देशाभिमानाची परंपरा नव्हती व अजूनही ती पुरेशी व्यापक व दृढमूल झालेली नाही. देश म्हणजे विशिष्ट भूप्रदेश नव्हे, तर त्यातील लोक, सर्व थरांतील लोक. त्यांचे सुख, स्वातंत्र्य आणि मानवी अधिकार यांसाठी प्रयत्नशील असणारे कार्यकर्ते हेच सच्चे देशभक्त होत. खालच्या जातींतील आपल्या देशबांधवांना पशूपेक्षाही नीच समजणाऱ्या लोकांचा देशाभिमान हा अपवित्र देशाभिमान होय. जुन्या धार्मिक परंपरेवर आधारलेल्या आपल्या राजकीय चळवळीपासून खेड्यापाड्यांतील जनसमुदाय अजून लांबच आहे. त्याच्याशी बरोबरीच्या नात्याने वागण्याचे आपल्या देशभक्तांना अद्याप अगत्य वाटत नाही. म्हणून खरा पवित्र देशाभिमान अंगी बाणवून घ्यायचा असेल, तर वाशिंग्टन व लाफायत यांचा आदर्श डोळ्यांपुढे ठेवला पाहिजे अशी जोतीरावांची भावना होती.

### परमहंस सभेशी जवळीक

पेन यांच्या विचारांची ओळख झाल्यावर जोतीराव प्रॉटेस्टंट खिस्तीमताच्या

कक्षेतून बाहेर पडले. मुंबई व पुणे येथील सुशिक्षित तरुणांत धर्मविषयक चर्चा चालूच होती. जोतीरावांनी या सर्वांशी नित्य संपर्क ठेवला होता. त्यातून नव्याने स्थापन झालेल्या परमहंस सभेचे काही सभासद आपले समानधर्मे आहेत याचा त्यांना प्रत्यय आला. सर्व धर्मग्रंथ मनुष्यनिर्मित, सृष्टी एकमेव ईश्वरदत्त ग्रंथ, सत्यनिष्ठा व नीतिपरता यांवर भर, जातिभेद व अस्पृश्यता यांना विरोध, स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह व पुनर्विवाह यांना पाठिंबा इत्यादी बाबतींत परमहंस मंडळी व जोतीराव यांची मते मिळतीजुळती होती. या सभेचे आद्य प्रवर्तक दादोबा पांडुरंग यांच्या ' धर्मविवेचन ' व ' पारमहंसिक ब्राह्मधर्म ' या दोन्ही पुस्तकातील विचारांची बांधणी लक्षात घेतली, तर त्यांच्या पाहण्यात पेनचे ग्रंथ आले असावेत असे म्हणावेसे वाटते. सुरतेस गेल्याबर दादोबांनी धर्मसुधारणेसाठी जी संस्था स्थापली, तिला त्यांनी ' मानवधर्मसभा ' असे नाव दिले होते. पेनप्रमाणेच दादोबांनीही सत्य आणि नीती याना आपल्या धर्ममीमांसेत अग्रस्थान दिले होते. " सत्यधर्म सांगण्याचा तुमचा उद्योग आहे तरी त्याचा वृत्तान्त लिहून काढा, व आपल्याशी सहमत कोण आहेत त्यांची नोंद करा " अशी दलपतरामांनी त्यांना सूचना केली होती. परमहंस सभा ही मानवधर्मसभेची धाकटी बहीण होय परमहंस सभेविषयी जोतीरावांना आपुलकी होती. बाबा पदमनजी व भवाळकर हे या सभेचे दोघे सभासद त्यांचे मित्र होते. आपला ' छत्रपती शिवाजी राजे भोसले यांचा पवाडा ' त्यांनी परमहंस सभेचे अध्यक्ष राम बाळकृष्ण यांना अर्पण केला आहे. प्रत्येक समारंभाच्या किंवा बैठकीच्या शेवटी ईश्वराची प्रार्थना करण्याची जोतीरावांचीही रीत होती. या संस्थेची धर्मविषयक विचारसरणी जरी त्यांना बहुतांशी पटत होती, तरी तिचे धोरण व एकंदर कार्यपद्धती ही त्यांना पसंत पडण्याजोगी नव्हती. आपली सर्व चर्चा, ठराव आणि कार्य याबाबत गुप्तता राखण्याची या संस्थेच्या सभासदांची धडपड आणि सभासदांची यादी बाहेर फुटताच त्यांची उडालेली तारांबळ या गोष्टी धर्मसुधारणेच्या कार्याला अत्यंत विघातक होत्या. जोतीरावांना अशा भ्याडपणाचा स्वभावतःच तिटकारा होता. परक्या मुलखात येऊन खिस्ती धर्मोपदेशक निःशंकपणे आपल्या धर्माचा प्रसार करतात. कितीही छळ झाला तरी आपला नित्यक्रम ते सोडत नाहीत. उलट धर्मसुधारणेचे कंकण बांधलेले आपले सुशिक्षित तरुण आपल्याच लोकांत जाण्यास कचरतात हे पाहून जोतीराव खचितच अस्वस्थ झाले असतील. जोतीरावाच्या आयुष्यात त्यांनी अखेरपर्यंत अशा कमकुवतपणाला थारा दिला नाही. शिवाय एकदा कोणताच धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत नाही, मनुष्याच्या मनात जे सद्विचार व सद्वासना उत्पन्न होतात ती मात्र ईश्वरी प्रेरणा होय असे म्हणायचे आणि पुन्हा माझ्या या प्रतिपादनात माझ्या पदरचा एक शब्ददेखील नाही; वेद, शास्त्र, पुराणे

यांचे विवेचन करून पाहिले असता हाच त्यांचा मुख्य सिद्धान्त होय असे सांगायचे[२५] ही दादोबांच्या प्रतिपादनातील विसंगती आणि तिच्या मुळाशी असलेले मनाचे दुभंगलेपण या गोष्टी जोतीरावांना खटकल्याखेरीज राहिल्या नसतील. परमहंस मंडळीच्या सभासदांच्या दृष्टीपुढे सामान्यतः शहरी पांढरपेशा वर्ग होता. खेड्यापाड्यांतील कष्टकरी लोकांच्या धर्मजीवनाचा त्यांनी कधी विचारच केला नाही. मग त्यात सुधारणा घडवून आणण्याची इच्छा त्यांना कुठून होणार ? जोतीरावांना तर या लोकांच्याच भवितव्याची चिंता होती. म्हणून कालांतराने जोतीरावांना वेगळा मार्ग शोधावा लागला. परमहंस मंडळीचे अनुयायी प्रार्थनासमाजात गेले. जोतीरावांनी सत्यशोधक समाज स्थापला.

## जीवितकार्याचा शोध

जोतीरावांनी इ. स. १८४८ मध्ये सार्वजनिक जीवनात प्रवेश केला. तेव्हा त्यांना प्रथम आपण स्त्रियांच्या व अतिशूद्रांच्या शिक्षणाचे कार्य हाती घ्यावे असे वाटले. त्यापूर्वी वीसपंचवीस वर्षे तरी महाराष्ट्रात ख्रिस्ती धर्मोपदेशकांचे शिक्षणप्रसाराचे कार्य चालू होते. त्यांच्याशी आपले अनेक बाबतींत मतभेद असले, तरी देखील त्यांच्या योजनाबद्ध कार्यपद्धतीचे नीट निरीक्षण करून मगच आपण प्रत्यक्ष कार्यास सुरुवात करावी असा विचार त्यांना सुचला. आपले मित्र सदाशिवराव गोवंडे यांच्या बरोबर ते अहमदनगरला गेले; आणि तेथील फारार मडमेच्या कन्याशाळा त्यांनी पाहिल्या. पुण्यास परत आल्यावर त्यांनी अस्पृश्यांच्या मुलींसाठी एक शाळा काढली. मुलींच्या शिक्षणाला आपल्या धर्माची अनुज्ञा नाही अशी जुन्या शास्त्रीपंडितांची समजूत होती. त्यात पुन्हा शाळेत जाणाऱ्या मुली अंत्यजांच्या. तेव्हा या उपक्रमाला सनातनी लोकांनी जोरदार विरोध केला असला तर नवल नाही. अशा स्थितीत शाळेत नुसते पुरुष शिक्षक असले, तर अडचणींत आणखीच भर पडणार. त्या दृष्टीने अध्यापनासाठी एखादी शिक्षिका मिळाली तर बरे. म्हणून जोतीरावांनी आपल्या पत्नी सावित्रीबाई यांना स्वतः शिक्षण दिले; आणि त्या त्यांच्याबरोबर नियमितपणे शाळेत येऊ लागल्या. चूल व मूल यांत गुंतून न पडता घराचा उंबरठा ओलांडणारी व सामाजिक कार्यात भाग घेणारी महाराष्ट्रातील पहिली स्त्री सावित्रीबाई याच होत. आपला सगळा समाजच इथून तिथून रूढिपूजक होता. मग एका शूद्र स्त्रीने अशा प्रकारे आपली पायरी सोडून वागणे हे तत्कालीन उच्चवर्णियांना साहजिकच सहन झाले नाही. त्यांनी जे अकांडतांडव करायचे ते केलेच, परंतु जोतीरावांच्या माळी जातीतील लोकांनाही त्यांचे हे कृत्य पसंत पडले नाही. या सर्वांनी मिळून जोतीरावांच्या वडिलांवर सतत दडपण आणले; मुलाला सुनेसह घराबाहेर

काढण्यास भाग पाडले. तरी एकदा हाती घेतलेले कार्य सोडून देण्याची कल्पनाही फुले पति-पत्नींच्या मनाला शिवली नाही.

सावित्रीबाईंनी जोतीरावांना अखेरपर्यंत समरसतेने व सातत्याने साथ दिली. परंतु समाजपरिवर्तनाच्या कार्यात त्या केवळ त्यांची सावली होऊन राहिल्या नाहीत. त्यांचे व्यक्तित्व जोतीरावांच्या व्यक्तिमत्त्वाशी संवादी असले, तरी स्वतंत्र होते. त्यांचे विचार त्यांनी डोळसपणे ग्रहण केले होते. त्यांची तत्त्वप्रणाली त्यांनी तत्परतेने आत्मसात केली होती. सावित्रीबाईंच्या चरित्रात त्यांची कार्यनिष्ठा व नीतिधैर्य यांची ग्वाही देणारे कितीतरी प्रसंग आढळून येतात. सनातनी लोकांनी कितीही अडथळे आणले, तरी शेवटी आपल्या तत्त्वांचाच विजय होणार याबद्दल त्यांना शंका नव्हती. त्या दृष्टीनेच त्यांनी माहेराहून जोतीरावांना १०-१०-१८५६ रोजी लिहिलेल्या पत्रात "पुण्यास आपल्याविषयी दुष्टावा माजविणारे विदूषक पुष्कळ आहेत. तसेच येथेही आहेत. त्यांना भिऊन आपण हाती घेतलेले कार्य का सोडून द्यावे ? सदासर्वदा कामात गुंतावे, भविष्यातले यश आपलेच आहे"[२६] असा आशावाद प्रगट केला आहे.

घराचा आधार तुटल्यामुळे जोतीरावांना उदरनिर्वाहाकरिता स्वतंत्र व्यवसाय शोधावा लागला. या गडबडीत शाळेतील मुलींची संख्या रोडावली, आणि काही काळ ही शाळा बंद पडली. पुढे सर्व काही स्थिरस्थावर होऊन जरा उसंत मिळताच नंतरच्या पाचसहा वर्षांत जोतीरावांनी सर्वांच्यासाठी तीन मुलींच्या शाळा आणि महारमांग आदी अस्पृश्यांच्या मुलामुलींसाठी आणखी तीन शाळा अशा एकंदर सहा शाळा स्थापन केल्या. अस्पृश्यांना शिक्षणाची ओढ नव्हती, तेव्हा लहुजी मांग आणि राणबा महार यांनी आपल्या लोकांची समजूत घालून मुलांना शाळेत धाडण्यास प्रवृत्त केले. या कामात त्यांना आपल्या उच्चवर्णीय मित्रांचे सुरुवातीपासून सहकार्य मिळाले. या शाळांची व्यवस्था पाहण्यासाठी त्यांनी ज्या दोन समित्या नेमल्या, त्यांत जगन्नाथ सदाशिव, अण्णा सहस्रबुद्धे, केशव शिवराम जोशी, विष्णु मोरेश्वर भिडे, बापू रावजी मांडे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री पंडित, सदाशिवराव गोवडे, मोरोपंत वाळवेकर, सखाराम यशवंत, बाबा मनाजी डेंगळे हे लोक होते. सर आर्स्किन पेरी, लूम्सडेन, रीव्हज, कँडी इत्यादी सरकारी अधिकाऱ्यांची व मिचेलप्रभृती ख्रिस्ती धर्मोपदेशकांची सक्रिय सहानुभूती त्यांनी संपादन केली होती. शाळांना दक्षिणा प्राइझ कमिटीचे अनुदानही मिळाले होते. जुन्या पिढीतील बहुसंख्य लोकांचा तीव्र विरोध असला, तरी नव्या पिढीतील सुशिक्षितांनी जोतीरावांच्या या शिक्षणकार्याचे मनापासून स्वागत केले होते. विष्णुपंत थत्त्यांसारख्यांनी शिकवण्याच्या कामात मदत केली. केशवराव भवाळकर ( जोशी ) यांनी सावित्रीबाईंना स्वयंशिक्षणाच्या बाबतीत मार्गदर्शन केले. कुणी थोड्याबहुत देणग्या देऊन मदत केली.

इतरांनी नुसता नैतिक पाठिंबा दिला. परंतु लोकक्षोभाला खंबीरपणे तोंड देण्यास मात्र जोतीराव–सावित्रीबाईंनाच पुढे व्हावे लागले. या कामगिरीबद्दल सरकारने दोनशे रुपयांची शालजोडी देऊन विश्रामबागवाड्यात त्यांचा जाहीर सत्कार केला. त्याला उत्तर देताना त्यांनी ‘ ईश्वराची इच्छा व सदसद्विवेकबुद्धीचा आदेश यांना स्मरून आपण आपले कर्तव्य केले ’ असे म्हटले होते. त्यांच्या ईश्वरनिष्ठ मानवतावादावरील क्रियाशील श्रद्धेचेच हे द्योतक आहे.

जोतीरावांच्या जीवितकार्याचे १८४८–१८६५ आणि १८६५–१८९० असे दोन कालखंड पडतात. पहिल्या कालखंडात त्यानी स्त्रीदास्यविमोचन आणि दलितोद्धार या प्रश्नांकडे लक्ष दिले. उच्चवर्णियांच्या सुधारणावादातही स्त्रियांच्या प्रश्नांनाच अग्रक्रम मिळाला होता. जांभेकरांच्या ‘ दर्पण ’ पत्रातून त्या प्रश्नांवर अनेक लेख, टिपणे व पुस्तिका प्रसिद्ध झाल्या होत्या. लोकहितवादींच्या शतपत्रांचा बराचसा भाग तर स्त्रीशिक्षण, बालविवाह, केशवपन, पुनर्विवाह इत्यादी विषयांनी व्यापलेला आहे. इ. स. १८४९ मध्ये स्टुडंट्स लिटररी अँड सायंटिफिक सोसायटीने मुंबईत मराठी मुलींसाठी तीन आणि पार्शी मुलींसाठी चार अशा एकूण सात शाळा काढल्या होत्या. या कामात दादाभाई नौरोजी, नारायण दीनानाथजी, महादेवशास्त्री कोल्हटकर, भास्कर दामोदर पाळंदे यांसारख्या लोकांनी पुढाकार घेतला होता. १८५६ मध्ये पुनर्विवाहाला कायदेशीर मान्यता मिळाली होती. जोतीरावांनी कन्याशाळा काढल्या, पुण्यास सारसबागेत त्यांनी एक पुनर्विवाह घडवून आणला. या उपक्रमांना तत्कालीन सुशिक्षितांनी थोड्या प्रमाणात का होईना उत्स्फूर्तपणे साथ दिली. याचे कारण महाराष्ट्रात या प्रश्नांवर लोकमत जागृत होऊ लागले होते, हेच होय. मात्र या सुधारणा अमलात आणताना जोतीरावांची जी धडाडी व नीतिधैर्य दिसून आले, त्यात त्यांचे वास्तविक मोठेपण आहे. उच्चवर्णीय सुधारकांच्या अंगी विष्णुशास्त्री पंडितांसारखा एखादा अपवाद वगळल्यास या गुणांचा अभावच होता. जोतीराव अगदी वेगळ्या वातावरणात वाढले होते. ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या सहवासात त्यांना दलितोद्धाराचे महत्त्व उमगले होते. त्यामुळे त्यांना अस्पृश्यांच्या शिक्षणाचा प्रश्न जिव्हाळ्याचा वाटला. मात्र यासंबंधीचा त्यांचा त्या काळातील दृष्टिकोण बहुतांशी दयार्द्रतेचा व उद्धाराचा होता. अस्पृश्यांच्या शाळांची परीक्षा इ. स. १८५३ मध्ये मेजर कँडी यांच्या अध्यक्षतेखाली झाली. या समारंभात भाषण करताना जोतीराव म्हणाले, “ महार, मांग, चांभार हे या देशात फार असून ते अगदी नीचावस्थेत आहेत. हे पाहून ईश्वराच्या प्रेरणेने माझ्या मनात अशी इच्छा उत्पन्न झाली की, अस्यांस सुशिक्षित करण्याविषयी काही तरी उपाय योजावा. ” [२७] पांढरपेशा समाजातील स्त्रीशिक्षणाच्या कार्याच्या मानाने दलितोद्धाराचे हे कार्य पुष्कळच बिकट होते यात

शंका नाही. तरी या दोन्ही कार्यांतील जोतीरावांची दृष्टी ही विधायक स्वरूपाची होती. म्हणूनच त्यांचे धोरणही बरेचसे सहिष्णुतेचे व सर्वसंग्राहक होते. या शाळांच्या कामकाजात त्यांनी सुमारे नऊदहा वर्षे लक्ष घातले.

जोतीराव वैयक्तिक मैत्रीलाही हमखास जागणारे होते. सन १८५० च्या सुमाराची गोष्ट. दक्षिणा फंडातून शिल्लक राहिलेल्या ३००० रुपयांपैकी निम्मी रक्कम मराठीतील नव्या स्वतंत्र व भाषांतरात्मक पुस्तकांना बक्षिसे देण्यासाठी खर्च करावी असा पुण्याच्या सरकारी विद्यालयातील विद्यार्थ्यांनी आणि लोकहितवादीप्रभृती सुधारकांनी सरकारकडे अर्ज केला होता. तो मंजूर झाल्यास ब्राह्मणांची दक्षणा बुडणार म्हणून सनातनी लोकांनी या अर्जदारांविरुद्ध ग्रामण्य उभे केले होते. त्यांच्यावर बहिष्कार पडण्याची शक्यता होती. यांपैकी बरेचजण जोतीरावांचे मित्र होते. तेव्हा त्यांनी आपणच हा अर्ज लिहिला असे चौकशीच्या वेळी सांगण्यास त्यांना संमती दिली. तसे त्यांनी सांगितल्यामुळे अनायासे या मंडळीवरचे बहिष्काराचे संकट टळले. या प्रसंगी काही गडबड झालीच तर सुधारकांच्या संरक्षणासाठी जोतीरावांच्या सांगण्यावरून दोनशे महार मांग चांभार रामोशी तुळशीबागेजवळच्या रस्त्यावर येऊन थांबले होते.[२८] दलित समाजात त्या वेळीही जोतीरावांच्या शब्दाला किती मान होता याचा हा सबळ पुरावाच होय.

जोतीरावांचे अनेक ब्राह्मण सहकारी मित्र होते. या उच्चवर्णीय तरुणांच्या सामाजिक सुधारणेच्या कार्याला त्यांच्या पूर्वसंस्कारांमुळे आपोआप काही मर्यादा पडल्या होत्या. त्यांच्याबरोबर काम करताना जोतीरावांना त्या उत्तरोत्तर अधिकाधिक जाणवू लागल्या. त्यांच्याशी त्यांचे वारंवार मतभेद होऊ लागले. “ जेव्हा मी त्या शाळांत भटांच्या पूर्वजांच्या कृत्रिमी पुस्तकांतील लबाड्या उघड्या करून मुलांस दाखवू लागलो, तेव्हा त्यांचा माझा आतल्या आत बोलण्या-चालण्यामध्ये बेबनाव होऊ लागला. त्यांचे म्हणण्याचा कल असा दिसून आला की, या अतिशूद्रांच्या मुलांस विद्या मुळीच देऊ नये. जर कदाचित त्यास शिकविणेच भाग पडले, तर त्यांची साधारण अक्षरओळख मात्र करून द्यावी. माझे म्हणणे असे होते की, त्यांना चांगले प्रतीची विद्या देऊन तिजपासून त्यांस आपले बरेवाईट समजण्याची शक्ती यावी.”[२९] आपली भूमिका न्याय्य व सयुक्तिक आहे याबद्दल जोतीरावांना मुळीच शंका नव्हती. परंतु ते आपल्या उच्चवर्णीय सहकाऱ्यांचे मतपरिवर्तन करू शकले नाहीत; आणि त्यांच्यातील मतभेद दिवसेंदिवस तीव्रतर होत गेले. यापुढे एकत्र काम करणे अशक्य आहे अशी खात्री होताच जोतीराव या दोन्ही शिक्षणसंस्थांतून बाहेर पडले.

याच सुमारास अठराशे सत्तावनचे बंड उद्भवले. बंडवाल्यांचा बीमोड होऊन

इंग्रज सरकारचा जय व्हावा असेच जोतीरावांना मनापासून वाटत होते. या सशस्त्र राजकीय उठावाची त्यांनी 'भटपांड्यांचे बंड', 'कोंतुशी चपाती बंड' अशा शब्दांनी संभावना केली आहे, इतकेच नव्हे तर 'धिक्कार असो त्यांच्या चपातीतील आणि वरणभातातील गूढास' असा त्याचा अधिक्षेपही केला आहे.[३०] नानासाहेब, तात्या टोपे या बंडवाल्यांच्या पुढाऱ्यांचे त्यांनी वाभाडे काढले आहेत. शिंदे, होळकर यांसारख्या संस्थानिकांनी संकटकाळी इंग्रज सरकारास साह्य केले म्हणून त्यांना धन्यवाद दिले आहेत. बंडाच्या धामधुमीत पुण्यात गणू माळी आणि मौलवी नुरूल हुदा यांना पकडून शिक्षा फर्मावण्यात आली होती. हे दोघेही जोतीरावांच्या मित्र-परिवारातील होते. त्यामुळे युरोपियन लोकांच्या मनात जोतीरावांविषयी संशय उत्पन्न झाला. त्यांच्यापैकी बरेचजण जोतीरावांच्या कार्याला मदत करीनासे झाले. "तेव्हा-पासून एकंदर सर्व युरोपियन सभ्य गृहस्थ माझ्याशी पहिल्यासारखे नीट मन उगाळून न बोलता ते मला पाहिल्याबरोबर आपल्या कपाळास आठ्या घालू लागले. तेव्हा मी त्यांच्या घरी जाणे-येणे अगदी बंद केले.[३१]

## सत्यशोधक समाज व सामाजिक संघर्ष

मुंबई विद्यापीठाच्या स्थापनेनंतर महाराष्ट्रात सुशिक्षितांची एक नवी पिढी उदयास आली होती पाश्चात्त्य देशांतील सामाजिक संस्थांचे व विचारप्रणालींचे त्यांचे आकलन अधिक खोल व सर्वस्पर्शी होते. इंग्रजी साहित्य व इंग्लंडचा इतिहास वाचून त्यांना राष्ट्रकल्पनेची तोंडओळख झाली होती. दळणवळणाची साधने, एक शिक्षणपद्धती, एक कायदेपद्धती, एकाच धर्तीची प्रशासनयंत्रणा यांमुळे भारतातील सुशिक्षित वर्गात एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण होऊ लागली होती. आपला धर्म, तत्त्वज्ञान, साहित्य, इतिहास यांचे महाराष्ट्रातील विचारवंतांनी राष्ट्रीय वृत्तीने पण आधुनिक चिकित्सापद्धती स्वीकारून परिशीलन केले. त्यातील गौरवास्पद भाग लोकांच्या पुढे ठेवून त्यांची स्वत्वभावना जागृत करण्याचा आणि त्यांना आपल्या व्यापक सामाजिक कर्तव्याची जाणीव करून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला. युरोपातील प्राच्यविद्या-पंडितांचे संशोधन व समीक्षा ही त्यांच्या अवलोकनात आली होती. भाषाशास्त्र, प्राचीन इतिहास, अभिजात साहित्य आणि तत्त्वज्ञान या दृष्टीने त्यांनी प्राच्य विद्येचे जे गुणगान केले होते, त्यामुळे आपल्या ज्ञानोपासकांचा व नेत्यांचा उत्साह द्विगुणित झाला. मात्र या सामाजिक प्रबोधनाचे क्षेत्र उच्चवर्णीय सुशिक्षितांपुरतेच मर्यादित होते. जुन्या शास्त्रीपंडितांचे पुढारीपण आता संपुष्टात आले होते. महाराष्ट्राच्या सामाजिक जीवनात दोन नवे मतप्रवाह मूळ धरू पाहात होते. त्यांपैकी एक परंपरा-निष्ठ जहाल संप्रदायाचा व दुसरा समन्वयशील प्रागतिक संप्रदायाचा. या दोन्ही

संप्रदायांचे भावनात्मक अधिष्ठान राष्ट्रवाद हेच होते. प्राचीन हिंदू परंपरेचे गोडवे गाणाऱ्या आधुनिक जहाल संप्रदायाबद्दल जोतीरावांना यत्किंचितही सहानुभूती नव्हती. या परंपरावादी लोकांचा देशाभिमान अत्यंत संकुचित, स्थितिप्रिय व आत्ममतलबी आहे, तेव्हा त्यांच्याशी झगडा अटळ आहे अशी महात्मा फुले यांची धारणा होती. कुणालाही न दुखवता नव्या-जुन्याचा समन्वय करीत करीत संथपणे सुधारणा घडवून आणण्याची नेमस्त प्रागतिक संप्रदायाची कार्यपद्धती जोतीरावांच्या मते सदोष होती. त्यांच्या मार्गाने सामाजिक प्रगतीची मोठी मजल कधीच गाठता येणार नाही अशी त्यांची खात्री पटली होती. बंडाच्या पूर्वी ब्रिटिश सरकारने सुधारणेला पोषक असे काही कायदे केले होते. त्यानंतर मात्र त्यांनी अतिसावधगिरीचे धोरण स्वीकारले. बोलण्याप्रमाणे कृती करण्याची धमक न दाखवल्याने सुधारकांना जनमनाची पकड घेता आली नाही. उलट पुनरुज्जीवनवादी संप्रदाय येथे लोकप्रिय झाला. उच्चवर्णीय जगतातील या स्थित्यंतराकडे जोतीरावांचे बारीक लक्ष होते. युरोपियन लोकाशी असलेला त्यांचा ऋणानुबंध संपला होता. समन्वयशील सुधारकांच्या सदिच्छेचा फारसा उपयोग नव्हता. अर्थातच ध्येयसिद्धीसाठी आपला नवता सुभा स्थापन करण्याखेरीज जोतीरावांना गत्यंतर उरले नाही. शूद्रातिशूद्रांची स्थिती सुधारायची असेल, तर फुटकळ सुधारणावर विसंबून न राहता मूलगामी समाजपरिवर्तनासाठी झटले पाहिजे. चार शाळा चालवून काय होणार ? सगळ्या कष्टकरी समाजालाच हरप्रयत्नाने जाग आणली पाहिजे आपल्या मानवी अधिकारांची आवश्यकता त्याना पटवून देऊन ते प्राप्त करून घेण्यासाठी संघटितपणे झगडण्यास त्यांना प्रवृत्त केले पाहिजे. यासाठी एका स्वतंत्र सवर्णप्रवण संस्थेची गरज आहे हे लक्षात घेऊन जोतीरावांनी सत्यशोधक समाजाची स्थापना केली. तेव्हापासून त्यांच्या सार्वजनिक जीवनातील दुसरा कालखंड अधिक प्रभावीपणे सुरू झाला.

धार्मिक व सामाजिक गुलामगिरी समूळ नष्ट करणे हे सत्यशोधक समाजाचे मुख्य उद्दिष्ट होते. "ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये इत्यादिक लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकांना मुक्त करण्याकरिता व आपल्या मतलबी ग्रंथांच्या आधारे आज हजारो वर्षे ते शूद्र लोकास नीच मानून गफलतीने लुटीत आले आहेत. यास्तव सदुपदेश व विद्याद्वारे त्यांस त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरिता म्हणजे धर्म व व्यवहारसंबंधी ब्राह्मणाचे बनावट व कार्यसाधक ग्रंथापासून त्यास मुक्त करण्याकरिता काही सुज्ञ शूद्र मंडळींनी हा समाज ता. २४ सप्टेंबर १८७३ इसवी रोजी स्थापन केला." [३२] जोतीरावांच्या या उपक्रमाला बहुजनसमाजातील जाणत्या लोकांकडून उत्तम प्रतिसाद मिळाला. डॉ. विश्राम रामजी घोले, रामशेट बापूशेट उरवणे, राजन्ना लिंगू, रामय्या व्यंकय्या आय्यावारू, नारायणराव नगरकर, लक्ष्मण

हरी शिंदे, रामचंद्र विठोबा धामणसकर, सुरतसिंग रामदीन इत्यादी छोटेमोठे गृहस्थ या समाजाचे सदस्य होते. हरी गणेश पटवर्धन, विनायक बापूजी भांडारकर यांच्यासारख्या उच्चवर्णीय हितचिंतकांचा त्याला पाठिंबा होता. अनेक जातींचे व विविध व्यवसायांतील लोक या संस्थेच्या कार्यात सहभागी झाले होते. दुसऱ्या वर्षाच्या अखेरीस सभासदसंख्या २३२ होती. ती पुढील वर्षात ३१६ वर गेली. जोतीरावांचे मन नेहमीच खुले व स्वागतशील असे. पण कुठल्याही गोष्टीच्या बाह्यांगाचे अनुकरण करण्याची त्यांची प्रवृत्ती नव्हती. परमहंस सभेचा दीक्षाविधी काहीसा ख्रिस्ती वळणाचा होता. जोतीरावांनी मात्र महाराष्ट्राच्या परंपरेचे भान राखून सत्यशोधक समाजाचा दीक्षाविधी ठरवला. जो कोणी सभासद होईल त्याचे नाव नोंदणीबुकात दाखल करीत. "त्याची प्रतिज्ञा म्हणजे तळी उचलून त्यातील भंडार गुलाल कपाळास लावण्याचा संस्कार होता."[३३]

पहिल्या कालखंडात सरकारी अधिकारी व ख्रिस्ती धर्मोपदेशक आणि उच्चवर्णीय मित्र यांच्यावर जोतीरावांची बरीचशी भिस्त होती. आता ज्यांच्या दास्यमुक्तीसाठी चळवळ करायची, त्यांच्या बळावरच अवलंबून राहण्याचे जोतीरावांनी ठरवले.

विधायक आणि आक्रमक अशा दोन्ही पद्धतींनी कार्य करण्याची जोतीरावांना गरज भासली. सत्यशोधक समाजाचा मुख्य लढा धर्मसंस्थेशी; त्यातही विशेष करून भिक्षुकशाहीशी होता. धर्मसंस्थेचे वर्चस्व झुगारून देऊन जुन्या हानिकारक समजुती व अनिष्ट रूढी सोडून देताना सनातनी ब्राह्मणांचा विरोध तर होतच होता. पण बहुजनसमाजातील अंधश्रद्धेचा, धर्मभोळेपणाचाही अडथळा येत होता. त्यांना तोंड देऊन खऱ्या विशुद्ध धर्माचा अंगीकार करण्याची जोतीरावांनी आपल्या अनुयायांना प्रेरणा दिली. समाजाची नियमावली निश्चित करण्यात आली होती. तिच्या हजार प्रती छापून घेऊन माहितीकरिता सर्व सभासद व हितचिंतक यांच्याकडे पाठवल्या होत्या.

जुन्या सनातनी परंपरेचे आचारविचार टाकून देण्याची जेव्हा आपण लोकांना शिकवण देतो, तेव्हा नव्या धर्माच्या जीवनसरणीचे दिग्दर्शन करण्याचीही आपली जबाबदारी आहे हे जोतीरावांना चांगले ठाऊक होते. म्हणून अनेकविध शास्त्रविहित संस्कारांचा आणि पूजाविधीतील अर्थशून्य व दिखाऊ उपचारांचा फापटपसारा कमी करून अत्यावश्यक अशा मोजक्या धर्मकृत्यांचे विधी त्यांनी एका स्वतंत्र पुस्तिकेत आणि सार्वजनिक सत्यधर्म पुस्तकात सांगितले आहेत. पुस्तिकेत विवाह, वास्तुशांती आणि दशपिंड, सार्वजनिक सत्यधर्म पुस्तकात इतर संस्कारांबरोबर प्रेताची गती आणि श्राद्ध यांचा अंतर्भाव आहे. हे सर्व निवेदन अत्यंत सोप्या मराठीत व अगदी सुटसुटीत स्वरूपाचे आहे. "हल्ली धर्मविधी करताना नामधारी ब्राह्मण जे मंत्र किंवा मंगळाष्टके म्हणतात, त्याचा संबंध प्रस्तुतचे विवाहास किंवा वेळासही नसून, त्या मंगळाष्टकांचा

व मंत्रांचा काय अर्थ हेही आमचे लोकांस समजत नसल्यामुळे केवळ आंधळ्यांचे व बहिऱ्यांचे बाजाराप्रमाणे होत आहे. म्हणून सत्यशोधक समाजाकडून विवाह व इतर कार्यासंबंधाचे धर्मविधी चालविण्यास कोणासही अडचण पडू नये, म्हणून ते प्राकृत आणि सोपे असे तयार केले आहेत." [३४] जोतीरावांचा यामधील दृष्टिकोण अगदी स्पष्ट आहे. ब्राह्मण भिक्षुक न बोलावता ज्यांनी त्यांनी आपल्या मुलामुलींची लग्ने सर्वसामान्य लोकांतील पंचांसमक्ष सत्यशोधक समाजाने मंजूर केलेल्या विधी-प्रमाणे करावीत असा त्यांचा आग्रह होता. अशी लग्ने लावून देऊन त्यांनी स्वतःच जातिसंस्थेला व पुरोहितशाहीला पहिला तडाखा दिला. त्यांचे उदाहरण डोळ्यांपुढे ठेवून त्यांच्या काही अनुयायांनीही अशी लग्ने घडवून आणली. काहीजणांनी रूढीचे निर्बंध दुर्लक्षून इतर लहानमोठी धर्मकृत्ये आपली आपण स्वतंत्रपणे केली. एखादी गोष्ट बुद्धीला पटली, तरी माणसाच्या मनाचे व्यापार असे चमत्कारिक व गुंतागुंतीचे असतात की संशय, भीती, लोकमताचे दडपण यांमुळे ती अंमलात आणण्यास मी मी म्हणणारे समाजनेतेही धजत नाहीत. मग सामान्य लोकांची गोष्टच कशाला? तेव्हा अशा लग्नांची संख्या जास्त नसली, तरी ज्यांनी या बाबतीत धिटाईने पुढे पाऊल टाकले, त्यांचे वर्तन निश्चितच कौतुकास्पद होते. अशा रूढिबाह्य समारंभात लोकांचा बुद्धिभेद करून गोंधळ माजवण्याचा विरोधकांचा प्रयत्न असे. तो निष्फळ ठरून समारंभ व्यवस्थित पार पडावा म्हणून पोलिस संरक्षण व आपल्या महार-मांगादी अनुयायांचे हुकमी साह्य मिळवून ठेवण्याची जोतीराव आधीच दक्षता घेत असत. आपल्यावर विश्वसून आपल्या रूढिभंजनाच्या कार्यात ज्यांनी भल्याबुऱ्या परिणामांची फिकीर न करता आपल्याला तत्परतेने साथ दिली, त्यांच्यावर जर यामुळे काही संकट ओढवले, तर जोतीराव खंबीरपणे त्यांच्या पाठीशी उभे राहात असत. व्यंकू बाळाजी कालेवार प्रतिवर्षी गणेशोत्सवात ब्राह्मणांस भोजन व दक्षणा देत असत. ही प्रथा बंद करून तो पैसा आंधळे, पांगळे, थोटे, लुळे यांच्या मदती-साठी ते खर्च करू लागले. त्याचप्रमाणे जाया यल्लपा लिंगू हे दरसाल दिवाळीत ब्राह्मणभोजन घालीत असत. परंतु समाजाचे सभासद झाल्यावर त्यांनी तो कार्यक्रम अजिबात रद्द करून "दरवर्षी पंचवीस रुपयांचे वर्षासन समाजातील मंडळीची जी मुले मॅट्रिक्युलेशन परीक्षेस पास होतील त्यांपैकी पहिल्यास सोन्याचे पदक देण्यास्तव दिले होते." [३५] त्यामुळे त्यांच्यावर ब्राह्मणांचा रोष तर झाला असेलच, पण त्यापेक्षाही त्यांच्या कुटुंबियांच्या भोळ्या श्रद्धेला व उत्सवप्रियतेला लगाम घालणे त्यांना खूप जड गेले असेल. जोतीरावांनी या दोघांच्याही स्तुत्य उपक्रमांबद्दल त्यांना धन्यवाद दिले आहेत.

इंग्रजी शिक्षणाच्या प्रसाराबरोबर बहुजनसमाजातून एक नवा पांढरपेशा मध्यम-

वर्ग हळूहळू पुढे येत होता. आपली उन्नती करून घेत असताना त्याला हरएक क्षेत्रात आधीच आघाडीवर असलेल्या उच्चवर्णीयांशी स्पर्धा करावी लागत होती. त्यातील पुष्कळांचा खेड्यांतील शेतकरी–कारागिरांशी जवळचा आप्तसंबंध होता. हा वर्गच जोतीरावांचा अनुयायी व हितचिंतक होता. त्यांच्या रूढिभंजनाबाबत या वर्गातील बहुसंख्य लोकांना बेताचीच आस्था होती. पण त्यांच्या विचारातील विद्येच्या मक्तेदारीचा निषेध आणि सामाजिक समतेचा आग्रह या गोष्टी त्याला अधिक महत्त्वाच्या वाटत होत्या. जोतीरावांच्या कार्याचे जे विधायक अंग होते, त्यात त्यांचा ज्ञानप्रसार आणि विचारजागृती यांवर खास भर होता. शालेय शिक्षणाइतकेच बहिःशाल शिक्षणाचेही त्यांना अगत्य वाटत होते. बहुजनसमाजाला विद्येचे महत्त्व अद्याप उमगले नाही हे त्यांना दिसत होते. होतकरू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या व बक्षिसे देणे, त्यांची राहण्याची व अभ्यासाची सोय व्हावी म्हणून वसतिगृहे काढणे, त्यांना पुस्तके मोफत मिळतील अशी तजवीज करणे, प्रौढ शिक्षणासाठी रात्रीच्या शाळा उघडणे इत्यादी मार्गांनी त्यांचे शिक्षणप्रसाराचे कार्य चालू होते. लोकांना उपयुक्त ज्ञान लाभावे म्हणून त्यांनी दर पंधरवड्यास व्याख्याने देण्याचा उपक्रम सुरू केला होता. वाचनाची सवय व्हावी आणि आपले विचार व्यक्त करण्याचे कसब त्यांनी हस्तगत करावे म्हणून निबंधस्पर्धा आणि वक्तृत्वस्पर्धा आयोजित केल्या होत्या. त्यासाठी समाजाच्या उद्दिष्टांशी सुसंगत असे शेतीसुधारणा, जातिभेद, मूर्ति-पूजा इत्यादी विषय ठेवण्यात येत असत. पुस्तके, लेख, भाषणे, गाणी यांच्याद्वारे समाजाच्या तत्त्वांचा प्रचार चालू होता. ईश्वराच्या न्यायीपणावर व दयाशीलतेवर जोतीरावांचा विश्वास होता. गरीब कष्टकरी वर्गाच्या भवितव्यावर त्यांची श्रद्धा होती. सत्यशोधक समाजाच्या कार्याचा सर्वत्र प्रसार होऊन शूद्रातिशूद्रांच्या कल्याणाची वाट मोकळी व्हावी म्हणून ते रात्रंदिवस निरलसपणे झटत होते; झगडत होते. तरी देखील "समाजाने जी मोठी महत्त्वाची कामे हाती धरली आहेत, ती जितकी लवकर व्हावी असे आपण इच्छितो तशी होत नाहीत"[३६] अशी खंत समाजाच्या चिट-णिसांना बोलून दाखवावी लागली. ही स्थिती सुधारावी म्हणून बहुजनसमाजातील विद्वान व श्रीमंत लोकांनी या कार्याला जास्तीत जास्त हातभार लावावा असे या मंडळींना त्यांनी आवाहन केले आहे. सत्यदीपिका, सुबोधपत्रिका आणि ज्ञानप्रकाश यांची सदिच्छा व साह्य यांबद्दल सत्यशोधक समाजाच्या पदाधिकाऱ्यांनी त्यांच्या संपादकांचे आभार मानले आहेत. थोडेबहुत मतभेद असले, तरी कार्यावर दृष्टी ठेवून ते विसरले पाहिजेत अशी जोतीरावांची भावना होती. म्हणून आपल्या भूमि-केशी प्रतारणा न करता पण नम्रपणे त्यांनी सर्वांना मदतीची हाक दिली होती.

## नगरपालिकेतील कामगिरी

जोतीराव इ. स. १८७६ ते ८२ या सहा वर्षांच्या कालावधीत पुणे नगरपालिकेचे सभासद होते. या संस्थेतील त्यांची कामगिरी पाहिली की, जिथे जिथे संधी मिळेल तिथे तिथे गोरगरियांच्या हितसंबंधांची जपणूक करण्यास ते कसे तत्पर असत ते दिसून येते. त्या काळात पालिकेचे सर्व सभासद सरकारनियुक्त होते; आणि जिल्हाधिकारी हे तिचे पदसिद्ध अध्यक्ष होते. अशा संस्थेच्या द्वारे फार मोठ्या प्रमाणात समाजकल्याण साधता येईल अशी जोतीरावांची अपेक्षा नव्हती. तरी देखील वेगवेगळ्या प्रश्नांची चर्चा करताना आपली मते निर्भीडपणे मांडण्यात त्यांनी कसूर केली नाही. ते सभासद असताना त्यांच्याबरोबर गणेश वासुदेव जोशी ( सार्वजनिक काका ), महादेव मोरेश्वर कुंटे, खंडेराव रास्ते, प्रो. दाजी नीलकंठ नगरकर, कृष्णाजी त्र्यंबक रानडे इत्यादी उच्चवर्णीय सभासद होते. त्यांचा विरोध प्रवृत्तीला असे, व्यक्तीला नसे. म्हणून सार्वजनिक सभेवर त्यांनी कितीही ताशेरे झाडले असले, तरी नगरपालिकेच्या एका उपसमितीत सार्वजनिक काकांबरोबर काम करताना त्यांना संकोच वाटला नाही. सत्यशोधक समाजाच्या कार्यात हरी रावजी चिपळूणकर हे त्यांचे पाठीराखे होतेच. पण पालिकेच्या कामकाजातही ते दोघे एकविचाराने भाग घेत असत. नगरपालिकेच्या सभांतून हरी रावजींनी जे ठराव वा सूचना मांडल्या, त्यांना त्या त्या वेळी जोतीरावांनी अनुमोदन दिले आहे.

याच कालखंडात घडलेली एक गोष्ट मात्र जोतीरावांच्या निःस्पृहतेची, मनोधैर्याची व लोकाभिमुखतेची ग्वाही देणारी आहे. हिंदुस्थानचे त्या वेळचे व्हाईसरॉय लॉर्ड लिटन यांच्या पुणे भेटीच्या निमित्ताने शहर सुशोभित करण्यासाठी एक हजार रुपये खर्च करण्याचा नगरपालिकेच्या अध्यक्षांचा इरादा होता. वेळ थोडा असल्याने सभा न घेता तसे परिपत्रक काढून त्यांनी सभासदांच्या संमतीसाठी पाठवले होते. शासकीय सभासदांच्या संमतीचा प्रश्नच नव्हता. बिगरशासकीय सभासदांपैकी काहींनी अनुकूल वा प्रतिकूल यांपैकी कोणत्याच रकान्यात सही केली नाही. बाकी सर्वांनी संमती दिली. त्यांत जोतीरावांचे मित्र हरी रावजी हे देखील होते. त्यामुळे या बाबतीत जोतीराव एकाकी पडले. परंतु कुणाच्याही रागलोभाची फिकीर न करता त्यांनी एकट्याने आपला विरोध नोंदवला. आपल्यासारख्या गरीब देशात नुसत्या शहरसजावटीसाठी इतका खर्च करणे योग्य नाही. त्याऐवजी ही रक्कम मागासलेल्या वर्गाच्या शिक्षणासाठी उपयोगात आणावी असे जोतीरावांचे मत होते.

## नेतृत्वाचे गुण

सामाजिक जीवनात आमूलाग्र बदल घडवून आणायचा म्हटला तर त्यासाठी

प्रथम प्रभावी नेतृत्व हवे असते. द्रष्टेपण, कृतिशीलता, वेधशक्ती, प्रबोधनचातुर्य, लोकसंग्रह इत्यादी गुण नेत्याच्या जवळ असल्याखेरीज समाजपरिवर्तनाची चळवळ उभी राहात नाही. जोतीरावांच्यापाशी हे गुण बऱ्याच प्रमाणात होते याबद्दल दुमत होण्याचा संभव नाही. काळाच्या प्रवाहाची दिशा त्यांना समजली होती. महाराष्ट्रातील शूद्रातिशूद्रांच्या सुखदुःखांशी ते तादात्म्य पावले होते. पिढ्यान्‌पिढ्या या लोकसमूहांना साधे माणुसकीचे हक्कही नाकारण्यात आले होते. परंतु यापुढील काळात या रंजल्या गांजलेल्या लोकांना उज्ज्वल भवितव्य आहे अशी जोतीरावांची मनोमय धारणा होती. आपल्या सर्वांगीण उन्नतीसाठी मूलभूत मानवी अधिकारांची किती आवश्यकता आहे हे या वर्गांना उमगले आणि ते प्राप्त करून घेण्याची जिद्द त्यांनी बाळगली, तर त्यांच्या बळावर मानवतेची प्रतिष्ठा, स्वातंत्र्य आणि समता या तत्त्वांची कदर करणारा समाज आपल्याला निर्माण करता येईल हे जोतीरावांचे स्वप्न होते. ते सत्यसृष्टीत उतरण्यासाठी त्यांची सारी धडपड सतत चालू होती. काही माणसे आपापल्या क्षेत्रात निष्ठेनें काम करीत राहतात. पण आपल्या कार्याला चळवळीचे रूप देणे त्यांना जमत नाही. हे फार थोड्याजणांना साधते. चळवळ ही कधी एका माणसाची असत नाही. तिच्या उभारणीसाठी अनेकानेक हात एकदिलाने व एकविचाराने एकत्र यावे लागतात. त्यातून कार्यकर्त्यांचा संच तयार होतो. ज्यांना समाजासाठी काही करावेसे वाटते अशा लोकांना हेरून त्यांना आपलेसे करण्याची, त्यांच्या विचाराला चालना देण्याची व त्यांना कार्यप्रवण करण्याची हातोटी आत्मसात केल्याखेरीज ही गोष्ट साध्य होत नाही. जोतीरावांच्या अंगी ही वेधशक्ती व प्रबोधनचातुर्य होते. म्हणूनच वेगवेगळ्या थरांतील लोकांची मने त्यांना जिंकता आली. सरकारी अधिकारी, विद्यावंत, डॉक्टर, व्यापारी, कंत्राटदार यांच्यासारख्या प्रतिष्ठित गृहस्थांपासून तो अगदी खालच्या जातीतील मामुली माणसांपर्यंत कितीतरी लोकांचे साह्य त्यांनी मिळवले होते. कृष्णराव भालेकर, नारायणराव लोखंडे, संतुजी रामजी लाड, रामय्या व्यंकय्या आय्यावारू यांना जोतीरावांनी प्रेरणा दिली; मार्गदर्शन केले. आपल्या चळवळीचा सर्वत्र फैलाव व्हावा म्हणून अनेकविध उपाय योजण्यात ते नेहमीच दक्ष असत. भोवताली्या घडामोडींकडे त्यांचे बारीक लक्ष असे. प्रत्येक प्रसंगाचा आपल्या कार्याला होईल तितका उपयोग करून घेण्यास ते सहसा चुकत नसत. इ. स. १८८२ मध्ये हंटर शिक्षण आयोगाची नेमणूक झाली. त्याचे रीतसर कामकाज सुरू होताच जोतीरावांनी त्यांच्याकडे आपले विस्तृत निवेदन पाठवले; आणि त्यात त्यांनी आपली शिक्षणविषयक भूमिका स्पष्टपणे विशद करून सांगितली. १८८५ साली पुणे येथे मराठी ग्रंथकारांचे दुसरे संमेलन भरले होते. त्याचे निमंत्रण जोतीरावांना आले होते. त्याला त्यांनी जे उत्तर

लिहून पाठवले, त्यात त्यांनी आपला दृष्टिकोण अत्यंत परखडपणे व्यक्त केला होता. इ. स. १८८८ त ड्यूक ऑफ कनॉट भारतात आले होते. त्यांनी पुण्यास भेट दिली, तेव्हा हरी रावजी चिपळूणकर यांनी त्यांच्या सन्मानार्थ मेजवानी दिली होती. जोतीरावांना आमंत्रण होतेच. तेथे ते शेतकऱ्याच्या साध्यासुध्या वेषात गेले, आणि येथील सामान्य माणूस कोणत्या स्थितीत वावरतो ते त्यांनी या प्रमुख पाहुण्यांच्या निदर्शनास आणून दिले. त्यांच्या कार्यतत्परतेची अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. त्यांच्या स्वभावात व्यक्तिद्वेष नव्हता. चांगले काम सिद्धीस नेण्यासाठी देखील वाईट उपाय योजू नयेत अशी त्यांची भूमिका होती. त्यांच्या लेखणीत त्वेष आणि तिखटपणा होताच. पण त्यामुळे त्यांच्या वृत्तीतील उमदेपणाला व गुणग्राहकतेला कधी बाध आला नाही. न्यायमूर्ती रानडे यांच्यावर त्यांनी अनेकदा ताशेरे झाडले आहेत. परंतु त्यांनी आपल्या पत्नीला स्वतः शिकवून शहाणे केले याबद्दल जोतीरावांनी त्यांची प्रशंसा केली आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे तर त्यांचे कट्टर विरोधक. पण आपल्या शिक्षणविषयक निवेदनात त्यांनी विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि भावे यांच्या शाळांचा आवर्जून गौरवपर उल्लेख केला आहे; आणि त्यांना पुरेसे अनुदान मिळाल्यास त्यांच्याकडून भरीव कामगिरी होईल असा आशावाद प्रांजलपणे प्रगट केला आहे. सरकारी ब्राह्मण अधिकारी शूद्र शेतकऱ्यांशी किती मगरुरीने वागतात त्याचे वर्णन करताना "हा आरोप आमचे लोकप्रिय निःपक्षपाती मि. विश्वनाथ दाजीसारखे जे कित्येक गृहस्थ असतील त्यांस लागू नाही. असे निर्मळ मनाचे पुरुष सरकारी ब्राह्मण कामगारांत थोडे सापडतात."[३७] असे नमूद करण्यास ते विसरले नाहीत. जोतीरावांना कार्यकर्ते सहजपणे जोडता आले; पण त्यांना सांभाळून घेण्यात ते कितपत यशस्वी झाले असा प्रश्न पडतो. जोतीरावांच्या मुंबईतील चाहत्यांनी समाजाच्या कार्यासाठी बाराशे रुपयांचा छापखाना दिला होता. तो दोन वर्षे पडून होता. भालेकरांनी 'दीनबंधू' पत्र काढण्यासाठी तो भाड्याने मागितला. इतर सर्व लोकांची संमती असताही जोतीरावांनी त्याला विरोध केला; पुढे तो छापखाना मुंबईस परत नेऊन विकून टाकला गेला. यामुळे जोतीराव आणि भालेकर यांच्यात खूपच कडवटपणा आला. या प्रकरणात चूक नेमकी कोणाची व किती ते सांगणे कठीण आहे. पण भालेकर जोतीरावांचे नातलग. जोतीरावांपासून त्यांना स्फूर्ती मिळालेली, स्वतः जोतीराव हे त्यांच्यापेक्षा तेवीस वर्षांनी वडील. परंतु त्यांना भालेकरांशी जुळते घेऊन किंवा त्यांची समजूत घालून आपसातील दुही टाळता आली नाही. इतरांशी त्यांचे जेव्हा मतभेद झाले तेव्हाही त्यांनी मनाचा मोठेपणा दाखवला असे दिसत नाही. सहकाऱ्यांचे स्वभावभेद ध्यानात घेऊन त्यांची एकजूट टिकवून धरणे हे नेत्याच्या यशस्वितेचे एक गमक म्हटले पाहिजे.

या एका बाबतीत त्यांचे नेतृत्व थिटे पडले यात शंका नाही. माणसे कितीही मोठी असली तरी ती अखेर स्खलनशील माणसेच असतात एवढाच याचा इत्यर्थ आहे.

जोतीरावांनी स्वतंत्र व्यवसाय करून आपला उदरनिर्वाह केला. आपण सामाजिक कार्य करतो, तरी आपला सत्यशोधक समाज ही गरिबांची संघटना आहे. तेव्हा आपण आपल्या कुटुंबाचा बोजा समाजावर लादणे बरोबर नाही अशी त्यांची भावना होती. 'गुलामगिरी' हे पुस्तक लिहिल्यानंतर जोतीरावांनी वृत्तपत्रांत प्रसिद्ध करण्यासाठी एक जाहीर पत्रक तयार केले होते. त्यात जो कोणी मनुष्य ईश्वरास स्मरून नीतीने वागत असेल त्याच्या जातीपातीचा, देशाचा, दर्ज्याचा व धर्माचा विचार न करता आणि सोवळ्याओवळ्याचे बंड न माजवता त्याच्याबरोबर अन्न-व्यवहार करण्यास मी तयार आहे अशा अर्थाचे एक कलम होते. हे पत्रक कोणत्याही हिंदू पत्राने छापले नाही. शेवटी ते 'शुभवर्तमानदर्शक व चर्चसंबंधी नानाविध संग्रह' या ख्रिस्ती मासिकात छापून आले. मानवतावाद, विश्वबंधुत्व आणि कृतिशीलता ही जोतीरावांच्या जीवननिष्ठेची तीन प्रमुख अंगे या पत्रकात ग्रथित झालेली आहेत. विचार आणि कृती यांचे अद्वैत हे त्यांच्या जीवनाचे खास वैशिष्ट्य होते. म्हणूनच आज इतक्या कालावधीनंतरही त्यांचे व्यक्तित्व, विचार आणि कार्य सामाजिक कार्यकर्त्यांना स्फूर्तिदायक होत आहे.

## संदर्भ व टीपा :


१ दासबोध, १४–६–२५

२ समग्र वाङ्मय, पृ. २६४

३ समग्र वाङ्मय, पृ. ४६४

४ लोकहितवादी–निबंधसंग्रह, पृ. २३७

५ समग्र वाङ्मय, पृ. १३५

६ समग्र वाङ्मय, पृ. २६४

७ सावित्रीबाई जोतीराव फुले, पृ. २३

८ "For as the body without the spirit is dead, so faith without works is dead also." New Testament And Psalms, 252

९ New Testament–Matthew, 20-28, 10-8

१० Life of John Wilson, p. 54

११ "We reason, but we use no violence. We enter into discussion

that truth may appear. and we say to all 'Inquire.'" Life of John Wilson, p. 128

१२ समग्र वाङ्मय, पृ. २८४

१३ पुणे शहराचे वर्णन, पृ. ९१

१४ New Testament–Matthew, p. 5-11, 12

१५ पराग, फेब्रुवारी १९४९, पृ. २६

१६ समग्र वाङ्मय, पृ. १३५

१७ अरुणोदय, पृ. २०१

१८ Memoir of Rev. Robert Nesbit, p. 120

१९ The Age of Reason, p. 1

२० Political Writings, p. 83

२१ The Life of Thomas Paine, p. 21

२२ समग्र वाङ्मय, पृ. १२१

२३ The Life of Thomas Paine, p. 19

२४ Political Writings, p. 38

२५ परमहंस सभा (धर्मविवेचन), पृ. ८२, ८३

२६ सावित्रीबाई जोतीराव फुले, पृ. ७५

२७ ज्ञानोदयाची पहिली शंभर वर्षे, पृ. १००

२८ भवाळकर–आत्मवृत्त, पृ. १०७

२९ समग्र वाङ्मय, पृ. १४१

३० समग्र वाङ्मय, पृ. १२७

३१ समग्र वाङ्मय, पृ. १४१

३२ निबंधमाला, पृ. ४५१

३३ पुरोगामी सत्यशोधक, ३–१, पृ. ४८

३४ समग्र वाङ्मय, पृ. ३३९

३५ पुरोगामी सत्यशोधक, ४–१, पृ. ४३

३६ समग्र वाङ्मय, पृ. १६१

३७ समग्र वाङ्मय, पृ. २२८

# ४



# वाङ्मयदर्शन

बहुजनसमाजाचे प्रबोधन व दलितमुक्तीचा प्रचार हे जोतीरावांच्या चळवळीचे एक प्रमुख अंग होते. त्यासाठी त्यांनी अनेक लहानमोठी पुस्तके लिहिली. त्यांचे हे सर्व लेखन सत्यशोधक समाजाच्या कार्याशी निगडित होते. त्यामुळे त्यांच्या वाङ्मयाचे अंतरंग व बाह्यांग ही दोन्ही तत्कालीन उच्चवर्णियांच्या साहित्याहून मुळात अगदी भिन्न होती. एकोणिसाव्या शतकातील मराठी साहित्य शहरातील पांढरपेशा वर्गाच्या जीवनाच्या चतुःसीमेतच घुटमळत होते. उच्चवर्णीय मध्यमवर्गाच्या प्रश्नांच्या व आशाआकांक्षांच्या पलीकडे सहसा त्याची मजल जाऊ शकली नाही. त्यांचे लेखक व वाचक एकाच थरातील होते. खेड्यापाड्यांतील गरीब शेतकरी व कारागीर यांच्या सुखदुःखांची व अडीअडचणींची त्यात क्वचितच दखल घेतली जाई. इ. स. १८८५ मध्ये पुणे येथे मराठी भाषेतील ग्रंथकारांचे दुसरे संमेलन भरले होते. त्याचे आमंत्रण जोतीरावांना आले होते. त्यांनी उत्तरादाखल न्यायमूर्ती रानडे यांना जे पत्र पाठवले, त्यात अशाच आशयाचे आपले मत कुठलाही आडपडदा न ठेवता निःसंकोचपणे मांडले होते. "ज्या गृहस्थांकडून एकंदर सर्व मनुष्यांच्या मानवी हक्कांविषयी वास्तविक विचार केला जाऊन ज्यांचे त्यांस ते हक्क त्यांच्याने खुषीने व उघडपणे देववत नाहीत, व चालू वर्तनावरून अनुमान केले असता पुढेही देववणार नाहीत, तसल्या लोकांनी उपस्थित केलेल्या सभांनी व त्यांनी केलेल्या पुस्तकांतील भावार्थाशी आमच्या सभांचा व पुस्तकांचा मेळ मिळत नाही."[१] जोतीरावांनी मात्र आपली नजर शहराकडून खेड्याकडे आणि बुद्धिजीवी वर्गाकडून श्रमजीवी वर्गाकडे वळवली होती. शेतकरी व इतर कष्टकरी समाज हाच त्यांच्या विचारांचा व कार्याचा केंद्रबिंदू होता. त्यांच्या दिवसेंदिवस खालावत चाललेल्या परिस्थितीशी ते तादात्म्य पावले

होते. त्यांची गाऱ्हाणी वेशीवर टांगण्यासाठीच तर त्यांनी आपल्या हातात लेखणी घेतली होती. साहजिकच शूद्र आणि अतिशूद्र समाजांतील नव्याने अक्षरओळख झालेले आणि आपले जिव्हाळ्याचे प्रश्न समजून घेण्यास उत्सुक असलेले तरुण हे जोतीरावांच्या वाङ्मयाचे वाचक होते. त्यांची संख्या फार थोडी होती हे तर खरेच. परंतु हेच वाचक डोळ्यांपुढे ठेवून त्यांनी आपले लेखनविषय निवडले होते. त्यांची विवेचनपद्धती आणि भाषासरणी ही देखील त्यांनी आपल्या या उद्दिष्टांशी सुसंगत अशी राखली होती.

जोतीरावांची ग्रंथसंपदा—

| | | |
|---|---|---|
| १. तृतीय रत्न ( नाटक ), | पुणे, लेखनकाल | १८५५ |
| २. पवाडा छत्रपती शिवाजीराजे भोसले यांचा, | मुंबई | १८६९ |
| ३. ब्राह्मणांचे कसब, | मुंबई | १८६९ |
| ४. गुलामगिरी, | पुणे | १८७३ |
| ५. शेतकऱ्याचा असूड, | पुणे, लेखनकाल | १८८३ |
| ६. सत्सार, अं. १, २, | पुणे | १८८५ |
| ७. इशारा, | पुणे | १८८५ |
| ८. सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक, | मुंबई | १८९१ |
| ९. अखंडादि काव्यरचना ( स्फुट ) | पुणे | |

प्रकाशन—

१. जातिभेदविवेकसार, आ. २ री, एक हिंदु ( तुकाराम तात्या पडवळ ) प्रकाशक – जोती गोविंदराव फुले, पुणे १८६५

## तृतीय रत्न

" भट जोशी आपल्या मतलबी धर्माच्या थापा देऊन अज्ञानी शूद्रांस कसकसे फसवून खातात व ख्रिस्ती उपदेशक आपल्या निःपक्षपाती धर्माच्या आधाराने अज्ञानी शूद्रांस खरे ज्ञान सांगून त्यांस कसकसे सत्यमार्गावर आणितात "[२] ते दाखवून त्याचे मर्म लोकांच्या लक्षात आणून देण्यासाठी जोतीरावांनी ' तृतीय रत्न ' हे एक लहानसे नाटक लिहिले. ते अलीकडेच इ. स. १९७९ मध्ये महात्मा जोतीराव फुले समता प्रतिष्ठान, पुणे, या संस्थेने आपल्या ' पुरोगामी सत्यशोधक ' या त्रैमासिकात प्रसिद्ध केले आहे.[३] त्याचे संपादन प्रा. सीताराम रायकर यांनी केले आहे. या नाटकाचे कथानक अगदी साधे आहे आणि त्यातील प्रसंगही मोजकेच आहेत. कुणबी स्त्री, तिचा नवरा, जोशी, त्याची पत्नी, विदूषक, जोश्याचा भाऊ दामू, पाद्री, एक मुसलमान इतकी पात्रे या नाटकात आहेत; आणि त्यांच्यातील संवादांतून

आपल्याला कथावस्तूचा बोध होतो. जोगाई नावाची एक कुणबी स्त्री गरोदर असते. भट जोशी तिच्या घरी जाऊन " बाई तुझ्या नावाची मकर रास आहे. मकरराशीचा शनी तुझ्या मुलाला छळल्यावाचून राहणार नाही. "[४] असे भविष्य तिच्या कानावर घालतो. मग साहजिकच ती भयभीत होऊन ग्रहाची ही पीडा दूर करण्यासाठी काय केले पाहिजे असे मोठ्या अजीजीने जोशीबुवाला विचारते. थोडे आढेवेढे घेऊन जोशी तिला दर शनिवारी पंचमुख्या मारुतीला रुईच्या फुलांची अथवा पानांची माळ घाल, श्रावणमासात तेवीस ब्राह्मणांना तूपपोळ्यांचे जेवण दे व जपानुष्ठानासाठी ब्राह्मण बसवण्याचा मारुतिरायापुढे संकल्प सोड असे उपाय सुचवतो पुढे लवकरच हे सर्व तो युक्तिप्रयुक्तीने त्या कुणबी स्त्रीच्या व तिच्या नवऱ्याच्या गळी उतरवतो. त्यांच्याकडून रोख पैसे घेऊन आपल्या घरीच ब्राह्मणभोजनाचा बेत करतो. त्यात भाऊमेव्हणे यांसारख्या आपल्या नातेवाइकांची वर्णी लावतो. यथेच्छ जेवण झाल्यावर सर्वजण कुणबी पतिपत्नींना आशीर्वाद देण्यासाठी मारुतीच्या देवळात जमतात. त्यांचा मंत्रघोष चालू असतानाच तेथे एक पाद्री येतो, आणि देवळाच्या एका बाजूस उभा असलेल्या कुणब्यास उपदेश करू लागतो. ' मूर्तिपूजा ही खऱ्या ईश्वरोपासनेला बाधक आहे; तिच्यामुळे धर्मभोळेपणाचे प्रस्थ वाढून गरीब बिचारे भाविक लोक अनाठायी खर्च करून स्वतःचे नुकसान करून घेतात. त्यांनी शिक्षण घेतल्याखेरीज त्यांना या गोष्टीचा उमज पडणार नाही; आणि अंधश्रद्धेच्या कचाट्यातून ते कधी सुटणार नाहीत. ' असा त्या धर्मोपदेशकाच्या बोलण्याचा भावार्थ होता. खालच्या जातींमध्ये विद्याप्रसार होण्याच्या बाबतीत ब्राह्मणांचा कसा वारंवार अडथळा येतो, ते तो कुणबी मोकळेपणाने ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या निदर्शनास आणून देतो. नाटकातील वेगवेगळ्या व्यक्तींचे संभाषण होत असतानाच मधून मधून लेखकही विदूषकाच्या तोंडून आपले मनोगत व्यक्त करतो. " जोशी जर मरणापासून माणसे वाचवितात तर, इंग्रज सरकार सर्व औषधी उपाय करण्यास एकीकडे ठेवून सर्व इस्पितळेही मोडून, ते सर्व काम जोश्याच्या गळ्यात का बांधीत नाहीत; " " या नांगरहाक्याच्या बायकोला हे काय ठावे, की कुणब्याने नांगर हाकता हाकता विद्या जर शिकली असती तर, खचित जोशी तर केव्हाच कोणीकडेसच टिरीला पाय लावून पळाला असता "[५] यांसारखे विदूषकाचे बहुतेक सर्व उद्गार मर्मभेदक आहेत. नाटकाच्या अखेरीस कुणबी आपली बायको जोगाई हिला म्हणतो, " अगे आज तू देखील लवकर जेवण आटोप कशी ! मग्राशी त्या परोपकारी पाद्री साहेबाच्या उपदेशावरून व आज घडलेल्या सर्व गोष्टींवरून देवाच्या व धर्माच्या नावावर आपणासारख्या इतर अज्ञान माळी कुणबी इत्यादी शूद्र जातींना लबाड्या व हूल थापा देऊन लुबाडून खाण्याचा भटाब्राह्मणांचा कावा चांगला उघड झाला असून

शिवाय विद्या शिकण्याचे महत्त्वही आज आपणास चांगलेच कळून आले आहे. म्हणून आपण लौकर जेवण आटोपून आपल्या वरावलीकडील त्या रा. रा. जोतीराव गोविंद फुले यांच्या वाड्यात त्यांची स्त्री सौ. सावित्रीबाई फुले यांनी उनकर स्त्रियांसाठी रात्रीची जी शाळा घातलेली आहे त्या शाळेत तू आजपासून जावे व तेथे रा. रा. जोतीराव फुले यांनी वयस्कर पुरुषांकरिता रात्रीची जी दुसरी शाळा घातलेली आहे तीत आजपासून मी जाणे सुरू करितो. या दोन्ही शाळांतून ते दोघे उनकरता सर्वांना मोफत शिक्षण देतात. यापूर्वी यांच्या या शाळांत येण्याबद्दल त्या दोघांनी आपणास पुष्कळ वेळा आग्रह केला असता आपण गेलो नाही ही आपण मोठीच चूक केली आहे." [६] ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या बोलण्याने कुणबी पतिपत्नी खूपच प्रभावित होतात. तरीदेखील त्यांना ख्रिस्ती धर्म स्वीकारण्याची इच्छा होत नाही. उलट ते फुले पतिपत्नींच्या प्रौढशिक्षणाच्या वर्गात दाखल होतात. यावरून जोतीरावांना या नाटकाची कोणती फलश्रुती अभिप्रेत होती ते ध्यानात येते. श्री. सीताराम रायकर यांना ह्या नाटकाच्या ज्या तीन हस्तलिखित प्रती मिळाल्या, त्यांपैकी एका प्रतीवर ' त्रितीय नेत्र ' असे शीर्षक होते. रत्न हा शब्द जोतीराव नेत्र या अर्थाने वापरत असतील, तर आधुनिक विद्या हा आपल्याला लाभलेला तिसरा डोळा आहे अशा समजुतीने त्यांनी आपल्या नाटकाला हे नाव दिले असणे अगदी शक्य आहे. या संदर्भात दुसराही एक पर्याय मनात येतो. ' पृथिव्याम् त्रीणि रत्नानि जलमन्नं सुभाषितम् ' [८] असे एक प्रसिद्ध संस्कृत सूत्रवचन आहे. आपटे यांच्या संस्कृत इंग्रजी कोशात सुभाषित याचा ' Learning ' विद्या असा एक अर्थ दिला आहे पाणी, अन्न व विद्या ही पृथ्वीवरची तीन रत्ने होत असा या सूत्रवचनाचा अर्थ होतो जोतीरावांचा गीर्वाणभाषापंडित गंगाधरशास्त्री फडके यांच्याशी दृढ परिचय होता तेव्हा त्यांना हे सुभाषित माहीत असण्याचा संभव आहे. बहुजनसमाजाला विद्येचे महत्त्व पटवून देण्यासाठीच जोतीरावांनी हे नाटक लिहिलेले आहे. या दृष्टीनेही ' तृतीय रत्न ' हे त्याचे नाव अन्वर्थक वाटते. हे नाटक उघडउघड प्रचारकी वळणाचे आहे. मराठीतील बहुधा हे पहिलेच स्वतंत्र, सामाजिक नाटक होय. यापूर्वी ' प्रबोधचंद्रोदय ' हे फक्त एकच आणि तेही परमार्थपर व भाषांतरात्मक नाटक प्रसिद्ध झाले होते. तेव्हा जोतीरावांच्या या नाटकात तंत्रविषयक दोष आढळले, तर त्यात अस्वाभाविक असे काहीच नाही. मात्र त्यातील संवाद हे सुटसुटीत, अकृत्रिम व आशयघन आहेत. त्यातून जोतीरावांचे सामाजिक व्यवहाराचे अवलोकन किती खोल व मूलग्राही होते ते दिसून येते.

जोतीरावांनी हे नाटक दक्षिणा प्राइझ कमिटीकडे पुरस्कारासाठी पाठवले होते. या कमिटीत कृष्णशास्त्री चिपळूणकर, भास्कर दामोदर पाळंदे, मोरोबा कान्होबा

विजयकर यांच्यासारखे मान्यवर सुधारक होते. तसेच मेजर कँडी, रे. मरे मिचेल यांच्यासारखे जोतीरावांचे चाहते युरोपियन सभासद होते. परंतु " तेथेही असल्या भिडस्थ भट सभासदांच्या आग्रहामुळे युरोपियन सभासदांचे काही चालेना, तेव्हा त्या कमिटीने माझी चोपडी ( तृतीय रत्न नाटक ) नापसंत केली. " [८] ही संस्था शालेय पुस्तकांची भाषांतरे प्रसिद्ध करण्यासाठी निर्माण झाली होती. त्यामुळेही कदाचित हे नाटक आपल्या कार्यकक्षेत येत नाही असे सभासदांना वाटले असेल. पण एक गोष्ट निर्विवाद आहे. उच्चवर्णीय सुधारक विचाराने कितीही प्रगत असले, तरी त्यांचे पूर्वसंस्कार इतके प्रबळ होते की, सामाजिक प्रश्नांच्या बाबतीत ते प्रत्यक्ष व्यवहारात एका ठराविक मर्यादेपलीकडे जाऊ शकत नसत. या नाटकात जोतीरावांनी वर्णवर्चस्वावर व भिक्षुकशाहीवर जोरदार हल्ला चढवला आहे. तो या समन्वयशील सुधारक सभासदांना मानवण्यासारखा नव्हता. दक्षिणा प्राइझ कमिटी ही संस्था स्थापन झाली, तेव्हा सुधारक पक्षाला जोतीरावांची किती मदत झाली, ते आधीच्या प्रकरणात सांगितलेच आहे. कारणे काय असतील ती असोत, परंतु 'तृतीय रत्न' नाटकाला दक्षिणा प्राइझ कमिटीची मान्यता मिळाली नाही एवढे मात्र खरे. या अनुभवातून जोतीरावांनी योग्य तो बोध घेतला; आणि वरिष्ठ वर्गातील या सुधारकांच्या सहानुभूतीवर सर्वस्वी अवलंबून राहण्यात हशील नाही अशी त्यांनी आपल्या मनाशी खूणगाठ बांधली.

'तृतीय रत्न' नाटक बाजूला पडल्यावर जोतीराव पुन्हा नाट्यरचनेकडे कधी वळले नाहीत. इतकेच नव्हे तर पुढील दहा-बारा वर्षांच्या कालावधीत त्यांचे शिक्षण-प्रसाराचे व सामाजिक सुधारणेचे कार्य जरी नेटाने चालू होते, तरी मतप्रचारासाठी त्यांनी ग्रंथलेखनाची कास धरली नाही. आधी हाती घेतलेल्या कार्याला विघातक ठरेल असे काही न करण्याचे पथ्य त्यांनी पाळले. आपल्या सहकाऱ्यांशी त्यांचे कित्येकदा अगदी गंभीर स्वरूपाचे मतभेद होत. परंतु सर्वांना बरोबर घेऊन काम करण्याचे आपले धोरण त्यांनी एकदम सोडले नाही. मात्र उत्तरोत्तर येत राहिलेल्या कटू अनुभवांनी त्यांच्या विचारांत फरक पडत गेला. सामाजिक जीवनातील अंतर्गत हितविरोधाची त्यांना तीव्रतेने जाणीव झाली; आणि संघर्षाशिवाय शूद्रातिशूद्रांचे प्रश्न सुटणार नाहीत अशी त्यांची खात्री पटली. 'जातिभेदविवेकसार' या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीला प्रकाशक म्हणून त्यांनी आपले नाव दिले. त्यापूर्वीच त्यांची ही संघर्षवादी भूमिका त्यांच्या मनात पक्की स्थिरावली होती. त्यानंतर लिहिलेल्या शिवाजीच्या पवाड्यात तर त्यांच्या या भूमिकेचे पडसाद अगदी ठळकपणे उमटलेले दिसतात.

## छत्रपति शिवाजी राजे भोसले यांचा पवाडा

इ. स. १८६९ मध्ये शिवछत्रपतींचा पवाडा प्रसिद्ध झाला. अर्वाचीन मराठी साहित्यात शिवछत्रपतींचे पराक्रम व कर्तृत्व यांकडे प्रथम लोकांचे लक्ष वेधण्याचे श्रेय जोतीरावांचा हा पवाडा आणि कुंटे यांच्या 'राजा शिवाजी' या काव्यग्रंथांना दिले पाहिजे. त्यानंतर तीनचार वर्षांतच लेले यांचे 'शिवाजीचरित्र' व जोरवेकर यांचे 'शिवराजलीला' ही खडकाव्ये प्रसिद्ध झाली. जोतीरावांनी हा पवाडा अव्वल इंग्रजीतील एक क्रियाशील समाजसुधारक व परमहंस सभेचे अध्यक्ष रामचंद्र बाळकृष्णजी यांना अर्पण केला आहे. त्याची रचना आपण कशी केली आणि त्या वेळी आपल्या डोळ्यांपुढे कोणता वाचकवर्ग होता ते जोतीरावांनी स्वतःच प्रस्तावनेत नमूद करून ठेवले आहे. "शिवाजी राजाच्या ह्या पवाड्याचे आठ भाग केले आहेत. दरएक भागात विषयांतर होऊ नये या भयास्तव सर्व भाग एकसारखे केले नाहीत. अति जुनाट यवनी व मेसर्स ग्रांडफ, मरी वगैरे इंग्रज लोकांच्या बहुतेक लेखी आधारावरून हा पवाडा केला आहे. कुणबी, माळी, माहार, मांग वगैरे पाताळी घातलेल्या क्षत्र्यांच्या उपयोगी हा पवाडा पडावा असा माझा हेतू आहे. लांबच लांब मोठाले संस्कृत शब्द मुळीच घातले नाहीत. व जेथे माझा उपाय चालेना तेथे मात्र लहानसहान शब्द निर्वाहापुरते घेतले आहेत. माळीकुणब्यांस समजण्याजोगी सोपी भाषा होण्याविषयी फार श्रम करून त्यांस आवडण्याजोग्या चालीने रचना केली आहे."[१] या पवाड्यात जोतीरावांनी शिवचरित्रातील बहुतेक सर्व महत्त्वाचे प्रसंग सहजपणे व सरळ प्रवाही भाषेत ग्रथित केले आहेत. मात्र या चरित्रकथनातही त्यांचा स्वतंत्र सामाजिक दृष्टिकोण प्रतिबिंबित झाला आहे. पवाड्याची सुरुवातच मुळी त्यांनी "कुळवाडी भूषण पवाडा गातो भोसल्याचा। छत्रपती शिवाजीचा" अशी केली आहे. आणि शेवटच्या कडव्यात "जोतीराव फुल्यानें गाईला पुत क्षुद्राचा। मुख्य धनी पेशव्याचा" असे म्हटले आहे. 'शिवराजभूषण' व 'शिवबावनी' हे शिवाजीचा गुणगौरव करणारे दोन काव्यग्रंथ लिहिणारा कवी भूषण जातीने ब्राह्मण होता. उलट या पवाड्याचा कर्ता हा 'कुळवाडीभूषण' शेतजमीन कसणाऱ्या समाजाचा प्रतिनिधी आहे, कष्टकरी कुळवाड्यांचा शाहीर आहे, असा त्यांच्या ह्या ओळींचा इत्यर्थ आहे. शिवाजीचा उल्लेख त्यांनी पराक्रमी शूद्राचा पुत्र व ब्राह्मण पेशव्याचा मुख्य धनी असा केला आहे. शूद्रातिशूद्र हेच येथील मूळचे रहिवासी, क्षेत्रपती होते असा त्यांचा दावा आहे. शूद्र या संज्ञेविषयी त्यांच्या मनात अजिबात न्यूनगंड नव्हता. ब्राह्मणशाहीतील वर्णवर्चस्व आणि धार्मिक व सामाजिक गुलामगिरी यांचे ते कडवे विरोधक होते. या ऐतिहासिक पवाड्यातही आपल्याला त्याची प्रचीती आल्याखेरीज राहात नाही. शूद्रातिशूद्र हे या देशाचे खरे धनी होते. क्षेत्रवासी

म्हणून त्यांनी क्षत्रिय असे नाव धारण केले आणि येथे ते दीर्घकाळ सुखाने नांदत होते. परंतु पुढे दुसऱ्या देशातून आर्यब्राह्मण या देशात आले, आणि येथील लोकांना जिंकून त्यांनी त्यांना आपले गुलाम बनविले. ज्यांना आज आपण महारमांग म्हणून तुच्छ लेखतो, ते या परकीय आक्रमकांशी मोठ्या शर्थीने लढले. म्हणून त्यांचा पराभव केल्यानंतर आर्यब्राह्मणांनी त्यांना अस्पृश्य मानून देशोधडीला लावले. अशा तऱ्हेने जिजाबाईने बालशिवाजीला आपल्या पूर्वजांची कुळकथा सांगितली आहे. जोतीरावांनी हा कथाभाग जाणीवपूर्वक या पवाड्यात घातला आहे. शिवाजीच्या पूर्ववयात दादोजी कोंडदेवाची शिकवण व मार्गदर्शन यांचा त्याला पुष्कळच उपयोग झाला असा सार्वत्रिक समज होता. जोतीरावांनी या रूढ समजुतीला धक्का दिला आहे. शिवाजीच्या घराण्यात निदान दोन पिढ्यांत तरी राजकारण खेळले जात होते. त्याच्या भोवताली मर्दुमकीचे व मुत्सद्दीपणाचे वातावरण होते. लहानपणापासून अशा वातावरणात वाढलेल्या शिवाजीराजासारख्या प्रज्ञावंताला दुसऱ्या कुणाकडून तरी राजकारणाचे धडे घेण्याची काय गरज ? "मासा पाणीं खेळे गुरू कोण असे त्याचा." [१०] असा जोतीरावांचा रोकडा सवाल होता. रामदासांना शिवाजीने गुरू मानले हे खरे; परंतु ते केवळ 'लोकप्रीतिकरिता' असा जोतीरावांचा अभिप्राय आहे. जोतीरावांच्या पद्यरचनेत विलक्षण सहजता आहे. त्यांची रूप-वर्णने मात्र सांकेतिक वाटतात. बाकी इतरत्र कुठेही कृत्रिमता किंवा खडबडीतपणा आढळून येत नाही. सोपेपणा, समर्पकता व सफाई हे त्यांच्या पद्यशैलीचे खास वैशिष्ट्य आहे यात शंका नाही. शिवाजी राजांची बुद्धिमत्ता, चातुर्य कर्तबगारी, सावधपण, निर्लोभ वृत्ती, उदारता, लोकसंग्रह इत्यादी गुणांचे वर्णन जोतीरावांनी अगदी मोजक्या शब्दांत, रेखीवपणे, पवाड्याच्या धाटणीला साजेल असे केले आहे. या पवाड्याच्या प्रस्तावनेत जोतीरावांनी जे विचार मांडले आहेत, ते ब्राह्मणांचे कसब, गुलामगिरी, शेतकऱ्याचा असूड, इशारा इत्यादी त्यांच्या पुढील पुस्तकांत वारंवार आलेले आहेत. यावरून सामाजिक जीवनाकडे पाहण्याचा त्यांचा विशिष्ट दृष्टिकोण यापूर्वीच तयार झाला होता याची निःसंदिग्धपणे साक्ष पटते.

## ब्राह्मणांचे कसब

जोतीरावांची वाङ्मयनिर्मिती ही बहुतांशी सहेतुकच आहे. शूद्रातिशूद्रांच्या दुरवस्थेची कारणे विशद करून त्यांचे प्रबोधन करणे, बहुजनसमाजातील सुशिक्षित तरुणांना आपल्या सामाजिक कर्तव्याची जाणीव करून देणे आणि मागासलेल्या जातीजमातींत शिक्षणप्रसार झाल्याखेरीज त्यांची स्थिती सुधारणार नाही ही गोष्ट सरकारला पटवून देणे अशा तिहेरी उद्देशाने त्यांनी आपले ग्रंथलेखन केले आहे. त्यांचा 'ब्राह्मणांचे

कसब' हा पद्यग्रंथ इ. स. १८६९ मध्ये प्रसिद्ध झाला. 'शिवाजीचा पवाडा' त्यांनी एका निष्ठावंत क्रियाशील समाजसुधारकाला अर्पण केला होता. हा ग्रंथ त्यांनी महाराष्ट्र देशातील कुणबी, माळी, मांग, महार यांना 'परम प्रीतीने' नजर केला आहे. त्यात त्यांनी भटजोशी अडाणी व गरीब शूद्राला धर्माच्या नावाखाली भूलथापा देऊन कसे राजरोस लुबाडतात ते दाखवून दिले आहे. आर्य लोक हिंदुस्थानात येण्यापूर्वी येथील मूळच्या क्षेत्रपतींच्या अमदानीत सर्वत्र आबादीआबाद होती; रयत निश्चित व सुखी होती. पण आर्यब्राह्मणांनी हा देश काबीज केल्यावर त्यातील लोकांना आपले गुलाम केले. सामाजिक जीवनाच्या हरएक क्षेत्रात आपले वर्चस्व अबाधित राखण्याची त्यांनी आपल्या मतलबी धर्मग्रंथांतून कायमची तरतूद करून ठेवली. हळूहळू समाजाच्या सर्व थरांतील लोकांना त्यांनी मोठ्या हिकमतीने आपल्या धर्मसत्तेच्या प्रभावाखाली आणले. कोणतेही धर्मकृत्य घेतले, तरी त्याची सांगता पुरोहिताच्या उपस्थितीशिवाय कधी होत नाही. धर्म हा जात्याच श्रद्धेचा प्रांत. त्या बाबतीत अत्यंत गरीब माणूसदेखील सहसा चालढकल करीत नाही. त्यामुळे भटभिक्षुकांचे आयतेच फावते. बारा महिने काही ना काही धार्मिक विधी घरोघर चालूच असतात. त्या निमित्ताने यथेच्छ भोजन व भरपूर दक्षणा प्राप्त करून घेण्यासाठी भटजोशी नेहमीच धडपडत असतात. मात्र त्यांचे कार्यक्षेत्र धर्मापुरतेच मर्यादित असते असे नाही. निरक्षर यजमानाची मर्जी संपादून ते त्याच्या कारकुनीचे काम पत्करतात. त्यामुळे त्याचे कागदपत्र पाहण्याची त्यांना अनायासेच संधी मिळते. तो अडचणीत सापडला आहे आणि त्याला पैशाची गरज आहे हे दिसून येताच त्याला कर्जाऊ पैसे देऊन त्याचे घरी भिक्षुकी करणारा हा भट स्वतःच त्याचा सावकार बनतो. मग यथावकाश हातचलाखी करून तो त्याला हातोहात फसवतो. कित्येकदा या भटजीबुवांच्या स्वार्थीपणाला व द्रव्यलोभाला कसलाच धरबंध राहात नाही. एखाद्या कुटुंबातील कर्ता पुरुष निधन पावला, तर शोकसागरात बुडालेल्या त्याच्या बायकोच्या मनःस्थितीचा विचारही न करता हा भटजोशी तिच्या धर्मभोळेपणाचा गैरफायदा घेण्यास कमी करत नाही. उत्तरक्रियेसाठी तिच्या ऐपतीबाहेर तिला खर्च करावयास लावतो. नवऱ्याला सद्‌गती मिळावी म्हणून ती बिचारी असा अवास्तव खर्च करण्यास तयार होते. गाठीशी पैसा नाही, तेव्हा तिची गरज भागवण्यासाठी हा भटब्राह्मण साळसूदपणे पुन्हा एकदा आपल्या पदरचा पैसा देऊन तिच्यावरील कर्जाचा बोजा व्याजापोटी उत्तरोत्तर वाढवत नेतो. ते फेडण्याची तिच्या कुटुंबियांची ताकद उरली नाही असे दिसून येताच तो त्यांच्या शेतजमिनीचे गहाणखत करून घेतो; आणि अखेर त्या कुटुंबाची मालमत्ता निःशंकपणे गिळंकृत करतो. आपल्या सांस्कृतिक परंपरेतील ब्राह्मणमाहात्म्य व विद्येची मक्तेदारी आणि मागासलेल्या जातींतील अज्ञान,

अंधश्रद्धा व रूढिप्रियता ही लक्षात घेतली की, 'ब्राह्मणांचे कसब' या पुस्तिकेतील जोतीरावांच्या ह्या प्रतिपादनात पुष्कळच तथ्य आहे असे म्हणावे लागेल.

## गुलामगिरी

जोतीरावांचा 'गुलामगिरी' हा ग्रंथ इ. स. १८७३ मध्ये प्रकाशित झाला. गुलामगिरी, मग ती धार्मिक, सामाजिक, आर्थिक किंवा अन्य कोणत्याही स्वरूपाची असो, तिच्याबद्दल जोतीरावांच्या मनात स्वभावतःच अत्यंत तिटकारा होता. त्यामुळे गुलामगिरीची प्रथा नष्ट करण्यासाठी अमेरिकेत जे यादवी युद्ध झाले त्याचे महत्त्व त्यांना मनोमन पटले. 'युनैटेड स्टेट्समधील सदाचारी लोकांनी गुलामांस दास्यत्वापासून मुक्त करण्याच्या कामात औदार्य, निरापेक्षता, व परोपकारबुद्धी दाखविली यास्तव त्यांच्या सन्मानार्थ' महात्मा फुले यांनी आपला हा ग्रंथ त्यांना अर्पण केला आहे.[११] पुढे या अर्पणपत्रिकेत त्यांनी आपले देशबांधव हे उदाहरण डोळ्यासमोर ठेवून आपल्या समाजातील शूद्रबांधवांची ब्राह्मण लोकांच्या गुलामगिरीतून मुक्तता करतील अशी अपेक्षा व्यक्त केली आहे. या ग्रंथात जोतीरावांनी मत्स्य, कच्छ, वराह, नारसिंह, वामन, परशुराम यांच्यासंबंधीच्या पौराणिक कथांची छाननी करून येथे आर्य आणि मूळचे क्षेत्रपती यांच्यात कसा दीर्घकाळ संघर्ष चालू होता आणि तो किती अटीतटीचा व भीषण स्वरूपाचा होता ते परखड शब्दांत स्पष्ट केले आहे. नृसिंह आणि वामन यांना आपल्या शत्रूचा नाश करण्यासाठी कपटनीतीचाच अवलंब करावा लागला आहे. परशुरामाने तर आपल्या मातेचा शिरच्छेद करतानाही मागेपुढे पाहिले नाही. शिवाय निःक्षत्रिय पृथ्वी करण्याच्या भरात त्यांनी येथील क्षेत्रपतींच्या बायकामुलांवर जे अनन्वित अत्याचार केले, ते ऐकून कोणत्याही पाषाणहृदयी माणसाच्या अंगावर देखील शहारे आल्याखेरीज राहणार नाहीत. आर्यांच्या धर्मग्रंथांनी यांना साक्षात आदिनारायणाचे, भगवान विष्णूचे अवतार म्हणून गौरवले आहे. परंतु सर्वशक्तिमान व परमदयाळू अशा ईश्वराच्या उदात्त कल्पनेचा हा केवढा विपर्यास आहे बरे! आर्यांचा विजय झाल्यावर त्यांनी येथील लोकांना तुच्छ लेखून आपल्या सुखस्वास्थ्यासाठी त्यांना गुलामाप्रमाणे रात्रंदिवस कष्टाची कामे करण्यास भाग पाडले. जे त्यांच्याशी त्वेषाने लढले, त्या महाअरींना, महारांना अस्पृश्य ठरवून त्यांच्यावर माणुसकीला हरताळ फासणारे असे कितीतरी कडक, हीनत्वदर्शक निर्बंध लादले त्याना विद्येचे दरवाजे कायमचे बंद करून टाकले. ज्ञानार्जनाचा अधिकार नसल्याने धर्मग्रंथांचा मतलब जाणून घेण्यास त्यांना पुराणिक पुरोहितांच्या मध्यस्थीशिवाय मार्ग उरला नाही. आपले धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत आहेत अशी या अज्ञानी शूद्रातिशूद्रांची त्यांनी समजूत करून

दिली; आणि त्यातील मंत्रसामर्थ्याविषयी त्यांच्या मनात दहशत निर्माण करून ठेवली. ब्राह्मण हे स्वतःच भूदेव बनले आणि त्यांची अवज्ञा करणे यासारखे दुसरे महत्पाप नाही हा शास्त्रप्रणीत संस्कार जनमानसात खोलवर रुजला. ही स्थिती पेशवाईअखेरपर्यंत बहुतांशी कायम होती. इंग्रजांच्या राजवटीतही तिच्यात फारसा बदल झाला नाही. राजकीय स्थित्यंतरामुळे शूद्रातिशूद्रांचे कायिक दास्य संपुष्टात आले; पण मानसिक दास्याचे जोखड काही दूर झाले नाही. विद्येची परंपरा पिढीजात असल्याने ब्राह्मण व तत्सम जातींनीच आधुनिक शिक्षणाचा लाभ तत्परतेने घेतला; आणि नव्या शासनयंत्रणेतील लहानमोठी अधिकारपदे हस्तगत केली. इतर सामाजिक क्षेत्रांतही त्यांचेच वर्चस्व होते. न्यायाधीश, वकील, फौजदार, वेलीफ, सावकार, मामलेदार, कुलकर्णी, डॉक्टर, इंजिनियर, शिक्षणाधिकारी, शिक्षक, पत्रकार, पंडित, पुरोहित यांसारख्या सामाजिक जीवनातील बहुतेक सर्व मोक्याच्या जागा त्यांच्याच ताब्यात होत्या. वर्णश्रेष्ठत्वाचा अहंकारही कमी झालेला नव्हता. ब्रिटिश अधिकाऱ्यांना इथल्या परिस्थितीची बारीकसारीक माहिती नसे. त्यामुळे आपल्या हाताखालच्या मुख्य उच्चवर्णीय अधिकाऱ्याच्या शिफारशीनुसार निर्णय करण्याचा त्यांचा परिपाट असे. तेव्हा सर्वसामान्य जनतेच्या दृष्टीने ब्राह्मण हेच खरे सत्ताधारी होते. शिवाय वेगवेगळ्या खात्यांतील हे अधिकारी वेळप्रसंगी एकमेकांना सांभाळून घेण्याच्या कामी नेहमीच दक्ष असत. अशा स्थितीत खेड्यातील अशिक्षित शेतकऱ्यावर कितीही अन्याय झाला, तरी त्याबाबतीत वरपर्यंत जाऊन दाद लावून घेणे त्याला सहसा शक्य होत नसे. पक्षपात, जुलूम, लुबाडणूक असहाय्यतेने सहन करण्याखेरीज त्याला गत्यंतर नव्हते. तेव्हा सरकारनेच बहुजनसमाजात झपाट्याने शिक्षणप्रसार करून त्यातील लोकांना शासनयंत्रणेत मोठ्या प्रमाणात सामावून घेतल्याशिवाय त्यांची स्थिती सुधारणार नाही असा जोतीरावांच्या या पुस्तकातील विवेचनाचा मथितार्थ आहे. पुस्तकाच्या शेवटी 'भट कामगार इंजिनियरखात्यात कशी पेंढारगर्दी करितात?', 'मारवाडी, भट यांचे कसब', 'भटांच्या मतलबी ग्रंथाचे कसब', 'भटांचे कसब आणि शूद्रांचा देवभोळेपणा' अशी चार छोटीशी पद्यात्मक प्रकरणे जोडली आहेत.

## शेतकऱ्याचा असूड

जोतीरावांनी 'शेतकऱ्याचा असूड' हा ग्रंथ इ. स. १८८३ मध्ये लिहून हातावेगळा केला. पण त्यांच्या हयातीत तो प्रसिद्ध होऊ शकला नाही. मात्र या ग्रंथाचे लेखन पूर्ण झाल्यावर त्यांनी त्याची एक प्रत गव्हर्नर जनरल आणि दुसरी प्रत सयाजीराव गायकवाड यांच्याकडे विचारार्थ धाडली होती. त्यांनी स्वतः "हा ग्रंथ

अनेक इंग्लिश, संस्कृत व प्राकृत ग्रंथ व हल्लीचे अज्ञानी शूद्रादी अतिशूद्रांच्या दीनवाण्या स्थितीवरून रचिला आहे "[१२] असे म्हटले आहे. तरीसुद्धा त्यांच्या प्रतिपादनाला मुख्य आधार येथील शेतकऱ्याच्या खालावलेल्या परिस्थितीचे प्रत्यक्ष अवलोकन हाच आहे. शिवाय ग्रंथाचे लेखन चालू असताना पुणे, मुंबई, ठाणे, जुन्नर, ओतूर इत्यादी वेगवेगळ्या ठिकाणी राहणाऱ्या आपल्या माहितगार शूद्र मित्रांना त्यातील मजकूर वेळोवेळी वाचून दाखवून त्याच्या खरेपणाची जोतीरावांनी खात्री करून घेतली होती. हा ग्रंथ अलीकडेच इ. स. १९६७ मध्ये मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या मराठी संशोधन मंडळाने प्रथम प्रकाशित केला. त्याचे संपादन डॉ. स. गं. मालशे व श्री. धनंजय कीर यांनी केले आहे. या ग्रंथात जोतीरावांनी सर्व बाजूंनी नाडलेल्या महाराष्ट्रातील गरीब शेतकऱ्याच्या ओढगस्त व केविलवाण्या जीवनक्रमाचे चित्रण केले आहे. हा ग्रंथ बराचसा वर्णनात्मक आहे; आणि त्यातील जोतीरावांची वर्णनशैली तिखट, धारदार व प्रत्ययकारी अशी आहे. तसे पाहिले तर हा ग्रंथ शेतकीविषयक प्रश्नांना वाहिलेला आहे. त्यामुळे त्यात शूद्र समाजातील बडे बडे राजेरजवाडे, संस्थानिक, जहागीरदार, इनामदार, तसेच अत्यंत लाजिरवाण्या स्थितीत कसे तरी दिवस कंठणारे आपले अस्पृश्य बांधव यांची विशेष दखल घेतलेली नाही. कारण "पहिले आपल्या पोकळ वैभवामुळे व दुसरे आपल्या दुर्दैवामुळे शूद्र शेतकऱ्यांपासून (ते) दुरावले आहेत."[१३] म्हणून मध्यम व कनिष्ठ प्रतीच्या शेतकऱ्यांच्या प्रश्नांना धरूनच त्यांनी या ग्रंथातील एकंदर विवेचन केले आहे. आपल्या या प्रदेशातील शेतकऱ्यांची इतकी दुर्दशा कशामुळे झाली, त्याला जबाबदार कोणकोण आहेत, त्यात त्याचा स्वतःचा दोष किती इत्यादी प्रश्नांची साकल्याने व न्यायनिष्ठुरतेने छाननी करून ही स्थिती सुधारण्यासाठी कोणते उपाय योजले पाहिजेत त्याचेही त्यांनी शेवटी दिग्दर्शन केले आहे.

शेतकऱ्यांच्या दैन्यावस्थेची जी अनेकविध कारणे आहेत, ती प्रायः धर्म व राज्य या दोन संस्थांशी निगडित आहेत. धर्म हा दैवी शासनाचा प्रांत आणि राज्य हा सकृद्दर्शनी लौकिक शासनाचा प्रांत. या दोन्ही प्रांतांतील भल्याबुऱ्या प्रवृत्तींची चर्चाचिकित्सा करण्याची कुवत आपल्या निरक्षर शेतकऱ्याच्या अंगी कुठून असणार ? "ब्राह्मण सांगतील तो धर्म, आणि इंग्रज करतील ते कायदे"[१४] एवढेच काय ते त्या बिचाऱ्याला ठाऊक होते. शिवाय ब्राह्मण हे भूदेव व राजा हा ईश्वराचा अंश अशी पक्की धारणा असल्याने ह्या दोन्ही बाबतींत आपल्यावर काही अन्याय होण्याचा संभव आहे ही कल्पनाच मुळी त्याच्या मनाला कधी शिवली नसेल. त्यामुळे साहजिकच ब्राह्मण व सरकारी अधिकारी यांच्याकडून कितीही जाच वा जुलूम झाला, तरी तो आपल्या नशिबाचा भाग म्हणून निमूटपणे सहन करण्याची त्याला

सवय जडली होती. धार्मिक व राजकीय अशा दोन्ही क्षेत्रांत त्याचा सर्वत्र कोंडमारा होत होता; पद्धतशीर लुबाडणूक चालू होती. ' तोंड दाबून बुक्क्यांचा मार ' अशी त्याची अवस्था झाली होती. शेतकऱ्याच्या या अगतिकतेचे मूळ, जोतीरावांच्य मतानुसार त्याच्या अज्ञानात, अशिक्षितपणात होते. ही गोष्ट त्यांनी आपल्या इतर ग्रंथांतूनही वारंवार सांगितली आहे. ह्या ग्रंथाच्या उपोद्घाताच्या प्रारंभी तर त्यांनी " विद्येविना मती गेली, मतीविना नीती गेली, नीतीविना गती गेली, गतीविना वित्त गेले, वित्ताविना शूद्र खचले, इतके अनर्थ एका अविद्येने केले "[१५] असे म्हटले आहे. सामाजिक जीवनाच्या वेगवेगळ्या क्षेत्रांमधून होणाऱ्या आर्थिक शोषणाकडे या ग्रंथाच्या द्वारे जोतीरावांनी सर्वांचे लक्ष वेधले आहे. त्यांच्या ह्या असुडाचे फटके प्रस्थापिताच्या हस्तकांच्या वर्मी लागावेत असे आहेत. इथल्या परिस्थितीचे तुटपुंजे ज्ञान असलेले ब्राह्मणधार्जिणे व ऐषआरामी वृत्तीचे गोरे साहेब, लाचखाऊ पण लब्धप्रतिष्ठित उच्चवर्णीय अधिकारी, ब्राह्मण कामगारांच्या ओंजळीने पाणी पिणारे देशमुख पाटील यांच्यासारखे वतनदार, द्रव्यलोभी सावकार आणि धर्मकृत्यांचा बाजार मांडणारे पुराणिक-पुरोहित या सर्वांचीच शेतकऱ्याच्या शोषणात भागीदारी होती. जोतीरावांनी त्यांच्या वागणुकीचे विश्लेषण करून ज्याच्या त्याच्या दुष्कृत्यांचे माप रोखठोकपणे त्याच्या पदरात टाकले आहे. हिंदू समाजातील शूद्रातिशूद्रांची परिस्थिती समजून घेऊन आपल्या शिक्षणविषयक धोरणाची फेररचना करण्याची त्यांनी सरकारला विनंती केली आहे. त्याबरोबरच शेतकऱ्यांनीही अज्ञान, आळस, सुखासीनता, धर्मभोळेपणा, व्यसनासक्ती, गतानुगतिकता इत्यादी आपले दोष काढून टाकले पाहिजेत; आणि डोळे उघडे ठेवून आपल्या हितसंबंधांची जपणूक केली पाहिजे याचीही जोतीरावांनी त्यांना जाणीव करून दिली आहे.

### सत्सार

जोतीरावांनी इ. स. १८८५ मध्ये ' सत्सार ' हे नियतकालिक सुरू केले. पहिल्या अंकात त्याला ' निःपक्षपाती विचारशील महंमदी, ख्रिस्ती व हिंदू ' बांधवांचा चांगला प्रतिसाद मिळाला तर ते पुढे चालू ठेवण्याचे आश्वासन दिले होते. एक महिन्याच्या अवधीत त्याच्या १०५० प्रती खपल्या. तेव्हा त्यांनी लगोलग दुसरा अंक प्रसिद्ध केला. पहिल्या अंकाचा खप पाहिला, की त्या वेळी जोतीरावांच्या चाहत्यांची व हितचिंतकांची संख्या किती मोठी होती ते समजते. पहिल्या अंकात त्यांनी ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज यांची भूमिका, भिन्न जातींतील स्त्रीपुरुषांच्या संबंधातून जन्मलेल्या संततीचे सामाजिक स्थान, आणि आर्यभटांची धर्मकल्पना या तीन प्रश्नांची चर्चा केली आहे. जोतीरावांच्या समोर नेहमी विशिष्ट प्रश्न असतात.

आपल्या विवेचनपद्धतीत ते त्यांचे अनुसंधान कधी सुटू देत नाहीत. साहजिकच त्यांना स्थलकालनिरपेक्ष अमूर्त संकल्पनांचा काथ्याकूट करावासा वाटत नाही. त्या त्या प्रश्नांच्या बाबतीत उच्चवर्णियांतील सनातनी व सुधारक पक्षांच्या आचार-विचारांत जी वैगुण्ये आढळतात त्यांवर ते जोरदार हल्ला चढवतात. ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज विश्वधर्माचे प्रतिपादन करतात, बंधुभावाची शिकवण देतात. पण मग प्रत्यक्ष कृतीच्या वेळी मात्र कचखाऊपणा करतात. आजतागायत अन्यायाने व निर्दयपणे अस्पृश्य म्हणून दूर लोटलेल्या आपल्या महारमांग बांधवांना ते दैनंदिन व्यवहारात बरोबरीच्या नात्याने वागवत नाहीत. आपल्या धार्मिक व सामाजिक कार्यात त्यांना सामील करून घेत नाहीत असा जोतीरावांचा आक्षेप होता. म्हणून "आता आम्हांला तुमचे ब्रह्मसमाज व प्रार्थनासमाज नकोत."[१६] असे ते निक्षून सांगतात. अनुलोम पद्धतीच्या स्त्रीपुरुष संबंधातून जन्मलेल्या संततीकडे आर्य धर्म-शास्त्राचे प्रणेते थोड्या सहानुभूतीने पाहतात. प्राचीन काळी व्यास आणि वसिष्ठ यांना त्यांनी 'आपल्यांत सरते करून' घेतले हे सर्वश्रुत आहे. पण प्रतिलोम पद्धतीच्या अशा संबंधाविषयी मात्र या शास्त्रकारांच्या मनात तिरस्काराची भावना दृढमूल झालेली आहे. त्यांच्या मतप्रतिपादनात याबाबत जो तरतमभाव दिसून येतो, तो विषमतेवर आधारलेल्या पुरुषप्रधान संस्कृतीच्या प्रभावाचा निदर्शक आहे. हिंदू धर्म-शास्त्रकारांनी मूळच्या उदात्त धर्मकल्पनेचा विपर्यास करून "आर्यब्राह्मण भूदेवांची सेवाचाकरी करणे हाच काय तो शूद्रांचा धर्म"[१७] हा विचार बेमालूमपणे समाजाच्या सर्व थरांतील लोकांच्या गळी उतरवला. "आर्य ब्राह्मणांनी पूर्वी जेर केलेल्या शूद्रांवर आपला स्वामित्वाचा पगडा जसाच्या तसाच कायम ठेविला, कारण त्यावेळी शूद्र लोक इतके बळहीन व अज्ञानदशेप्रत पावले होते, की आर्य ब्राह्मणांनी केलेल्या कृत्रिमी ग्रंथांस ते ( शूद्र ) ईश्वरदत्त मानू लागले."[१८] अशा तऱ्हेने धूर्त आर्य ब्राह्मणांनी धर्म शब्दाच्या खऱ्या अर्थाचा 'खुबीदार अनर्थ' केला. जोतीरावांच्या विवेचनाचा हा स्थूलमानाने गर्भितार्थ आहे. सत्साराचे दोनच अंक आतापर्यंत उपलब्ध झाले आहेत. दुसऱ्या अंकात खास अशा काही वेगळ्या विषयांची चर्चा केलेली नाही. त्यातील लेखावर सुरुवातीस 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' असा मथळा दिला आहे. पंडिता रमाबाई आणि 'स्त्रीपुरुष तुलना' या पुस्तकाच्या लेखिका ताराबाई शिंदे यांना शिकवण्याचा आव आणणाऱ्या एका आडमुठ्या वर्तमानपत्र-कर्त्यावर, त्याचे नाव उघड न करता जोतीरावांनी अत्यंत कठोर शब्दांत टीका केली आहे. तसेच ताराबाईच्या पुस्तकातील मतांचे मुद्देसूद खंडन न करता त्यांच्यावर अकारण व्यक्तिगत टीकेची आग पाखडल्याबद्दल आणि एकंदर स्त्रीजातीविषयीच्या त्याच्या अनुदार वृत्तीबद्दल फुले यांनी त्याचे अक्षरशः वाभाडे काढले आहेत.

पंडिता रमाबाई आणि ताराबाई यांची ज्ञाननिष्ठा, धर्मजिज्ञासा, समतेच्या तत्त्वा-विषयीचा आग्रह या गुणांची त्यांनी प्रशंसा केली आहे. उच्चवर्णीयांत अलीकडे जो स्त्रीशिक्षणाचा प्रसार होत आहे, त्याचे बरेचसे श्रेय पंडिता रमाबाईंना द्यावयास हवे असे जोतीरावांचे म्हणणे आहे. लेखाच्या उत्तरार्धात त्यांनी 'सर्व प्रकारचे साहसादी दुर्गुण स्त्रियांचेच आंगी वसतात' या पूर्वग्रहदूषित समजुतीचे सयुक्तिकपणे खंडन केले आहे.

## इशारा

'इशारा' ही जोतीरावांची पुस्तिका इ. स. १८८५ साली प्रसिद्ध झाली. तिच्यात त्यांनी "जातिभेद असला म्हणून आपल्या इष्ट हेतूस तो (जातिभेद) बिलकूल (या देशाचे उन्नतीस) आडवा येत नाही" या मताचे खंडन केले आहे. त्याबरोबरच अशा चुकीच्या मतप्रतिपादनामुळे सर्वसामान्य लोकांचा बुद्धिभेद झाल्यास त्यात देशाचे उलट नुकसान आहे असा इशाराही दिला आहे. शिवाय "पूर्वीच्या तीस वर्षांपेक्षा हल्ली शूद्र शेतकऱ्यांची स्थिती बरी आहे" हे म्हणणेही कसे निरर्थक व निराधार आहे ते दाखवून दिले आहे. [१९]

ब्रिटिशपूर्वकालात प्राचीन काळापासून येथे जे राज्यकर्ते होऊन गेले, त्यांनी प्रजेच्या कल्याणाकडे कधी विशेष लक्ष दिले नाही. प्रजा या शब्दात जोतीरावांनी फक्त शूद्र आणि अतिशूद्र यांचाच अंतर्भाव केला आहे. आर्य ब्राह्मण आणि मुसल-मान हे ब्रिटिशपूर्व कालातील दोन प्रमुख राज्यकर्ते होत. त्यांच्या राजवटीत प्रजेला खूपच जुलूम सोसावा लागला. ब्राह्मणशाही आणि जातिसंस्था यांचा तर अगदी अतूट व आंतरिक संबंध होता. जातिसंस्थेने खालच्या जातींच्या लोकांना नानाविध कष्टाची व हलक्या प्रतीची कामे नेमून दिली होती; आणि वरच्या दर्जाची व कमी श्रमाची कामे वरिष्ठ जातीसाठी राखून ठेवली होती. "एका तरी ब्राह्मणाच्या कुटुं-बातील बायकामुलांस, आम्हां शूद्र शेतकऱ्यांचे बायकामुलांसारखे उन्हातान्हात उपाशीतापाशी शेतीकामे करण्याचा इंगा माहीत आहे काय? या सर्व भटब्राह्मणांतील एकाने तरी सोनखताच्या पाट्या वाहून झाडांच्या खोडाशी टाकल्या आहेत काय?" [२०] असे प्रश्न विचारून जोतीरावांनी जातिव्यवस्थेतील तथाकथित श्रम-विभागाचे अन्यायमूलक व पक्षपाती स्वरूप उघडकीस आणले आहे. ब्रिटिशांची कारकीर्द सुरू झाल्यावर एकंदर परिस्थितीत पुष्कळच बदल घडून आला. नवी शासनपद्धती अमलात आली. शेतकऱ्याला आवश्यक असलेली शांतता व सुव्यवस्था लाभली. त्याच्या जीविताला व स्वकष्टार्जित मालमत्तेला लूटमार व जुलूमजबरदस्ती यांपासून कायदेशीर संरक्षण मिळाले. यापेक्षाही सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे कालवे

काढून शेतीला हुकमी पाणीपुरवठा करण्याची सोय झाल्याने शेतकऱ्याला बरे दिवस येण्याची आशा उत्पन्न झाली. मात्र या परिस्थितीचा फायदा फारच थोड्या लोकांना मिळालेला आहे. अजूनही बहुसंख्य शेतकरी पीकपाण्यासाठी पावसावर अवलंबून राहतात. पाऊस चांगला झाला नाही की, त्यांची मोठी पंचाईत होते. आधीच्या वर्षी साठवलेले धान्य निर्वाहासाठी खर्ची पडते; आणि मग बीबियाण्यासाठी ब्राह्मण व मारवाडी सावकारांचे घर ठोठावण्याची पाळी येते. 'बुडत्याचा पाय खोलात' या न्यायाने त्याची आर्थिक स्थिती अधिकाधिक बिघडत जाते. अखेर शेत, गुरेढोरे, घरदार हे सर्वच्या सर्व सावकाराच्या ताब्यात जाऊन तो देशोधडीला लागतो. उच्चवर्णीय सावकारांना आपल्या ह्या देशबांधवांच्या सुखदुःखाचे काहीच सोयरसुतक नसते. व्यापक सामाजिक जाणिवेचा हा अभाव, ही सहानुभूतिशून्यता व निर्घृण द्रव्यलालसा यांचे मूळ, आपली विशिष्ट सामाजिक घडण लक्षात घेता, संकुचित जातीय मनोवृत्तीतच आहे असे म्हणावे लागेल. अजूनही आपल्या समाजातील वरिष्ठ वर्गाने जातिसंस्थेमधून जोपासल्या गेलेल्या जुन्या कालबाह्य पूर्वसंस्कारांना सोडचिठ्ठी दिलेली नाही. याचीच खरोखर जोतीरावांना खंत होती; आणि त्यांनी ती वारंवार बोलून दाखवली आहे.

दुसरा प्रश्न, शेतकऱ्यांची स्थिती सुधारली आहे की नाही? या प्रश्नाचा निर्णय करताना सुधारणा ही कल्पना देशकालपरिस्थितिसापेक्ष असते हे विसरून चालणार नाही. तेव्हा या प्रश्नाचा उलगडा समाजाच्या इतर घटकांच्या तुलनेने केला पाहिजे. काही थोड्या शेतकऱ्यांची सांपत्तिक स्थिती सुधारली असेल; परंतु त्यांच्यापैकी फार मोठा समुदाय अद्याप विपन्नावस्थेतच आहे. शिवाय या कालावधीत बाकीच्या वर्गाची किती भरभराट झाली, तेही विचारात घेतले पाहिजे. तसे न करता "पूर्वीच्या तीस वर्षांपेक्षा हल्ली शूद्र शेतकऱ्यांची स्थिती बरी आहे" असे सरधोपट विधान करणे हे "पूर्वीचे गायागुरांचे कळप वळणाऱ्या, वल्कले नेसून पर्णकुटीत वास करणाऱ्या, कंदमुळांवर निर्वाह करून जंगलोजंगली भटकत फिरणाऱ्या आर्यभट ब्राह्मणांपेक्षा हल्लीचे भिल्ल, कोळी, मांग व महारांची स्थिती फार नामी आहे असे म्हणण्यासारखे आहे"[२१] अशा प्रकारे वरील दोन्ही प्रश्नांचा जोतीरावांनी या पुस्तिकेत तत्परतेने परामर्श घेतला आहे.

## सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक

'सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक' हा जोतीरावांचा शेवटचा ग्रंथ त्यांच्या मृत्यूनंतर १८९१ त प्रसिद्ध झाला. हिंदुधर्मसंस्थेवर जरी जोतीरावांनी वारंवार हत्यार उपसले होते, तरी मनुष्यमात्राच्या जीवितसाफल्यासाठी धर्मभावनेची आवश्यकता आहे अशी

त्यांची दृढ धारणा होती. धर्मजीवनातील भाबडेपणा, दंभ व मिथ्याचार यांची त्यांना मनापासून चीड होती हे खरे. पण नास्तिकता आणि धर्मपराङ्मुखता यांनाही त्यांचा सक्त विरोध होता. म्हणून सत्यशोधक समाजातील आपल्या अनुयायांच्या मार्गदर्शनासाठी त्यांनी आपला उजवा हात पक्षघाताने निकामी झाला असताही धीर न सोडता डाव्या हाताने हा ग्रंथ लिहून काढला. "या आपल्या अमर्याद विस्तीर्ण पोकळीमध्ये निर्मिकाने अनंत सूर्यमंडळांसह त्यांच्या ग्रहोपग्रहांसहित तत्संबंधी एकंदर सर्व प्राणिमात्रांस उत्पन्न केले आहे. त्यांपैकी आपण सर्व मानव स्त्रीपुरुषांनी त्याविषयी काय काय करावे आणि आपण सर्व एकंदर मानव स्त्रीपुरुषांनी त्याचे स्मरण मनी जाग्रत ठेवून एकमेकांशी कोणत्या तऱ्हेचे आचरण केल्यामुळे त्यास आनंद होणार आहे; यास्तव मी त्याच्या कृपेने एकंदर सर्व मानव स्त्रीपुरुषांच्या हितासाठी हा लहानसा ग्रंथ रचिला आहे."[२२] असा या ग्रंथलेखनाचा उद्देश त्यांनी आपल्या प्रास्ताविक निवेदनात नमूद केला आहे. या ग्रंथात त्यांनी आपल्या धर्मविषयक विचारांचे सार-सत्त्व सुबोधपणे थोडक्यात पण समग्रतेने ग्रथित केले आहे. सर्वसामान्य लोकांना आपले नित्याचे कामकाज सांभाळून त्याचे वाचन व मनन करता यावे म्हणून त्यांनी त्याच्या रचनेत आटोपशीरपणा राखला आहे. शूद्रातिशूद्रांना वेदोक्त धर्मसाधनेचा अधिकार नाही. त्यांच्यासाठी हिंदू परंपरेने पौराणिक धर्माचा पसारा मांडून ठेवला आहे. त्यात पूजाअर्चा, जपजाप्य, तीर्थयात्रा, व्रतवैकल्ये, दानधर्म, नामस्मरण इत्यादी गोष्टींचा अंतर्भाव करण्यात आला आहे. यांपैकी बहुतेक सर्व गोष्टींचा ऊहापोह करून जोतीरावांनी त्यांचा फोलपणा निर्भीडपणे दाखवून दिला आहे. त्याबरोबरच खऱ्याखुऱ्या ईश्वरभक्तीचे रहस्य त्यांनी विशद करून सांगितले आहे. शिवाय आपल्या एकंदर विवेचनात त्यांनी सत्यनिष्ठा व नीतिमत्ता यांचा विशुद्ध धर्मभावनेशी अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध आहे हे तत्त्व लोकांच्या मनावर ठसवण्याचा परोपरीने प्रयत्न केला आहे. धर्मपालनात भावशुद्धीला व अनन्यनिष्ठेला असाधारण महत्त्व आहे. म्हणून ईश्वरोपासनेत बाह्योपचारांचे अवास्तव स्तोम माजवणे जोतीरावांना बिलकूल मान्य नव्हते. तरीदेखील मनुष्यस्वभाव लक्षात घेता आपल्या सामाजिक जीवनक्रमातून धार्मिक विधींना अजिबात फाटा देणे शक्य होणार नाही याची त्यांना जाणीव होती. म्हणून जन्म, नामकरण, लग्न, अंत्यक्रिया, श्राद्ध इत्यादी काही मोजके विधी साधेपणाने, शुद्ध मनाने व समाजहितबुद्धीने कसे करावेत याचा त्यांनी या ग्रंथाच्या शेवटच्या भागात खुलासा केला आहे. जनसामान्यांची गरज काय आहे ते पाहून सार्वजनिक सत्यधर्म ग्रंथात त्यांनी धर्माच्या विविध अंगोपांगांची दखल घेतली आहे. जोतीरावांची धर्मजिज्ञासा निकोप व तत्त्वार्थलक्षी होती. 'पांचै पालव मोकळे। आठै पाहार'[२३]

अशा खुल्या दिलाचे आणि निःस्वार्थ बुद्धीचे ते क्रियाशील तत्त्वचिंतक होते. याचा अर्थ त्यांची लढाऊपणाची ऊर्मी ओसरली होती असा नाही. मात्र तिच्यात द्वेष-भावनेला थारा नव्हता. अशा प्रकारच्या त्यांच्या आयुष्यभरच्या तत्त्वाचिंतनाचा परिपाक आपल्याला या ग्रंथात पाहावयास मिळतो. त्यांच्या लेखनशैलीतील आक्र-मकता येथे क्वचितच दिसून येते. सरळ, सहजस्फूर्त निरूपण अशीच या ग्रंथाची धाटणी आहे. जोतीरावांचा धर्मतत्त्वाचा शोध हा विश्वधर्माचा शोध होता. म्हणूनच त्यांची दृष्टी संकुचित देशाभिमानाच्या, धर्माभिमानाच्या, सांप्रदायिकतेच्या मर्यादा ओलांडून सार्वजनिक मानवधर्माकडे वळली आहे याचा या ग्रंथात पुन्हा पुन्हा प्रत्यय आल्याखेरीज राहात नाही.

## अखंडादी काव्यरचना

जोतीरावांनी अनेक गद्यग्रंथ लिहिले, त्याप्रमाणेच त्यांच्या हातून झालेले बरेचसे पद्यवाङ्मयही उपलब्ध आहे. त्यांची पद्यरचना ही 'शिवाजीचा पवाडा' आणि 'ब्राह्म-णांचे कसब' या दोन पुस्तिका वगळल्या तर बहुतांशी स्फुट स्वरूपाची आणि जुन्या मराठी साहित्यातील अभंगवाङ्मयाच्या धर्तीची आहे. मात्र या रचनाप्रकाराला त्यांनी 'अखंड' असे नाव दिले होते. त्यात त्यांनी विविध विषयांचा अंतर्भाव केला आहे. मानवांचा धर्म एक, आत्मपरीक्षण, नीती, धीर, समाधान, सहिष्णुता, सद्‌विवेक इत्यादी विषय उघडउघड बोधपर आहेत. गणपती, भटाची वाणी, ब्राह्मणांचा भोंदू-पणा यांसारख्या विषयांच्या द्वारा त्यांनी आपल्या नेहमीच्या धारदार पद्धतीने हिंदू धर्मावर टीकास्त्र सोडले आहे. वळी राजा, मानव महंमद या थोर महात्म्यांची महती। वर्णन करण्यासाठीही त्यांनी अखंडांची रचना केली आहे. काही पद्यरचना म्हणजे तर सयाजीराव गायकवाड, गंगारामभाऊ म्हस्के यांच्यासारख्या प्रसिद्ध व्यक्तींना लिहिलेली पत्रेच आहेत. आपल्या विचारांच्या प्रसारासाठी अधिक उपयुक्त व सोयीचे होईल असे वाटल्यावरूनही कदाचित जोतीरावांनी गद्याबरोबर पद्याचे माध्यम स्वीकारले असेल. त्यांचे विचार निःसंशय मौलिक, संघर्षप्रवण व प्रक्षोभक आहेत. त्यामुळे साहजिकच त्यांच्या पद्यलेखनातही काव्यात्मकतेपेक्षा गद्यशैलीचे गुणविशेषच दिसून येतात. ह्या पद्य-वाङ्मयात त्यांनी जे विचार ग्रथित केलेले आहेत, ते त्यांच्या गद्यग्रंथांतूनही अनेकदा व्यक्त झालेले आहेत. कारण त्यांच्या दृष्टीने वाङ्मय हे केवळ एक साधन होते. त्यांची भूमिका ही वस्तुतः ध्येयवादी प्रबोधकाची होती; लोक-जागृतीसाठी लेखणीचा वापर करणाऱ्या सामाजिक कार्यकर्त्याची होती.

## प्रकाशन–' जातिभेदविवेकसार '

तुकाराम तात्या पडवळ यांनी लिहिलेला 'जातिभेदविवेकसार' हा ग्रंथ 'एक हिंदु' या टोपणनावाने इ. स. १८६१ मध्ये प्रसिद्ध झाला. त्याचे प्रकाशक वासुदेव बाबाजी नवरंगे हे होते वासुदेवराव हे प्रार्थनासमाजाचे अनुयायी असले, तरी त्यांना जोतीरावांच्या कार्याबद्दल पुष्कळच आस्था होती. या ग्रथाची दुसरी आवृत्ती जोतीरावांनी इ. स. १८६५ मध्ये प्रसिद्ध केली जातिभेदाचे समर्थक जे धर्मग्रंथ प्रमाण मानतात, त्यांचाच आधार घेऊन या ग्रंथलेखकाने सनातनी पक्षाच्या जातिभेदाविषयीच्या भूमिकेचे सविस्तर खंडन केले आहे. त्यासाठी त्यांनी मनुस्मृती, याज्ञवल्क्यस्मृती, वसिष्ठस्मृती, महाभारत, भागवत, पद्मपुराण, इत्यादी सुविख्यात ग्रंथांतील वचने जागोजाग उद्धृत केली आहेत. तसेच आपल्या देशातील साधुसंतांनीही जातिव्यवस्थेमधील उच्चनीचभावाचा किती तीव्रतेने निषेध केला आहे ते ग्रंथकर्त्याने अनेक उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे. याशिवाय ग्रंथाच्या अखेरीस त्यांनी 'वज्रसूचि' या उपनिषद्ग्रंथाचा मराठी अनुवाद दिला आहे. त्यात जातिभेद हा कसा शास्त्रसंमत व युक्तिसंमत नाही ते अगदी पद्धतशीर व समर्पक रीतीने प्रतिपादन केले आहे. अशा तऱ्हेने या विषयाचा यथोचित परामर्श घेतल्यावर लेखकाने ग्रंथाच्या उपसंहारात "सांप्रत जो जातिभेद आपणामध्ये चालत आहे त्यास सच्छास्त्राचा आधार नाही. आणि त्यापासून सांसारिक फायदाही म्हणण्यासारिखा काही निष्पन्न न होता उलटे ऐहिक व पारमार्थिक असे उभयप्रकारे तोटेच आहेत. आणि साधु, संत व पंडितजन यांची त्याच्या विरुद्ध संमती आहे, असे आपण आपल्या डोळ्याने धडधडीत पहात असता अंधपरंपरेने अनर्थकारी जातीच्या बंधनात राहून चालावे, यात आपल्या मनुष्यपणास बट्टा येतो"[२४] असे म्हणून आपल्या देशबांधवांच्या विवेकबुद्धीला योग्य तो बोध घेण्याचे आवाहन केले आहे या ग्रंथातील, विशेषतः वज्रसूचीतील विवेचन आपल्या मतप्रणालीला उपकारक आहे याची जाणीव झाल्यामुळेच जोतीरावांनी हा ग्रंथ प्रकाशित केला असणार हे उघड आहे.

## भाषेतील आगळेपण व आक्रमकता

जोतीरावांची भाषा ही मराठी मातीतील जीवनसत्त्व शोषून घेऊन जन्मलेली आणि मराठी मातीशी नित्य इमान राखणारी अशी अस्सल मराठी वळणाची भाषा आहे. उच्चवर्णीय सुशिक्षितांच्या प्रमाणे त्यांच्या मनावर इंग्रजीचे किंवा संस्कृतचे अवास्तव दडपण नव्हते. शिवाय पाश्चात्त्य जगातील नवे ज्ञान व नव्या प्रवृत्ती आत्मसात करताना लहानपणापासून येथील जनसामान्यांशी असलेला त्यांचा संपर्क तुटला असे कधी झाले नाही. त्यांच्या डोळ्यासमोर नेहमीच कष्टकरी समाजातील

सर्वसामान्य माणूस होता. त्याच्या खडतर व दुःखमय जीवनाशी ते तादात्म्य पावले होते. त्याच्या भवितव्याची त्यांना सदैव चिंता लागून राहिली होती. त्याच्याशी जिवाभावाचा संवाद साधण्याच्या प्रयत्नांतून त्यांचे विचार स्फुरलेले होते; आणि त्यांना शब्दरूप देणारी भाषाही त्यांतूनच घडलेली होती. अर्थातच त्यांना विचार आणि भाषा यांची कृत्रिमतेने सांगड घालण्याची गरजच भासली नाही. त्यामुळे त्यांच्या भाषेत स्वाभाविकता आली. कुणालाही चटकन कळेल, त्याच्या अंतःकरणाला सहजपणे जाऊन भिडेल असा आपोआपच त्यांच्या भाषेचा घाट बनला. त्यांच्या भाषेत सोपेपणा होता; स्पष्टता होती. पण त्यांच्या लेखनशैलीचा खास विशेष हा की, तिच्यात एक प्रकारचा निकोप रोकठोकपणा होता. विद्वज्जनांच्या मतप्रतिपादनातील डावपेच त्यांना कधी ग्राह्य वाटले नाहीत. दीनदुबळ्यांच्या विषयी त्यांना खोल सहानुभूती होती. उलट त्यांना नाडणाऱ्या ऐतखाऊ व अहंमन्य प्रतिष्ठित वर्गाबद्दल त्यांना विलक्षण चीड होती. ही सहानुभूती आणि ही चीड या वास्तविक एकाच नाण्याच्या दोन बाजू होत. जोतीराव सामाजिक जीवनात पददलितांचा पक्ष घेऊन ठामपणे उभे होते. सौम्यता, संकोच आणि आर्जवीपणा हे गुण त्यांच्या स्वभावात नव्हते; आणि भाषेतही नव्हते. आक्रमकता हाच त्यांच्या चित्तवृत्तीचा आणि वाणीचा स्थायीभाव होता. जे जे काही म्हणून अशिव, अन्यायमूलक व अनर्थकारक असे दिसून येईल, त्याच्यावर ते बेधडक तुटून पडत; कोणताही आडपडदा न ठेवता त्यावर ते सरळ घाव घालीत असत. त्यांच्या अशा लेखनात मग सूचकतेला किंवा संदिग्धतेला यत्किंचितही वाव मिळत नसे. " निष्कपटां होआवें । उशिना घाई जूझावें " [२५] अशी त्यांची रणनीती होती. जोतीरावांचा सारा खटाटोप शूद्रातिशूद्रांच्या बचावासाठी, दास्यमुक्तीसाठी होता. पुष्कळदा आक्रमक भूमिका हीच उत्कृष्ट व परिणामकारक बचावाची हमी ठरते. या तत्त्वाशी जोतीरावांचा हा दृष्टिकोण सुसंगत असा होता. ह्या बाबतीत त्यांचे कबीर, तुकाराम आणि थॉमस पेन यांच्याशी बरेच साधर्म्य आहे. " समुझाये समुझे नहीं, देहु धका दुइ और " [२६] मूर्खाला ( तसेच पढतमूर्खालाही ) गोडीने सांगून नीट उमगले नाही, तर त्याला दोन दणके देऊनच ताळ्यावर आणावे लागते असे कबीरांनी आपल्या ' बीजक ' ग्रंथातील विप्रमतीसी या प्रकरणात म्हटले आहे. कबीर आणि तुकाराम यांचा वाङ्मयीन पिंड हा एकाच जातीचा आहे. " देव्हाऱ्यावरि विंचू आला । देवपूजा नावडे त्याला । तेथें पैजारेचें काम । अधमासि तों अधम " [२७] ही तुकारामांची उक्ती सर्वांच्या परिचयाची आहे.

पेन यांनी स्वतः आपल्या वाङ्मयीन शैलीबद्दल जे काही म्हटले आहे ते या संदर्भात लक्षात घेण्याजोगे आहे. " लेखन करताना मी अगदी साधी आणि स्पष्ट अर्थबोध होईल अशी भाषा वापरतो. अप्रत्यक्ष सूचना व सौम्य इशारे देण्याच्या भानगडीत मी

कधीच पडत नाही. याला माझ्यापाशी कित्येक प्रबळ कारणे आहेत. पहिले कारण असे की माझ्या म्हणण्याचा आशय नीटपणे लोकांच्या ध्यानात आला पाहिजे. दुसरे म्हणजे माझी कळकळ आणि निर्धार यांची त्यांना खात्री पटली पाहिजे. आणि तिसरे म्हणजे खोटेपणाकडे स्वयंतुष्टतेने डोळेझाक करणे हा सत्याचा उपमर्द आहे असे मी मानतो." [२८] पेन यांचे हे निवेदन पाहिले की त्यातला बराचसा भाग जोतीरावांच्या विवेचनपद्धतीला लागू पडतो असे कळून आल्याखेरीज राहात नाही. जोतीराव हे सत्यनिष्ठ होते. धूर्त, ढोंगी व मतलबी लोकांची त्यांनी कधीच गय केलेली नाही. त्यांच्या संभाषणात्मक लेखनातील प्रतिपादनही निर्भीड, सडेतोड, मर्मभेदी असे आहे. त्यांच्या वाङ्मयातून, विशेषतः 'गुलामगिरी' व 'शेतकऱ्याचा असूड' या ग्रंथांतून जोतीरावांच्या प्रभावी व प्रत्ययकारी वर्णनशैलीचे अनेकदा दर्शन घडते. शेतकऱ्यांच्या दैन्यावस्थेची त्यांनी केलेली वर्णने नुसती हृदयद्रावक नाहीत, तर ती वाचकांच्या चित्तांत खळबळ माजवणारी आहेत. जोतीरावांच्या वाङ्मयात काही विचार आणि कथाभाग पुन्हा पुन्हा येतात. परंतु मतप्रचाराच्या व प्रबोधनाच्या दृष्टीने हा दोष आहे असे म्हणता येणार नाही. उलट 'विवरलेंचि विवरावें'[२९] या रामदासांच्या उक्तीप्रमाणे प्रबोधनकार्याच्या परिपूर्तीसाठी अशी पुनरुक्ती आवश्यकच असते.

जोतीरावांच्या वाङ्मयातील काही गोष्टी आज आपल्या कानाला खटकतात. त्यांच्या भाषेत अनेक ठिकाणी ओबडधोबडपणा व वाक्यरचनेतील सैलपणा दृष्टीस पडतो. त्यांच्या लेखणीतून कित्येकदा अपशब्दही निःशंकपणे बाहेर पडतात. असे आणखीही काही दोष त्यांच्या लेखनातून काढून दाखवता येतील. पण असे दोषदर्शन करताना प्रथम हे वाङ्मय त्यांनी कुणासाठी आणि कोणत्या हेतूने लिहिले ते समजून घेतले पाहिजे. त्यांना शूद्रातिशूद्रांच्या मनात आपल्या स्वतःच्या गुलामगिरीबद्दल असंतोष निर्माण करावयाचा होता. त्यांच्यातील वर्णश्रेष्ठत्वाविषयीचा न्यूनगंड त्यांना नष्ट करावयाचा होता. शूद्रातिशूद्रांना गुलामगिरीत डाबून ठेवणाऱ्या लोकांचे संभावितपणाचे बुरखे फाडून टाकून त्यांच्या मनोवृत्तीतील घृणास्पदता त्यांना उघडकीस आणायची होती. शूद्रातिशूद्रांचा हा समाज स्थितिप्रिय व गतानुगतिक होता. त्याच्यात त्या वेळी शिक्षणाचा प्रसार अगदी अल्प प्रमाणात झालेला होता. त्यांची व्यवहाराची आणि विचाराची भाषा प्रायः एकच होती. आपल्याला जे अपशब्द वाटतात, ते त्यांच्या नित्याच्या व्यवहारात सर्रास प्रचारात होते. लोकांच्या भाषेत निरूपण करणाऱ्या जुन्या संतांच्या वाङ्मयातही असे काही अपशब्द आढळतात. हे शब्दही सामान्यतः त्यांच्या निषेधपर उद्गारात सहजपणे आलेले आहेत. हे सर्व लक्षात घेऊन या प्रश्नाचा विचार केल्यास बऱ्याच आक्षेपार्ह गोष्टींचा उलगडा झाल्याखेरीज राहणार नाही.

अव्वल इंग्रजीतील नवशिक्षित तरुणांनी आपल्या सामाजिक कार्यात उपयुक्त ज्ञानप्रसाराला प्राधान्य दिले होते. 'ज्ञान हीच शक्ती आहे' हे त्यांचे आवडते ब्रीदवाक्य होते. जोतीरावांनाही हे ज्ञानमाहात्म्य पटलेले होते. म्हणूनच त्यांनी सरकारने बहुजनसमाजात शिक्षणाचा प्रसार करण्याच्या प्रयत्नांना अग्रक्रम दिला पाहिजे असा आग्रह धरला होता. त्यांना स्वतःला ज्ञानार्जनाची जी ओढ होती ती केवळ कुतूहलापोटी किंवा विशुद्ध विद्यानंदासाठी नव्हती आपल्या अनेकविध अनुभवांचा सम्यक अर्थ लावता यावा, सामाजिक जीवनातील विविध प्रवाहांचा व प्रवृत्तींचा वेध घेता यावा, त्यांत बदल घडवून आणण्याची दिशा शोधता यावी यासाठीच त्यांनी आपली ज्ञानोपासना चालू ठेवली होती. त्यांचा जीवनविषयक दृष्टिकोण हा त्यांना कोणत्याही ग्रंथातून वा विचारसंप्रदायातून आयता तयार मिळालेला नव्हता, तर तो त्यांनी आपल्या अनुभवातून आणि चिंतनातून स्वतःच स्वतंत्रपणे घडवला होता. तो घडवताना अर्थातच त्यांच्याभोवती जे वातावरण होते, ज्या लहानथोर लोकांच्या सान्निध्यात ते वावरले, जे ग्रंथ त्यांच्या वाचनात आले, त्यांचा त्यांच्या मनावर काही ना काही संस्कार झाला असणारच. त्यानंतर त्यांनी जो व्यासंग केला त्यात त्यांचे एक विशिष्ट धोरण होते. आपल्या भूमिकेच्या व कार्याच्या प्रसाराला ज्यामुळे मदत होईल अशा तऱ्हेच्या वाचनाकडेच त्यांनी खास लक्ष दिले. मानवी जीवनात औपपत्तिक विचाराचे किंवा सैद्धान्तिक तत्त्वचर्चेचे महत्त्व कमी आहे असे नाही. पण जोतीरावांनी जे कार्य अंगीकारले होते, त्यात त्यांना अशा ज्ञानसंपादनाची तितकी निकड नव्हती. म्हणून त्यांनी त्यात आपला वेळ व शक्ती खर्च केली नाही.

जोतीरावांच्या बाबतीत कोणते ग्रंथ त्यांच्या घडणीस काही अंशी कारणीभूत झाले आणि कोणत्या ग्रंथांचा त्यांनी आपल्या कार्यसिद्धीसाठी व मतप्रचारासाठी उपयोग करून घेतला ते ठरवणे कठीण नाही. याबद्दल त्यांनी स्वतःच स्पष्टपणे लिहून ठेवले आहे. मिशनच्या शाळेत शिकत असताना बायबलमधील नैतिक आशयाने त्यांचे मन भारून टाकले होते. कोणताही धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत नाही अशी खात्री पटल्यावर देखील त्यांनी बायबलचे पावित्र्य मान्य करून त्यातील बोधवचने उद्धृत केली आहेत. ख्रिस्ती धर्मोपदेशकांचे मराठी वाङ्मय त्यांनी आस्थापूर्वक वाचले असण्याची पुष्कळच शक्यता आहे. जॉन विल्सन हे विद्वत्ता, ग्रंथकर्तृत्व आणि कार्यकुशलता अशा तिन्ही दृष्टींनी तत्कालीन ख्रिस्ती धर्मोपदेशक मंडळीत अग्रगण्य होते. त्यांचे मराठी ग्रंथ तर जोतीरावांच्या अवलोकनात आले असतीलच. परंतु 'Indian Caste' आणि 'India Three Thousand Years Ago' या दोन

इंग्रजी पुस्तकांचे त्यांनी खचितच परिशीलन केले असेल. यांपैकी ‘ India Three Thousand Years Ago ’ या ग्रंथातील अवतरणेच त्यांनी ‘ शेतकऱ्याचा असूड ’ या आपल्या ग्रंथात दिलेली आहेत. पुढील काळात पेन यांच्या विचारांची त्यांच्या मनावर दृढ छाप पडली होती. त्यामुळे त्यांना राजकीय स्वातंत्र्य व लोकसत्ता यांचा वास्तविक अर्थ उमगला, धर्माकडे पाहण्याचा आधुनिक शास्त्रपूत दृष्टिकोण लाभला, आणि भिक्षुकशाहीविरुद्ध बंड करण्याची प्रेरणा मिळाली.

अठराव्या शतकाच्या अखेरीस येथे इंग्रज अधिकाऱ्यांच्या व अभ्यासकांच्या प्रयत्नाने प्राच्यविद्यासंशोधनास प्रारंभ झाला. पुढे इंग्लंड, फ्रान्स व जर्मनी या देशांत या कार्याला अधिक चालना मिळाली. या घटनेचे पडसाद महाराष्ट्रातील प्रबोधनाच्या चळवळीत उठावदारपणे उमटले आहेत. विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि जोतीराव फुले या दोन्ही समाजचिंतकांनी आपल्या परस्पर-विरोधी विचारसंप्रदायांच्या प्रचारासाठी ह्या प्राच्यविद्यापंडितांच्या वाङ्मयाचा आधार घेतला आहे.[३०] प्राचीन भारतीय विद्या, कला, साहित्य, व्याकरण, तत्त्वज्ञान, धर्मशास्त्र यांविषयी ह्या प्राच्यविद्याभ्यासकांनी धर्मनिरपेक्ष ऐहिक दृष्टीने औत्सुक्य दाखवले. अभिजात संस्कृत साहित्यातील सौंदर्यदृष्टीचा आणि भारतीय तत्त्वज्ञानातील सूक्ष्मतर व शिस्तबद्ध मीमांसेचा त्यांनी उदोउदो केला. हे पाहून चिपळूणकरांच्या लेखणीला वेगळेच स्फुरण चढले. ह्या पाश्चात्त्य विद्यावंतांचे अभिप्राय सादर करून आपल्या पूर्वजांकडून आपल्या हाती आलेला हा वारसा किती वैभवशाली आहे ते त्यांनी दाखवून दिले. “ जे वेदादी ग्रंथ आमच्या अटोकाट ज्ञानास्तव आम्हांस येथे मातीच्या मोलाचे झाले आहेत, तेच युरोपीय पंडितांस केवळ अमोल वाटून टेम्स, ऱ्हाइन, मिसीसीपी वगैरे नद्यांचे तीरी त्यांचा घोष चालू झाला आहे ! अशा समयी आमच्या देशात प्रस्तुत विषयाविषयी जे विलक्षण औदासीन्य आढळते, त्याचा मोठा चमत्कार वाटतो. पाणिन्यादी शास्त्रकारांचा, कालिदासादी कवींचा, वगैरे ज्यांस अतिशयित अभिमान वाटावा, व त्यांच्या बुद्धिमत्त्वाचे स्वरूप समजून घेण्याविषयी ज्यांस अतोनात हौस असावी, तेच लोक साऱ्या जगात त्यांविषयी केवळ बेफिकीर झाले आहेत; व आपल्या घरची माहिती परस्थ लोकांनी आपणांस सांगावी याची त्यांस बिलकुल लाज वाटत नाही; हे आमच्या देशाची खरी स्थिती ज्यास चांगली माहीत नाही त्यास क्षणभर तरी खरे वाटेल काय ? ”[३१] अशा शब्दांत महाराष्ट्रातील सुशिक्षितांना फटकारून विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी त्यांचा स्वाभिमान जागृत करण्याचा प्रयत्न केला; आणि महाराष्ट्रात आपल्या परंपरानिष्ठ सांस्कृतिक राष्ट्रवादाचा पाया घातला.

याच्या अगदी उलट जोतीरावांनी हिंदुसमाजव्यवस्थेतील अनिष्ट, अन्यायमूलक व उद्वेगजनक गोष्टींचा निषेध करताना आपल्या प्रतिपादनाला बळकटी आणण्या-





साठी याच प्राच्यविद्यासंशोधकांच्या मताचा हवाला दिला आहे. संस्कृत शिकण्याची पूर्वापार बंदी असल्याने आर्यांनी आपल्या मतलबी धर्मग्रंथांत काय लिहून ठेवले आहे याचा आम्हांला थांगपत्ता नव्हता. परंतु पाश्चात्त्य देशांतील सत्प्रवृत्त भाषापंडितांनी त्यांची भाषांतरे प्रसिद्ध केली. त्यामुळे त्यांचे खरे स्वरूप आम्हांला कळले; आणि आमच्या धार्मिक व सामाजिक गुलामगिरीचा उगम कुठे आहे त्याचा उलगडा झाला असे म्हणून जोतीरावांनी या थोर व्यासंगी लोकांविषयी कृतज्ञता व्यक्त केली आहे. या संदर्भात त्यांनी वुईल्यम जोन्स, एच. एच. विल्सन, ली ग्रँड जेकप, जॉन म्युईर, मॅक्समुलर यांचा आदरपूर्वक उल्लेख केला आहे. जोतीरावांच्या व्यासंगात या प्राच्यविद्यासंशोधकांच्या वाङ्मयाला महत्त्वाचे स्थान आहे यात शंका नाही.

जोतीरावांनी मनुप्रणीत धर्मशास्त्राची बारकाईने ओळख करून घेतली होती. रामायण, महाभारत, भागवत इत्यादी ग्रंथांतील कथाभागांची त्यांना तपशीलवार माहिती होती. जुने मराठी अध्यात्मपर वाङ्मयही त्यांच्या परिचयाचे होते. आपल्या लेखनात यांपैकी काही ग्रंथांतील उतारे त्यांनी दिलेले आहेत. हे सर्व ग्रंथ त्यांनी मुळातून अभ्यासिले होते किंवा नाही ते सांगता येत नाही. कदाचित त्यांचे इंग्रजी किंवा मराठी अनुवाद त्यांच्या अवलोकनात आले असतील. हरिविजय, पांडवप्रताप इत्यादी ग्रंथांतूनही त्यांना या कथा ठाऊक झाल्या असतील. अनेक शास्त्रीपंडित त्यांचे मित्र होते. आपल्याला हवी असलेली संस्कृत धर्मग्रंथांतील वचने त्यांच्या साह्याने शोधून काढणे त्यांना सहज शक्य होते. चार्वाक दर्शनातील दोन श्लोक त्यांनी उद्धृत केले आहेत. पण ते त्यांनी एच. एच. विल्सन यांच्या ग्रंथातून घेतले आहेत. वज्रसूचीचा मराठी अनुवाद व कबीरकृत 'विप्रमतीसी' हे बीजकातील प्रकरण त्यांच्या पाहण्यात आले होते. त्यांतील निरूपण आपल्या विचारसरणीला पुष्टी देणारे आहे म्हणून त्यांनी त्यांची आस्थेवाईकपणे दखल घेतली असेल. गौतम-बुद्धाच्या काळापासून अनेक अवैदिक धर्मपंथांनी आणि वैदिक भक्तिसंप्रदायांनी वर्णवर्चस्व आणि जातिसंस्थेतील जन्मसिद्ध उच्चनीचभाव यांविरुद्ध सतत आवाज उठवला आहे. मात्र विज्ञानपूर्व काळातील या तत्त्वचिंतकांची व साधुसंतांची विचार सरणी आणि विज्ञानयुगातील आधुनिक इहवादी दृष्टिकोण ज्यांनी आत्मसात केला होता, त्या महात्मा फुल्यांचा धर्मतत्त्वविचार यांच्यात मूलभूत फरक आहे. त्यांच्या-वर पेन यांच्या ग्रंथांचा पडलेला प्रभाव वादातीत आहे. आधुनिक विज्ञानाचा उदय युरोपात झाला. त्यातील सिद्धान्तांशी सुसंगत असे नवे विचारप्रवाह साहजिकच तेथे अस्तित्वात आले. राममोहन राय यांच्यापासून महात्मा गांधी यांच्यापर्यंत सर्वांनीच त्यांच्यातील सत्त्वांश साक्षेपी वृत्तीने ग्रहण केला आहे. मात्र त्यात अंधानुकरणाचा लवलेशही नव्हता. उलट त्याच्या डोळस व प्रगमनशील संस्कारक्षमतेचे ते द्योतक

होते. जोतीरावांनीही थॉमस पेन यांचे ऋण प्रांजलपणे मान्य केले आहे. पण पेन यांचे विचार येथे लागू करताना त्यांनी येथील सामाजिक वास्तवाचे सदैव भान राखले होते. शिवाय या आपल्या विचारांची मांडणी करताना आणि ते प्रत्यक्ष कृतीत उतरवताना जोतीरावांनी जी मर्मग्राही विवेचक दृष्टी, कल्पकता व नीतिधैर्य दाखवले त्यात त्यांचे खरे मोठेपण आहे.

प्राच्यविद्याविषयक वाङ्मयाच्या खालोखाल जोतीरावांनी इतिहास-ग्रंथांचे परिशीलन केले होते. ग्रांट डफ, मरे यांच्या ग्रंथांचा त्यांनी स्वतःच उल्लेख केला आहे. हेन्री मीड यांच्या 'Sepoy Revolt' या पुस्तकातील मतांचा त्यांनी आपल्या लेखनात वारंवार निर्देश केला आहे. पेशवाई आणि इंग्रजी राजवट या कालखंडावर त्यांच्या लेखनाची मुख्य भिस्त होती. त्यातही सामान्यतः महाराष्ट्रातील घडामोडीच त्यांनी विचारात घेतल्या आहेत.

संतवाङ्मयाशी जोतीरावांचा थोडाबहुत परिचय होता. ज्ञानेश्वर आणि रामदास यांच्या साहित्यातील उतारे त्यांनी दिले आहेत. त्यांची आदिसत्याची आरती वाचली की, रामा जनार्दनकृत ज्ञानेश्वरांची आरती त्यांच्या ऐकण्यात आली असावी असे वाटल्याखेरीज राहात नाही. त्यांच्या अखंडांतील अनेक वाक्प्रयोग तुकारामाच्या अभंगांची आठवण करून देतात. सत्यशोधक समाजाच्या तिसऱ्या वार्षिक इतिवृत्ताच्या प्रारंभी त्यांनी कबीरांचे एक वचन उद्धृत केले आहे. मतप्रचारासाठी आवश्यक असणारी चतुरस्रता जोतीरावांच्या ठिकाणी होती. पेशवाईच्या अखेरीस ब्राह्मण समाजाची सर्व बाजूंनी किती अधोगती झाली होती ते सविस्तर कथन करणाऱ्या लोकहितवादींच्या वाङ्मयाचा त्यांनी उल्लेख केला आहे. इतकेच नव्हे तर प्रमथनाथ बोस यांनी इ. स. १८७८ च्या सुमारास लिहिलेल्या 'A Short Essay on Aryan Civilization in India' या निबंधाचाही त्यांनी हवाला दिला आहे.[३२] बोस हे हिंदुस्थानच्या भूशास्त्रीय सर्वेक्षण विभागाचे शासकीय अधीक्षक होते. त्यांनी आपला हा निबंध प्राच्यविद्यापरिषदेला सादर केला होता; आणि त्याला इटलीच्या सरकारकडून पारितोषिक देण्यात आले होते. बंगालमधील नीळ पिकविणाऱ्या इंग्लिश लोकांकडून तेथील गरीब कष्टकरी जनतेवर किती जुलूम होत होता त्याचा जोतीरावांनी आपल्या 'गुलामगिरी' या ग्रंथात निर्देश केला आहे.[३३] हा ग्रंथ १८७३ साली प्रकाशित झाला. जोतीरावांचे मित्र बाळवेकर यांनी याच विषयावर इ. स. १८७२ मध्ये 'नीलदर्पण' या नावाने मूळ बंगाली नाटकाच्या इंग्रजी तर्जुम्याचे मराठी भाषांतर प्रसिद्ध केले होते. यावरून जोतीराव आणि त्यांचे सहकारी यांच्या व्यापक दृष्टीची कल्पना येते. जोतीराव बहुश्रुत होते. त्यांची दृष्टी सर्वस्पर्शी होती. तरी त्यांच्या अभ्यासविषयांत राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, इतिहासमीमांसा इत्यादी सामाजिक शास्त्रांचा

अंतर्भाव झाल्याचे दिसत नाही. धर्मचिकित्सेवरच त्यांनी आपल्या वाङ्मयात आपले सर्व लक्ष केंद्रित केले होते. त्यामुळे कदाचित या विषयांकडे ते वळले नसावेत. शिवाय त्या काळी उच्चवर्णीय ज्ञानोपासकांतही, काही अगदी थोडे अपवाद सोडले, तर सामाजिक शास्त्रांचे स्वतंत्रपणे अध्ययन करण्याची प्रवृत्ती निर्माण झाली नव्हती.

## वाङ्मयातील अंतःसूत्र

जोतीरावांच्या समाजचिंतनात द्रष्टेपण होते. त्यातून तयार झालेला त्यांचा सामाजिक दृष्टिकोण त्यांच्या वाङ्मयात आणि कार्यात सर्वत्र अनुस्यूत होता. त्यांचे लेखन, मग ते संभाषणात्मक असो, वर्णनात्मक असो किंवा विवेचनात्मक असो, पद्यरूप किंवा गद्यरूप असो, त्यामधून त्यांच्या सामाजिक दृष्टीचे हे अंतःसूत्र कुठेही निसटले नाही. त्यांच्या भूमिकेत अभिनिवेश व आक्रमकता असली तरी, एकारलेपण नव्हते. धार्मिक, शैक्षणिक, आर्थिक, राजकीय अशा अनेकविध प्रश्नांची त्यांनी चिकित्सा केली आहे. त्यांच्या मांडणीत कुठे सैलपणा जाणवेल, कुठे विसंगती दृष्टीस पडेल; पण त्यामुळे त्यांच्या एकंदर तत्त्वप्रणालीच्या एकात्मतेला बाध आला आहे असे आढळून येणार नाही. तेव्हा निरनिराळ्या क्षेत्रांतील त्यांच्या विचारांचा परामर्श घेण्यापूर्वी प्रथम त्यांच्या मतप्रतिपादनातील हे अंतःसूत्र कोणते ते शोधले पाहिजे.

एकोणिसाव्या शतकामधील महाराष्ट्रातील बहुतेक सर्व प्रबोधक व समाजसुधारक, आगरकरांचा अपवाद सोडल्यास, धर्मप्रवण होते. "खरी उन्नती व्हावयाची असेल तर प्रथम उन्नत धर्माचा प्रसार झाला पाहिजे"[३४] अशी डॉ. भांडारकरांची विचारसरणी होती. उपयुक्ततावादाच्या भावनाशून्य गणिती पद्धतीचा अवलंब न करता लोकांच्या अंतःकरणात विशुद्ध धर्मभावनेची ज्योत प्रज्वलित केल्याखेरीज समाजसुधारणेच्या चळवळीस खरे तेज चढणार नाही असे न्या. रानडे यांचे ठाम मत होते.[३५] महात्मा फुले हे देखील स्वभावतः धार्मिक प्रवृत्तीचे होते. परंतु त्यांची धर्मकल्पना सांप्रदायिक नव्हती पारंपरिक तर नव्हतीच नव्हती. त्यांच्या जीवनसरणीत श्रद्धा आणि प्रज्ञा यांचे कार्य परस्परपूरक होते. विश्वनियामक ईश्वरी शासनावर त्यांचा दृढ विश्वास होता. हे शासन न्यायनिष्ठ व दयाशील आहे अशी त्यांची धारणा होती. ज्याला ईश्वराची कृपा संपादन करायची असेल, त्याने आपल्या वैयक्तिक जीवनात तर न्यायनिष्ठा व दयाशीलता हे गुण आत्मसात केलेच पाहिजेत, पण त्याबरोबरच माणसामाणसांतील संबंध हे त्यांवर आधारले जावेत म्हणून रात्रंदिवस झटले पाहिजे. हाच वास्तविक मनुष्यमात्राचा धर्म होय. त्यालाच जोतीरावांनी सत्य-धर्म, नीतिधर्म असे म्हटले आहे. त्यात धर्मपीठाला, भिक्षुकशाहीला, शब्दप्रामाण्याला वाव नाही. या धर्मभावनेचा आशय हा मानवतावादाचा आहे. जोतीरावांनी स्वतःच

एके ठिकाणी 'सार्वजनिक मानवधर्म' असा शब्दप्रयोग केला आहे.[३५] दुसऱ्याच्या मनुष्यत्वाची पायमल्ली करून त्याला तुच्छ लेखणे, त्याचा छळ करणे, त्याला गुलाम करणे हे ईश्वरी शासनाशी द्रोह करण्यासारखे आहे, अशी त्यांची भावना होती. या दृष्टीने पाहिले तर त्यांच्या सामाजिक समतेच्या तत्त्वाचा उगम त्यांच्या ईश्वरनिष्ठेत आणि धर्मविचारात कसा आहे ते सहज कळून येईल.

जोतीरावांना बंधुभाव व एकोपा यांची अगत्यपूर्वक जोपासना करणारा समाज अभिप्रेत होता. पण प्रत्यक्ष वस्तुस्थितीचे निरीक्षण केल्यावर आपले सामाजिक जीवन दुभंगलेले आहे हे त्यांच्या ध्यानात आले. ब्राह्मणक्षत्रिय आणि शूद्रातिशूद्र यांची जगे एकमेकांहून अजिबात वेगळी आहेत. मग उच्चवर्णीय लोक जेव्हा समाजाचे हित, समाजाची प्रगती असे म्हणतात तेव्हा त्यांना नेमके काय म्हणावयाचे असते असा जोतीरावांना प्रश्न पडला. कारण समाजाच्या सर्व घटकांचे हिताहित एकसारखे नाही. ब्राह्मण व शूद्र, सावकार व शेतकरी, शासक व प्रजाजन यांचे हितसंबंध भिन्न आहेत, एवढेच नव्हे तर ते परस्परविरोधीही आहेत. हा हितविरोध अगदी प्राचीन काळापासून थेट आजतागायत अस्तित्वात आहे. आर्य ब्राह्मणांनी येथील मूळच्या लोकांना जिंकून आपले गुलाम बनवले. त्यानंतर ते स्वतः विशेषाधिकार बळकावून बसले; आणि जिंकल्या गेलेल्या शूद्रातिशूद्रांच्या वाट्याला काबाडकष्टाची कामे आली. आर्यांच्या धर्मसंस्थेने या व्यवस्थेला नैतिक अधिष्ठान मिळवून दिले; आणि शासन-संस्थेने धर्मरक्षणाची जबाबदारी पत्करली. त्यामुळे ही व्यवस्था शतकानुशतके टिकून राहिली; आणि ब्राह्मण आणि शूद्रातिशूद्र यांत दुरावा निर्माण झाला. तो त्यांच्या आचारविचारांत, चालीरीतीत, बोलीभाषेत आणि धर्मकृत्यांत प्रतिबिंबित झालेला आहे. बळीराजाविषयीच्या ब्राह्मण व क्षेत्रपती शूद्र यांच्या भावना व्यक्त करणारी जुनी परंपरागत रूढी पाहिली, तर हे सहज लक्षात येईल. येथील शूद्रसमाजातील स्त्रिया आपला पती व भाऊ हे विजयादशमीस शमीवृक्षाची पूजा करून घरी आल्या-वर त्यांना ओवाळतात; आणि 'इडा पिडा (द्विजांचा अधिकार) जावो आणि बळीचे राज्य येवो' अशा शुभेच्छादर्शक उक्तीने त्यांचे स्वागत करतात. उलट "विप्रांच्या कित्येक कुळांत दरवर्षी आश्विन मासी विजयादशमीस त्यांच्या स्त्रियांनी कणकीचा अथवा तांदुळाचा बळी दाराच्या उंबऱ्याबाहेर करून ठेविलेला असतो, त्याचे उरावर डावा पाय देऊन ते आपल्याच्या काडीने त्याचे पोट फोडितात; नंतर त्यास उल्लंघून घरात शिरतात अशी वहिवाट सापडते."[३६]

जोतीरावांनी आपल्या दुभंगलेल्या समाजातील कष्टकरी शोषित वर्गाची बाजू नेहमीच उचलून धरली आहे. त्यांच्या दृष्टीनेच आपल्या सामाजिक परंपरेचा त्यांनी अभ्यास केला होता. त्यावरून त्यांना कळून चुकले की, कोणत्याही समाजाचा धर्म,

कायदा, शासनयंत्रणा, मूल्यसरणी इत्यादी गोष्टी पाहिल्या, तर त्या बहुधा वरिष्ठ वर्गाला अनुकूल अशा असतात. त्यांत त्यांचा स्वार्थ आणि पक्षपातीपणा दडलेला असतो. हिंदू समाजाचा विचार केला, तर या मतलबी पक्षपातीपणाचे दुष्परिणाम आतापर्यंत शूद्रातिशूद्रांनाच सोसावे लागले आहेत. त्यांच्यात शिक्षणप्रसार झाल्याखेरीज त्यांना आपली धार्मिक व सामाजिक गुलामगिरी नष्ट करण्याची प्रेरणा मिळणार नाही. तसेच या गुलामगिरीतून स्वतःची सुटका करून घ्यावयाची, तर ब्राह्मणशाहीशी त्यांना संघर्ष हा करावाच लागेल. त्याशिवाय आर्यब्राह्मण आपल्या परंपरागत उच्च स्थानावरून खाली उतरून आपल्या शूद्र बांधवांना बरोबरीच्या नात्याने वागविण्यास कधीच तयार होणार नाहीत.[३८] या लक्ष्याच्या सिद्धतेसाठी केवळ शालेय शिक्षणावर विसंबून राहाण्यात अर्थ नाही. " जगामध्ये अति सुधारलेल्या अमेरिकन लोकांपैकी अर्ध्या लोकांनी आपल्या खासगत देशबांधवांबरोबर तीन वर्षे सतत जंग केल्याशिवाय आपल्या हातांतून दासांस सोडले नाही; तर असल्या गावठी भटपंतोजीच्याने शाळेमध्ये शूद्रादी अतिशूद्रांस खरे ज्ञान शिकवून त्यांस आपल्या दास्यत्वापासून मुक्त होऊ देण्याची बुद्धी कशी देववेल!"[३९] तेव्हा खऱ्या ज्ञानप्रसाराचे व विचारजागृतीचे हे काम आपणच हाती घेतले पाहिजे. निरनिराळ्या जातीजमातींत विखुरलेल्या कष्टकरी लोकांना एकत्र आणून त्यांच्यात ऐक्यभाव निर्माण केला पाहिजे. अस्पृश्य बांधवांना बहिष्कृत न मानता त्यांच्याशी बंधुभावाने वागण्यास प्रारंभ केला पाहिजे; आणि सर्वांनी मिळून दास्यमुक्तीसाठी सतत झगडत राहिले पाहिजे. जोतीरावांच्या तत्त्वप्रणालीचा हा गाभा आहे; आणि त्याचाच त्यांच्या वाङ्मयात विविध स्वरूपात आविष्कार झाला आहे.

## संदर्भ व टीपा


१ समग्र वाङ्मय, पृ. ३०७

२ समग्र वाङ्मय, पृ. १४०

३ पुरोगामी सत्यशोधक, ५–२

४ पुरोगामी सत्यशोधक, ५–२, पृ. १३

५ पुरोगामी सत्यशोधक, ५–२, पृ. ११, १७

६ पुरोगामी सत्यशोधक, ५–२, पृ. ३७–३८

७ सुभाषितरत्नभाण्डागार, पृ. ३०

८ समग्र वाङ्मय, पृ. १४०

९ समग्र वाङ्मय, पृ. ७

१० समग्र वाङ्मय, पृ. १५
११ समग्र वाङ्मय, पृ. ६९
१२ समग्र वाङ्मय, पृ. १९०
१३ समग्र वाङ्मय, पृ. २६४
१४ समग्र वाङ्मय, पृ. २०३
१५ समग्र वाङ्मय, पृ. १८९
१६ समग्र वाङ्मय, पृ. २८२
१७ समग्र वाङ्मय, पृ. २८६
१८ समग्र वाङ्मय, पृ. २८७
१९ समग्र वाङ्मय, पृ ३११
२० समग्र वाङ्मय, पृ. ३११–१२
२१ समग्र वाङ्मय, पृ. ३१२
२२ समग्र वाङ्मय, पृ. ३४९
२३ ज्ञानेश्वरी, १३–३६५
२४ जातिभेदविवेकसार, पृ. १३५–३६
२५ ज्ञानेश्वरी, २–१९०
२६ बीजक–विप्रमतीसी
२७ तुकाराम गाथा, ४३७८
२८ ( १ ) What I write is pure nature, and my pen and my soul have gone together."

( २ ) "I speak a language plain and intelligible. I deal not in hints and intimations. I have several reasons for this : first, that I may be clearly understood; secondly, that it may be seen I am in earnest; and thirdly, because it is an affront to truth to treat falsehood with complaisance."

The Life of Thomas Paine, p. 36, 229.

२९ दासबोध, ११–५–१
३० ( 1 ) "Wherever we direct our attention to Hindu literature, the notion of infinity presents itself; and sure the longest life would not suffice for a single perusal of works that rise and swell protuberant, like the Himalayas, above the

bulkiest compositions of every land beyond the confines of India ! "
—सर विल्यम जोन्स,
संस्कृतकविपंचक, उपोद्घात, पृ. ४.

( 2 ) " It is, indeed, a system of despotism and priestcraft, both limited by law, but artfully conspiring to give mutual support, though with mutual checks; it is filled with strange conceits in metaphysics and natural philosophy, with idle superstitions and with a scheme of theology most obscurely figurative and consequently liable to dangerous misconception; it abounds with minute and childish formalities with ceremonies generally absurd and often ridiculous. "
—सर विल्यम जोन्स,
फुले समग्र वाङ्मय, पृ. २५७.

३१ संस्कृत कविपंचक, उपोद्घात, पृ. २

३२ " आर्यांजींची नीति अति अमंगळ । कथीली गोपाळ । देशमुखें "
" तुम्ही आर्य कार्यसाधु । नव्हत शूद्रांचे हो बंधू ।
नाथ प्रमाथा बोसाची । साक्ष देतो निबंधाची ।
जेव्हां इंग्रजी वाचाल । तेव्हां शांतीस ती धराल "
—समग्र वाङ्मय, पृ. ४९६, ४७९

३३ समग्र वाङ्मय, पृ. ११५

३४ धर्मपर लेख व्याख्यानें, पृ. ३०८

३५ Miscellaneous Writings, p. 71

३६ समग्र वाङ्मय, पृ. २५५

३७ समग्र वाङ्मय, पृ. १०८

३८ " We know perfectly well that the Brahmin will not descend from his self-raised high pedestal and meet his Coonbee and low caste brethren on an equal footing without a struggle. "
–गुलामगिरी–इंग्रजी प्रस्तावना, समग्र वाङ्मय, पृ. ८०

३९ समग्र वाङ्मय, पृ. १४३

# ५



# सार्वजनिक सत्यधर्म

जोतीरावांच्या मनावर पूर्ववयातच ईश्वरनिष्ठेचे व धर्मशीलतेचे संस्कार झाले होते. इतकेच नव्हे तर त्यांची समग्र सामाजिक विचारप्रणाली ही त्यांच्या धर्ममीमांसेवर आधारलेली होती. येथील जुन्या परंपरेत धार्मिक व सामाजिक जीवनाच्या व्यवच्छेदक सीमारेषा कधी स्पष्ट झालेल्या नव्हत्या. त्यामुळे प्रत्येक सामाजिक प्रश्नाचा कुठे ना कुठे धर्माशी संबंध आल्याखेरीज राहात नसे. तेव्हा हिंदू समाजव्यवस्थेतील विषमतेचे व साचेबंदपणाचे विश्लेषण करताना म. फुले यांना साहजिकच वेदशास्त्रपुराणोक्त हिंदू धर्माचे परिशीलन करावे लागले. शिवाय त्यांचा स्वतःचा ईश्वराच्या अस्तित्वावर दृढ विश्वास होता. तो सर्वज्ञ व सर्वसमर्थ, परमन्यायी व दयाळू आहे अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे ईश्वराची कृपा संपादन करण्याचा मार्ग म्हणून धर्माला त्यांनी आपल्या जीवनसरणीत अग्रस्थान दिले होते. तेव्हा धर्मचिंतन हा अर्थातच त्यांचा जिव्हाळ्याचा विषय बनला. त्यांच्या वाङ्मयीन लेखनाचा आरंभच मुळी धर्मचिकित्सेतून झाला; आणि 'सार्वजनिक सत्यधर्म' हा त्यांचा शेवटचा ग्रंथ तर त्याच विषयाला वाहिलेला आहे.

जोतीरावांनी धर्मकृत्यांतील मिथ्याचार व आंधळी रूढिप्रियता यांवर कोरडे ओढले आहेत. पण त्याबरोबरच त्यांनी नास्तिकता व पाखंडीपणा यांचाही वारंवार निषेध केला आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' असे प्रतिपादन करून निर्मिकाची उचलबांगडी करणाऱ्या वेदान्तमताची त्यांनी नास्तिकमत म्हणून संभावना केली आहे. आपल्या लहानमोठ्या सर्व कृती या ईश्वरोपासनेचा भाग बनल्या पाहिजेत अशी त्यांना उत्कंठा होती. त्यांच्या अतिशूद्रांच्या शाळेची जेव्हा समारंभपूर्वक परीक्षा झाली, तेव्हा त्यांनी आपल्या प्रास्ताविक भाषणात "महार, मांग, चांभार

हे या देशात फार असून ते अगदी नीचावस्थेत आहेत हे पाहून ईश्वराच्या प्रेरणेने माझ्या मनात अशी इच्छा उत्पन्न झाली की, अस्पृश्यांस सुशिक्षित करण्याविषयी काही तरी उपाय योजावा."[1] असे आपले मनोगत बोलून दाखवले होते. आपल्या मार्गदर्शनाखाली होणाऱ्या जाहीर व खाजगी कार्यक्रमात प्रार्थनेचा समावेश करण्यास जोतीराव सहसा चुकत नसत. सत्यशोधक समाजाच्या सभासदांनी दर आदितवारी संध्याकाळी नियमितपणे जमून ईश्वरोपासना करण्याचा उपक्रमही त्यांनी सुरू केला होता. त्यांच्या वाङ्मयातही "आम्ही दयाळू सृष्टिचालक शक्तीची किंवा जगन्नियंत्याची अशी प्रार्थना करतो"[2] अशा धर्तीची वाक्ये अनेकदा येतात. त्यांच्या 'श्रद्धामय' अंतःकरणाची ती द्योतक आहेत. आपले कार्य हे समाजातील पददलितांच्या कल्याणासाठी आहे; ईश्वराच्या इच्छेला ते अनुसरून आहे. तेव्हा त्याला ईश्वरी कृपेचे खचितच पाठबळ मिळेल अशा श्रद्धेने जोतीराव जन्मभर कार्यरत होते.

"अंतर निर्मळ भार ईशावर। सत्य वर्तणार। जगामाजीं।।
धर्मजातीभेद निर्दाळी मनांत। सुखी मानवांत। धन्य तोच"[3]

अशी त्यांची मनोभूमिका होती; आणि तिचे मूळ त्यांच्या आस्तिक्य-बुद्धीत होते; त्यांच्या सर्जनशील धर्मश्रद्धेत होते.

## ईश्वर आणि मानव

जोतीराव हे कट्टर एकेश्वरवादी होते. बहुदेववादाची कल्पना ही अज्ञानमूलक व भ्रामक आहे याबद्दल त्यांना तिळमात्र शंका नव्हती. ईश्वर या चराचर सृष्टीचा निर्माता व नियंता आहे. मानवी स्त्रीपुरुष ही त्याची लेकरे आहेत; आणि त्यांचा तो पोशिंदा, न्यायदाता व उद्धारक आहे. त्याची न्यायनिष्ठा आणि दयार्द्रता ही परस्परपूरक आहेत. न्यायात मनुष्यमात्राच्या नैतिक जबाबदारीचे तत्त्व अंतर्भूत आहे. ईश्वराच्या क्षमाशीलतेमुळे स्खलनशील मानवाला आपली चूक सुधारण्याचा मार्ग मोकळा राहतो. विश्वव्यापाराच्या या अजस्र पसाऱ्याकडे क्षणभर निरखून पाहिले, तर त्यातील योजकता, सातत्य व सुयंत्रितपणा यांची जाणीव होऊन त्याचा कोणी तरी शिल्पकार व सूत्रचालक असला पाहिजे असे आपल्याला मनोमन वाटू लागते. इतकेच नव्हे तर त्या जगच्चालकाच्या प्रेरकतेची व नियामक शक्तीची आपल्याला पावलोपावली प्रचीती येते. मात्र ईश्वराच्या अस्तित्वाची ओळख पटणे आणि त्याच्या स्वरूपाचे, सामर्थ्याचे, शासनपद्धतीचे, न्यायतत्त्वाचे संपूर्ण आकलन होणे या गोष्टी अगदी भिन्न आहेत. जोतीराव आपल्या भोवतालच्या सृष्टीचा उल्लेख करताना तिच्या अनंतत्वाकडे आपले लक्ष वेधतात. ते अमर्याद विस्तीर्ण पोकळीचा

उल्लेख करतात, अनंत सूर्यमंडळाचा उल्लेख करतात. त्या मानाने मनुष्याची अवलोकनशक्ती आणि आकलनक्षमता किती मर्यादित आहे ते आपल्या ध्यानात आणून देतात. ईश्वराने "सर्व प्राणीमात्रांत मानव प्राणी श्रेष्ठ केले आहेत."[४] हे तर खरेच. परंतु ईश्वराच्या अतर्क्य शक्तीचा वेध घेण्याच्या बाबतीत त्याचे बुद्धि-सामर्थ्य अगदीच तोकडे आहे हे विसरता कामा नये.

"आपण सर्वांच्या निर्मिकाने निर्माण केलेल्या एकंदर सर्व विस्तीर्ण पोकळीतील अनंत सूर्यमंडळांसह त्यांच्या उपग्रहांवरील नाना प्रकारच्या अनंत खटाटोपीविषयी व्यवस्था कसकशा केल्या आहेत, त्या सर्वांविषयी ज्ञान करून घेणे हे आम्हा क्षण-भंगुर मानवांच्या बुद्धितरंगांच्या आटोक्यात तर येणेच नाही." "क्षुल्लक अशा अति-चिमुकल्या मुंगीच्या अवयवांचा, तिच्या इंद्रिय वगैरे उद्योगाचा आम्ही कधीच विचार करीत नाही, तथापि तिजला कोणी निरर्थक त्रास देऊ शकत नाही. व त्याच-प्रमाणे या अत्युत्तम मानव प्राण्यांच्या अवयवांचा, त्यांच्या दशेंद्रियांचा आणि त्यांच्या ज्ञानाच्या थोरवीविषयी विचार करू गेल्यास आम्हांस थांग लागत नाही."[५] अशा प्रकारे मनुष्याला परमेश्वराच्या सत्यस्वरूपाचे बौद्धिक आकलनही जिथे पूर्णपणे होऊ शकत नाही तिथे त्याने त्याचे प्रत्यक्ष दर्शन घेण्याची हाव बाळगणे हा शुद्ध वेडेपणाच म्हटला पाहिजे. संतमहंतांना ईश्वराचा साक्षात्कार झाल्याच्या कथा आपण नेहमी ऐकतो. त्या कशा निरर्थक व असंभवनीय आहेत हे लोकांनी समजून घ्यावे असे जोतीरावांना वाटत होते. "अनंत सूर्यमंडळांसह त्यांच्या ग्रहोपग्रहांसहित आपल्या पृथ्वीवरील प्राणीमात्रांसह पशू, पक्षी, वृक्ष इत्यादिकांस ज्याने निर्माण केले आहे, तो कर्ता कोठे व तो कसा आहे, हे पाहण्याची आपण यत्किंचित मानव-प्राण्यांनी इच्छा करू नये; कारण आपल्या पृथ्वीच्या अतिसन्निध ग्रहांवर काय काय आहे, हे पाहावयास जाण्याचीसुद्धा आपणास शक्ती नाही. आपल्या सर्वांच्या निर्मिकाने मजा पहाण्यासाठी आपण मानवांस दर्शन घेण्यास जर बोलाविले, तर आपल्या या पृथ्वीवर अनेक क्षणिक सार्वभौम राजे झाले, त्यांचे तेज तर काय, परंतु अनंत सूर्यांचे तेज एके ठिकाणी केल्याने, त्या आपल्या महापवित्र, दैदीप्यमान व तेजोमय निर्मिकाच्या तेजापुढे आपल्याच्याने उभे राहून त्याचे दर्शन घेववेल काय? आपण कितीही केले तरी सर्व कामांत अपुर्ते, पंगू, ज्ञानहीन व सर्व दुर्गुणांत निपुण असून आपला घटकेचा भरवसा नाही."[६] मनुष्याचे श्रेष्ठत्व त्याच्या बुद्धीत आहे. तिच्या साह्याने त्याने सृष्टीचे अधिकाधिक ज्ञान मिळवण्याचा व सृष्टिकर्त्याची इच्छा जाणून घेण्याचा प्रयत्न करावा. परंतु आपल्या बुद्धिशक्तीच्या मर्यादा ओळखून आणि माणूस कितीही मोठा ज्ञानी व सत्त्वसंपन्न झाला, तरी त्यात काही ना काही अपूर्णता ही राहणारच हे ध्यानात घेऊन परमेश्वराला अनन्यभावाने शरण

जावे असा जोतीरावांच्या एकंदर प्रतिपादनाचा रोख आहे.

## केला अवघाचि अधर्म

धर्मभावना ही मनुष्याच्या मनात खोलवर रुजलेली असते. त्यामुळे तिचे संस्कार सामान्यतः अत्यंत प्रबळ असतात. धर्माचा प्रभाव सार्वत्रिक असला, तरी त्याचा वास्तविक अर्थ फारच थोड्या लोकांच्या लक्षात आलेला असतो. पुष्कळदा व्यवसाय, कर्तव्य, विशिष्ट प्रवृत्ती आणि धर्म यांची गल्लत केली जाते. कितीतरी लोक परंपरागत रूढीलाच धर्म मानतात. या सर्वांपासून खरा धर्म हा कसा वेगळा आहे ते जोतीरावांनी अनेक उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे. मजुरी घेऊन लोकांचे कपडे धुणे हा परटाचा व्यवसाय आहे; धर्म नव्हे. मेंढरे पाळून त्यांस चारणे हा धनगरांचा, जोडे शिवणे हा चर्मकारांचा आणि रखवाली करणे हा रामोश्यांचा व्यवसाय आहे; धर्म नव्हे. कुटुंबपोषणासाठी केलेला उद्योगधंदा आणि धर्म ही एक नव्हत. प्रजेचे रक्षण करणे हे राजाचे कर्तव्यकर्म होय. आईबापांची आज्ञा पाळणे हे मुलामुलींचे कर्तव्य आहे. लौकिक कर्तव्य आणि धर्म या संकल्पना अगदी भिन्न आहेत. लोकांची घरे फोडणे ही दरोडेखोरांची दुष्ट प्रवृत्ती आहे. तिला धर्म म्हणण्यात काय अर्थ ? समाजाच्या वेगवेगळया थरांत व जातींत वेगवेगळया चालीरीती व रूढी प्रचलित आहेत. त्यांचा धर्माशी अर्थाअर्थी काही संबंध नाही. सृष्टी व मनुष्य यांचा संबंध, माणसामाणसांचा संबंध आणि ईश्वर व मनुष्य यांचा संबंध यांच्या स्वरूपात मूलतःच फरक आहे. त्यांपैकी ईश्वर आणि मानव यांच्या परस्परसंबंधाचे दिग्दर्शन आणि त्यानुसार मनुष्यमात्राच्या जीवितसाफल्याचा विचार हेच खऱ्या पवित्र धर्माचे सर्वश्रेष्ठ कार्य होय.

जोतीरावांनी ईश्वराला 'निर्मीक' असे म्हटले आहे, आणि तोच शब्द ते वारंवार वापरतात. या अफाट विश्वाचा निर्माणकर्ता व शास्ता एकच एक आहे. अशी जगातील अनेक प्रगत धर्मपंथांची धारणा आहे. त्या दृष्टीने पाहता खरा ईश्वरप्रणीत धर्म एकच असला पाहिजे असे म्हणावे लागते. "मानवांचे साठीं बहु धर्म कसे। झालां कां हो पिसे। जोती म्हणे", "मानवांचे धर्म नसावे अनेक। निर्मीक तो एक। जोती म्हणे"[७] अशा शब्दांत जोतीरावांनी 'एकच ईश्वर आणि एकच धर्म' या तत्त्वाचा कंठरवाने पुरस्कार केला आहे. आता सगळीकडे एकेश्वरवादाचा उद्‌घोष चालू असताही प्रत्यक्ष व्यवहारात अनेक धर्म आणि त्यांचे अनेक पंथोपपंथ दृष्टीस पडतात. ही सर्व सार्वजनिक सत्यधर्माची लेकरे आहेत. त्यांपैकी काही त्या आदि-सत्याशी बरीचशी जवळीक राखून आहेत, आणि काही त्यापासून खूप दूर गेले आहेत असे जोतीरावांचे मत होते.

प्राचीन काळी जेव्हा मनुष्याला सृष्टिव्यापारातील कार्यकारणभावाचे सम्यक ज्ञान नव्हते, तेव्हा वेगवेगळ्या व्यापारांच्या व घटनांच्या मुळाशी कोणत्या ना कोणत्या दैवी शक्तीचा हात आहे अशी त्याची भावना झाली. ह्या अतिमानुष दैवी शक्तींचा रोष होऊ नये; त्यांची आपल्यावर सदैव कृपादृष्टी राहावी या उद्देशाने पदार्थपूजा, वृक्षपूजा इत्यादी पूजाविधी अस्तित्वात आले. कालांतराने मनुष्याला सृष्टिव्यापारात अंतर्भूत असणाऱ्या नियमांचा शोध लागला. तरी देखील जुन्या अज्ञानावस्थेतील ह्या पूजाप्रकारांचे अवशेष अजूनही आपल्या धर्मजीवनात चिवटपणे तग धरून राहिले आहेत. त्यांचे अस्तित्व हे पुरोहित-पुजारी गुरव यांच्या फायद्याचे असल्याने त्यांनी त्यांना धक्का लागू न देण्याची खबरदारी घेतली. " कल्पनेचे देव कोरीले उदंड । रचीले पाखांड । हितासाठीं "[८] असे म्हणून जोतीरावांनी या पूजाप्रकारांचा निःशंकपणे निषेध केला आहे. महाराष्ट्रातील भक्तिपंथांनी आपल्या उपासना-पद्धतीत मूर्तिपूजेला यथोचित स्थान दिले होते. परंतु दगडांच्या किंवा धातूंच्या मूर्ती करून त्यांची पूजा करणे हा ईश्वरोपासनेचा मार्ग साफ चुकीचा आहे असे जोतीरावांचे मत होते. " धातू दगडाच्या मूर्तीस भजून। घंटा वाजवून। स्वतः खाई "[९] या त्यांच्या उक्तीत त्यांचे हे मत व्यक्त झालेले आहे. आपल्या लेखनामधून त्यांनी मूर्तिपूजकांचा वारंवार मनसोक्त समाचार घेतला आहे. महाराष्ट्रातील मान्यवर सुधारक मूर्तिपूजेला जाहीरपणे विरोध करतात; आणि घरी जाऊन खुशाल पूजाअर्चा करीत बसतात. त्यांच्या या दुटप्पीपणाबद्दल जोतीरावांनी त्यांचा उघडपणे धिक्कार केला आहे. परमेश्वराची त्याच्या शुद्ध स्वरूपातच आपण आराधना केली पाहिजे त्याची निरनिराळी रूपे कल्पून त्याचे भजनपूजन करण्यात काही हशील नाही अशी त्यांची विचारसरणी होती. त्यामुळेच हिंदू धर्मातील ' धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे "[१०] ही अवतार-कल्पना त्यांनी त्याज्य मानली आहे. ईश्वराला आपल्या इच्छापूर्तीसाठी देह धारण करावा लागतो. ही समजूत त्याच्या सर्वशक्तिमत्त्वाला उणेपणा आणणारी आहे. शिवाय " नाशीवंत देह घाणीचें आगर । देवा दीलें घर । कैसें शोभे "[११] या दृष्टीने त्या अमूर्त पवित्रतम आदिशक्तीचा ह्या अमंगल पंचमहाभूतात्मक जड देहाशी संबंध जोडणे योग्य होणार नाही. वामन, परशुराम, रामकृष्ण यांच्यासंबंधी लिहिताना जोतीरावांनी त्यांचे मनुष्यत्व गृहीत धरूनच त्यांच्या गुणदोषांची चिकित्सा केली आहे जोतिबा, खंडोबा, म्हसोबा, भैरोबा ही सर्व महाराष्ट्रातील प्रसिद्ध दैवते आहेत. पण मुळात हे सर्वजण बळीच्या राजवटीतील शूर व कर्तबगार अधिकारी होते असे त्यांचे म्हणणे आहे.

धर्माची मीमांसा करताना जोतीरावांनी धर्मक्षेत्रातील प्रत्यक्ष वस्तुस्थितीकडे कधी

दुर्लक्ष केले नाही. त्यामुळे त्यांना आपल्या धर्मजीवनातील उणिवा व अपप्रवृत्ती लोकांच्या निदर्शनास आणून देण्याची निकड तीव्रतेने जाणवली.

सर्वसामान्य लोकांच्या धर्मपालनात बाह्यांगाचे प्रस्थ प्रमाणाबाहेर वाढले आहे असे त्यांना दिसत होते. धर्मशीलता आणि रूढिवाद, सदाचार आणि कर्मठपणा, भक्तीचा जिव्हाळा आणि भक्तिजडत्व यांतील फरक लुप्त झाला होता. तुमचे अंतःकरण किती शुद्ध आहे? तुमच्या श्रद्धेला विवेकपरतेचे खंबीर अधिष्ठान आहे का? ईश्वराला शरण जाण्याची आणि त्यापायी आपले सर्वस्व वेचण्याची तुमची कितपत तयारी आहे? या प्रश्नांना ईश्वरोपासनेत खरे महत्त्व आहे. त्या मानाने बाह्य उपचार हे अगदी गौण आहेत. कित्येकदा तर ते अनावश्यकही असतात. हे सर्व लोकांच्या मनावर ठसवण्यासाठी जोतीरावांनी पूजा, नामस्मरण, नैवेद्य, अन्नदान, अनुष्ठान, पापपुण्य इत्यादी विषयांचा आधुनिक दृष्टीने ऊहापोह केला आहे. पूजाविधीतील उपचार केवळ प्रतीकात्मक आहेत. परमेश्वर हा सर्वार्थाने परिपूर्ण आहे. त्याला कशाचीच गरज नाही. म्हणून पूजाअर्चेतील उपयुक्त वस्तूंचा अपव्यय कटाक्षाने टाळला पाहिजे. याच भावनेने जोतीरावांनी "एकंदर सर्व पोकळीतील अनंत सूर्यमंडळांसह त्यांच्या ग्रहोपग्रहांसहित पृथ्वीवरील सर्व प्रकारचे पदार्थ मानवाच्या निर्वाहाकरिता जर निर्माणकर्त्याने आपल्या स्वेच्छेने उत्पन्न केले आहेत, तर त्यांपैकी आम्ही कोणत्या पदार्थांचा उलटा नैवेद्य त्यास अर्पण करावा?"[१२] असा प्रश्न उपस्थित केला आहे.

मनुष्य हा जोतीरावांच्या धर्मविचाराचा केंद्रबिंदू आहे. सृष्टीतील घडामोडींचा व मानवी जीवनातील वृत्तिप्रवृत्तींचा विचार करताना त्यांपासून मनुष्यजातीचे सुख व विकास किती प्रमाणात साधतो या प्रश्नाला ते प्राधान्य देतात. इथे सुख म्हणजे निरामय व चिरंतन सुख आणि विकास म्हणजे मानवी संबंधातील नैतिकतेचा उत्कर्ष हे अर्थ त्यांना अभिप्रेत होते. कारण मानवाच्या नीतिनिष्ठ धर्मसाधनेच्या द्वारेच ईश्वरी शासनाचे अंतिम उद्दिष्ट सिद्धीस जाणार आहे अशी त्यांची श्रद्धा होती. म्हणून धर्माचरण हे या ईश्वरी योजनेशी सुसंगत असले पाहिजे; मानवाच्या नैतिक उन्नतीला प्रेरक व पोषक असले पाहिजे. तेव्हा आपल्यापाशी असलेले द्रव्य, काळ व शक्ती यांचा विनियोग मनुष्यजातीच्या कल्याणासाठी, विशेषतः दीन-दुबळ्यांचे अज्ञान व अगतिकता दूर करण्यासाठी न करता धर्माच्या नावाखाली त्यांचा अपव्यय करणे हे ईश्वरी योजनेला हरताळ फासण्यासारखे आहे. अर्थातच बाह्य उपचारांना प्राधान्य देणारी दैवतोपासना हा धर्म नसून अधर्म आहे असे जोतीरावांनी निक्षून सांगितले आहे. परंपरागत धर्मजीवनातील कर्मठपणाला शह देण्यासाठी महाराष्ट्रातील साधुसंतांनी नामसंकीर्तनाचा पुरस्कार केला. हे भक्तिसाधन

सोपे व सुटसुटीत आहे. त्याला काळवेळ पाहावी लागत नाही; त्यात अधिकार-भेदाला थारा नाही; त्यासाठी बाह्योपचारांची गरज पडत नाही, असा त्यांचा दावा होता. त्यामुळे नामस्मरणाचे हे साधन लोकप्रिय ठरले. त्याचा झपाट्याने प्रसार झाला. परंतु पुढे त्याचेही एक कर्मकांड बनले. तासन्‌तास नामसंकीर्तनात वाया जाऊ लागले. जिकडेतिकडे नामसप्ताह साजरे होऊ लागले. त्यातून भावशुद्धीकडे दुर्लक्ष होऊन भावविवशतेचा वडेजाव वाढला; पलायनवादाची प्रवृत्ती वळावत गेली. जोतीरावांनी नामस्मरणाच्या या अतिरेकी उपासना पद्धतीबद्दल अगदी परखड-पणे आपली नाराजी व्यक्त केली आहे; आणि निर्मिकाच्या नावाचे कृतज्ञतापूर्वक स्मरण कशा रीतीने करावे तेही स्पष्ट केले आहे. "निर्मीकाचे नावाचे सदा सर्वकाळ भय बाळगून त्याच्या नावाची आठवण मनी दृढ धरून, त्याने निर्माण केलेल्या एकंदर सर्व मानवांबरोबर छक्केपंजे न करता सरळ सात्त्विक आचरण केल्याने निर्मीकाच्या पवित्र नावास सन्मान दिल्यासारखे होईल. परंतु केवळ निर्मीकाच्या नावाचा सतत व्यर्थ नामघोष करून त्याचे मस्तक फिरविल्याने त्यास निःसंशय संतोष होणार नाही."[१३]

आपल्या या पृथ्वीवरील सर्व प्रदेश, जलप्रवाह, वृक्ष, प्राणी आणि माणसे ईश्वरा-नेच निर्माण केली आहेत. त्यांपैकी काही शुभ आणि काही अशुभ, काही पवित्र आणि काही अपवित्र असा भेदभाव हा त्या निर्मिकाच्या समदृष्टीशी विसंगत आहे. माणसाचे मन भल्याबुऱ्या प्रवृत्तींच्या अनेकविध द्वंद्वांनी भरलेले असते. अंतःसृष्टी-तील हा द्वंद्वभाव बाह्य सृष्टीवर आरोपित करण्याची त्याची स्वाभाविक प्रवृत्ती असते. जगातील सर्व समाजांत ही प्रवृत्ती दिसून येते. त्या त्या समाजातील प्रस्थापितांचे प्रतिनिधी, विशेषतः धार्मिक क्षेत्रातील मध्यस्थ या प्रवृत्तीला खतपाणी घालतात; शक्य तितका तिचा फायदा उठवतात.

"प्राणीमात्रा सोई सुख करण्यास । निर्मी पर्जन्यास नद्यांसह ॥
त्याचें सर्व पाणी वेगाने वाहती । आर्यें कुरापती । तीर्थें केलीं ॥
आर्यांनीं कल्पीलीं थोतांडें हीं सारीं । दगे सर्वोपरी । जोती म्हणे ॥"[१४]

जोतीरावांच्या या प्रतिपादनात अर्धसत्य आहे. वेगवेगळ्या समाजांतील भटभिक्षुकांनी हेतुपुरःसर या प्रवृत्ती निर्माण केल्या असे म्हणता येणार नाही. मात्र मनुष्य-स्वभावाला अनुसरून उद्‌भवलेल्या या प्रवृत्तींचा आपल्या स्वार्थासाठी त्यांनी भरपूर उपयोग करून घेतला आहे यात शंका नाही. अन्नदान, देवधर्म इत्यादी बाबतींत त्यांचे मूळ प्रयोजन काय ? त्याचे सामाजिक जीवनावर कोणकोणते परिणाम घडून येतात ? याचा विचार बहुधा कुणी करीत नाही. जुन्या काळचे ब्राह्मण राज्यकर्ते आणि सावकार यांनी "सर्व जातींच्या आंधळ्या पांगळ्या रांडामुंडांची व त्यांच्या

पोरक्या अज्ञानी अर्भकांची काडीमात्र परवा न करिता, फक्त आपल्या जातीच्या धष्टपुष्ट आळशी भटांस दररोज नाना तऱ्हेचीं मिष्टान्न भोजनें घालण्याची वहिवाट घातली."[15] अशा भेदमूलक व औचित्यविवेक न करणाऱ्या प्रथेत कुठला धर्म? आणि कसली ईश्वरभक्ती? ब्राह्मण हे हिंदू समाजातील विद्यावंत व धर्मतत्त्ववेत्ते. त्या समाजातील धनिकांची वृत्ती किती संकुचित व अदूरदर्शीपणाची असावी! "आपल्या अज्ञानी शूद्रादी अतिशूद्रांच्या मुलांस सुशिक्षण देण्याकरिता शाळा बांधण्याच्या कामी खर्च न करिता, वाई, बनारस, प्रयाग, नाशिक वगैरे ठिकाणी रामकृष्णांची देवालये बांधण्यात अतोनात खर्च करितात. याला कोणीतरी नीती म्हणेल काय?"[16] गोरगरिबांची पिळवणूक करून धनसंचय करणारे जैन-मारवाडी सावकार ही देवळे बांधण्याच्या कामात अग्रेसर असतात.

"जतिमारवाडी गरीबा नाडिती। देऊळें बांधीती। कीर्तीसाठीं।
देवाजीच्या नांवें जगाला पीडीती। अधोगती जाती। निश्चयानें॥"[17]

द्रव्यलोभाने व सहानुभूतिशून्यतेने ग्रासलेल्या अशा दातृत्वाला धर्मकृत्य म्हणणे कितपत योग्य होईल असा जोतीरावांचा रोकडा सवाल होता. या संदर्भात कुणालाही "धर्माअगींच अधर्म"[18] या तुकारामाच्या प्रसिद्ध उक्तीची आठवण झाल्या-खेरीज राहणार नाही.

## ईश्वराला मध्यस्थी नको

"सर्वसाक्ष जगत्पती। त्याला नको मध्यस्ती॥"[19]

हे जोतीरावांच्या धर्मविचारातील एक प्रमुख सूत्रवचन आहे. ईश्वर हा समदृष्टी आहे; आणि सर्व माणसे ही त्याची लेकरे आहेत. त्याच्या अपत्यवात्सल्यात भेद-बुद्धीला वाव नाही असे मानल्यावर ईश्वर आणि मनुष्य यांच्या देवभक्तसंबंधात कुणा मध्यस्थाची आवश्यकता राहात नाही. परंतु सर्वसामान्य मनुष्याला आपल्या यःकश्चितपणाची व दुर्बलतेची जाणीव तीव्रतेने होत असते. तेव्हा कोणातरी श्रेष्ठ अधिकारी व्यक्तीच्या अनुग्रहाखेरीज आपल्याला ईश्वराची कृपा संपादन करता येणार नाही असा न्यूनगंड त्याच्या ठिकाणी निर्माण होतो. जगातील बहुतेक धर्मांत ईश्वरी कृपेच्या संदर्भात वेगवेगळ्या पातळीवरची मध्यस्थांची अधिकारश्रेणी अस्तित्वात आलेली आहे. हिंदुधर्मपरंपरेतील ब्रह्मनिष्ठ श्रोत्रिय, विविध धर्मपीठांचे आचार्य, पुरोहित, गुरू, देवऋषी हे सर्व आपल्या ओळखीचे आहेत. ब्राह्मण हे चारी वर्णांचे गुरू, साक्षात भूदेव. त्यांच्या उपस्थितीशिवाय कोणतेही धर्मकृत्य पार पडू शकत नाही. त्यांच्या वर्णश्रेष्ठत्वाची गरीब व अडाणी शेतकऱ्यांच्या मनावर इतकी जबरदस्त छाप पडलेली आहे की, त्यांना संतुष्ट केल्याखेरीज कोणत्याही धार्मिक

कार्याचे पुण्य आपल्या पदरात पडणार नाही अशी त्यांची पक्की खात्री असते. त्यामुळेच हे तथाकथित भूदेव त्या काळात खेड्यापाड्यांतील धर्मभोळ्या लोकांना आपले चरणतीर्थ पाजण्यास निःशंकपणे धजत असत. हे उद्वेगजनक दृश्य न बघवल्याने जोतीरावांनी चिडून "धुवून आपले अंगुष्ट। शूद्रा पाजीती हे दुष्ट"[२०] अशा प्रकारे आपल्या मनातील राग व्यक्त केला आहे.

"हिंदु धर्माचे ब्राह्मण वकील। लुटीले सकळ। जन त्यानें।
धर्मामिशें लोक नाडीले वकीलें। स्वार्थ साधले। आपुले ते॥
न लगे वकील देवदरबारीं। भक्ती एक खरी। जोती म्हणे॥"[२१]

धर्माच्या पवित्र प्रांतातील भिक्षुकांचा हा पोटभरूपणा लक्षात घेऊनच बहुधा जोतीरावांनी त्यांना धंदेवाईक वकिलांच्या पंक्तीस बसवले असेल.

मध्ययुगातील भक्तिपंथांनी धर्मजीवनातील कर्मकांडाचा प्रभाव कमी करून शूद्रातिशूद्रांना भक्तिमार्गाची शिकवण दिली. त्यामुळे पुरोहितवर्ग जरा मागे पडून गुरुपदाचा महिमा वाढला. धर्मकृत्यातील ब्राह्मणांच्या मक्तेदारीला अंशतः आळा बसला. कारण गुरू कोणत्याही जातीचा असला तरी चालतो. मात्र भक्तिपंथातही गुरूच्या रूपाने मध्यस्थाचे स्थान कायम राहिले आहे. जोतीरावांना कोणत्याच प्रकारची मध्यस्थी मान्य नव्हती. उलट गुरुकृपेशिवाय परमार्थसिद्धी नाही; गुरुदेव हे साक्षात परब्रह्म आहेत अशी सर्व पंथांतील भक्तभाविकांची अढळ श्रद्धा होती. त्यामुळे समाजाच्या वेगवेगळ्या थरांत साक्षात्कारी संतमहंत, स्वामी, महाराज, सद्गुरू यांचे पेव फुटले होते. जोतीरावांनी उपासना-पंथातील या गुरुबाजीवर निर्भीडपणे प्रहार केले आहेत. "सर्वांचा जो कर्ता कोणास दिसेना" अशी त्यांची पक्की खात्री होती. "वेड्यापरी सर्व गुरु बरळती। दावीन म्हणती। निर्मीकास"[२२] अशा प्रकारे स्वतःला ईश्वरदर्शन झाल्याचा, आणि भक्तजनांना ते घडवून आणण्याच्या क्षमतेचा जे दावा करतात, ते लबाड, ढोंगी व खोटे बोलणारे आहेत. त्यांच्या नादी लागून आपला अधःपात करून घेऊ नका, असे जोतीरावांनी सर्वांना स्पष्टपणे बजावले आहे. त्याबरोबरच निर्मीकाशी आमची गाठ घालून द्या म्हणजे त्याचा खरेपणा आम्हाला तपासून पाहता येईल; त्या तोतया ईश्वराला काही प्रश्न विचारता येतील असे उपहासात्मक भाषेत त्यांनी या वेषधारी गुरूंना सांगितले आहे. ईश्वर प्रत्यक्ष दृष्टिगोचर होणे हे त्यांच्या मते किती हास्यास्पद आहे ते त्यांच्या खालील पद्यरचनेवरून ध्यानात येईल.

"गुरुजींनीं आम्हां निर्मीक दावीतां। त्यास खरी वार्ता। पुसूं आम्ही॥
तूंच का येशू खरा बाप होशी। पुत्रा मोकलीशी। दुष्टा हातीं॥

कुराण हदीस यवनास देशी । व्यर्थ लढवीशी । सुन्नी शिया ।।
तूंच रामचंद्र झाला अयोध्येस । वधी रावणास । पत्नीसाठीं ।।
कृष्ण होऊनीयां मामास मारीलें । कोळ्यानें वधीलें । तोच तूं का ।।
सत्य आचरण निर्भीक आधार । सुखाचें माहेर । जोती म्हणे "[२३]

तत्त्वविचाराच्या बाबतीत जोतीरावांची बैठक अगदी पक्की होती. कोणत्याही विषयाच्या त्यांच्या प्रतिपादनात पक्षपातीपणाचा लवलेशही नव्हता. ब्राह्मण पुरोहितां-प्रमाणेच बहुजनसमाजातील देवऋषीलाही त्यांनी आपल्या शरसंधानातून वगळलेले नाही. "आर्यब्राह्मणांनी आपले मतलब साधण्याकरिता समूळ ज्ञानहीन करून ठेविल्यामुळे त्यांच्यात सारासार विचार करण्याची ताकद नसल्यामुळे, ते भुताखेतांवर भरंवसा ठेवून मन मानेल त्या वीरांची वारी अंगात घुमवून, पोरासोरांसह आपल्या अंगावरील सावणी ( उतारे ) टाकून आपले द्रव्य खराबा करितात. त्यांचा औषध-उपचारांवर भरंवसा नसल्यामुळे ते लुच्चड देवऋषींचे नादी लागून आपल्या जिवास मुकतात."[२४]

## धार्मिकता आणि इहवाद

जोतीराव हे धर्मनिष्ठ असले, तरी त्यांना अभिप्रेत असलेला धर्म हा विश्वधर्म होता. त्यात सांप्रदायिकतेला जरासुद्धा जागा नव्हती शिवाय त्यांच्या धर्मभावनेवर आधुनिक विज्ञानयुगातील नव्या प्रवृत्तींचे थोडेबहुत संस्कार झाले होते. त्यामुळे तिचा जातिधर्मनिरपेक्ष इहवादाशी मेळ घालणे त्यांना जड गेले नाही. त्यांचा परलोकाच्या अस्तित्वावर विश्वास होता असे दिसत नाही. 'स्वर्ग' ही कल्पना मनुष्य समाजाच्या एका विशिष्ट अवस्थेत उदयास आलेली आहे. "अतिप्राचीन काळी म्हणजे ज्या वेळेस जिकडे तिकडे सुधारणूक हा पदार्थ काय आहे, हे ज्यांना माहीत नव्हते, अशा लोकांनी स्वर्ग हा कोणी एक पशुपक्ष्यादिकांस भेडावण्याकरिता माळयाच्या जितरापातील हडकाला शेंदूर लावून थेट बाहुल्यासारखा बागुलबुवा अथवा बुजगावणे करून ठेवला होता."[२५] असे त्यांचे मत होते. म्हणून ते

"स्वर्गाचो शांतता कल्पून मनांत । लिहिली ग्रंथांत । तर्कबळें ।।
कोठें आहे स्वर्ग पाहिले ते कोणी । भिऊं नका मनीं । दावा आम्हा "[२६]

असा रोखठोक प्रश्न विचारतात. मात्र मनुष्याच्या नैतिक जबाबदारीचे तत्त्व त्यांना पूर्णपणे मान्य असल्याने त्यांनी सत्य-असत्य, नीति-अनीती, पाप-पुण्य ही द्वंद्वे नाकारलेली नाहीत इतकेच काय पण पाप पुण्याचे विवेचन करताना 'परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम्' हे हिंदू धर्मग्रंथातील वचन उद्धृत करून त्यांनी त्याच्या खरेपणाची ग्वाही दिली आहे. पाप-पुण्याचा निर्णय करता यावा म्हणून ईश्वराने

मनुष्याला सदसद्विचार करण्याची शक्ती दिलेली आहे. परंतु विकाराधीन होऊन या ईश्वरदत्त निर्णयशक्तीचा अव्हेर केल्यामुळेच माणूस पापाचरणास प्रवृत्त होतो असे जोतीरावांचे निदान आहे. त्यांची पुण्याची व्याख्याही काहीशी निषेधपरच आहे. "स्वतःस मात्र सुख होण्याकरिता एकंदर सर्व मानवी प्राण्यांस कायिक व मानसिक पीडा दिली नाही, म्हणजे त्यासच पुण्य म्हणावे"[२७] असे ते सांगतात. हिंदू धर्माच्या तत्त्वप्रणालीतील कर्मविपाकाचा सिद्धान्त जोतीरावांनी कधीच ग्राह्य मानला नव्हता. तरीदेखील मनुष्य जे जे काही करतो त्याचे परिणाम कोणत्या ना कोणत्या स्वरूपात त्याला भोगावेच लागतात याविषयी त्यांच्या मनात तिळमात्र संदेह नव्हता. एकंदर सर्व जगातील मानवप्राण्यांस आपल्या पापपुण्याचा झाडा द्यावा लागत नाही काय? या प्रश्नाला त्यांनी जे उत्तर दिले आहे त्यात त्यांचा कर्मफलविषयक दृष्टिकोण ग्रथित झालेला आहे. "एकंदर सर्व जगातील मानवप्राणी आपल्या पापपुण्यानुरूप इहलोकीच प्रत्यक्ष झाडा देऊन आपल्या पुढील वाढणाऱ्या सर्व संततीरूप वृक्षांस पाणी घालितात किंवा मारून टाकितात. अशा प्रकारे त्यांच्यावर किंवा त्यांच्या संततीवर त्या पापाचा किंवा पुण्याचा परिणाम होतो. ह्यावरून ईश्वराने परलोक हा प्रत्यक्ष इहलोकीच निर्माण केला आहे. कितीएक व्यसनी पुरुष मदोन्मत्त होऊन रजस्वला असलेल्या स्त्रियांबरोबर आपल्या मनःकामना तृप्त करितात, यामुळेच त्या उभयता स्त्रीपुरुषांस महाव्याधी उद्भवतात. इतकेच नव्हे! परंतु त्यांच्या संततीतसुद्धा तोच महारोग काही काळापर्यंत वास केल्याशिवाय रहात नाही."[२८]

मनुष्याला त्याच्या सत्कर्माचे फळ मिळाले नाही, किंवा दुष्कर्माबद्दल शासन झाले नाही, तर त्याच्या नैतिक जबाबदारीच्या तत्त्वाला काही अर्थ उरत नाही. शिवाय त्यामुळे एकतर ईश्वराच्या न्यायीपणाला तरी बाध येतो किंवा त्याचे सर्वशक्तिमत्त्व तरी शंकास्पद ठरते. जोतीरावांचा ईश्वराच्या न्यायनिष्ठतेवर अढळ विश्वास होता. म्हणून कर्मफळाचा सिद्धान्त स्वीकारून त्यानी त्याची अगदी वेगळ्या पद्धतीने मांडणी केली. त्यानुसार त्यांनी "एकंदर सर्व सृष्टिक्रमावरून असे सिद्ध होते की, आर्यांच्या ऋषीवर्य पूर्वजांनी केलेल्या नीच कर्मांची फळे जरी त्यांस भोगावी लागली नाहीत, तरी त्यांच्या दुष्ट कर्मांच्या अनुमानाप्रमाणे त्यांच्या संतानांस तरी ती निःसंशय भोगावी लागतील."[२९] अशी भविष्यवाणी वर्तवली आहे.

मनुष्याच्या मरणोत्तर स्थितीविषयी जोतीरावांनी काही खास वेगळे विवेचन केलेले नाही. त्यांचा पुनर्जन्मावर विश्वास नव्हता. पण त्याबरोबरच "कुडीतून प्राण निघून गेला म्हणजे सर्व बाजार आटपला"[३०] असे आगरकरांच्या प्रमाणे ते मानत होते असे दिसत नाही. त्यांच्या शेवटच्या आजारात त्यांचे मित्र बाबा पदमनजी हे त्यांना भेटावयास गेले असता त्यांच्या तोंडून जे उद्गार निघाले,

त्यांवरून हे स्पष्ट होते. " मी कोणाचे काही वाईट केले नाही; देव मला जवळ घेईल. मी जे काही केले ते त्यास संतोष होण्याजोगे होते, असंतुष्ट होण्यासारखे काही नव्हते "[३१] तसेच मृत्यू जवळ आला असता परमेश्वराची प्रार्थना कशी करावी ते त्यांनी सांगितले आहे. त्यात " तुझ्या आज्ञेप्रमाणे सत्यास स्मरून मी या जगात वर्तन केले, हे तू जाणतोस, यास्तव तू माझा अंगीकार करशील अशी माझी पूर्ण खात्री आहे. "[३२] असे म्हटले आहे. ज्या प्रश्नाचा उलगडा करणे हे आपल्या बुद्धीच्या आवाक्याबाहेरचे आहे त्याचा निष्फळ काथ्याकूट करीत न बसता ते सर्व श्रद्धापूर्वक ईश्वरावर सोपवून आपण निश्चित राहणे हेच श्रेयस्कर आहे अशी जोतीरावांची भावना होती त्यांचा हा दृष्टिकोण थॉमस पेन यांच्या मरणोत्तर स्थिती-संबंधीच्या भूमिकेशी बराचसा जुळणारा आहे.[३३]

## सत्य आणि नीती

जोतीरावांच्या धर्ममीमांसेत आणि ईश्वरविषयक प्रतिपादनात त्यांनी सत्य आणि नीती यांवर विशेष भर दिला आहे. त्यातही त्यांच्या धर्मविचारातील सत्याचे स्थान अनन्यसाधारण असे आहे. " सत्य सर्वांचें आदी घर । सर्व धर्मांचें माहेर ॥ "[३४] अशी त्यांची धारणा होती. " जय हो जय हो माझ्या आदीसत्या । तुझ्या सत्तेनें शोधूं उत्पनकर्त्या "[३५] असा त्यांनी सत्याचा महिमा गाइला आहे. या दृष्टीनेच त्यांनी आपल्या धर्ममताला एकेश्वरवाद किंवा मानवधर्म यांसारखे नाव न देता ' सार्वजनिक सत्यधर्म ' असे म्हटले आहे. त्याच्या प्रसारासाठी जी संस्था स्थापन केली, तिला त्यांनी ' सत्यशोधक समाज ' असे नाव दिले. ' सत्यमेव जयते ' हे त्यांचे ब्रीदवाक्य होते ' सत्याविण नाही जगीं अन्य धर्म ', ' सत्यानें वर्तावें ईशासाठीं ', ' सार्वभौम सत्य स्वतः आचरावें '[३६] असा त्यांनी आपल्या अनुयायांना वारंवार उपदेश केला आहे. शिवाय सत्यमत, सत्यबोध, सत्यपाठ, सत्यप्रकाश, सत्योदय, सत्यसत्ता, सत्यईश असे शब्दप्रयोग त्यांच्या वाङ्मयात कितीतरी आढळतात. ईश्वरावर विश्वास, सत्याचा शोध आणि नीतिमूल्यांची जोपासना या त्रिपुटीत त्यांच्या धर्मविचाराचे सारसर्वस्व साठवलेले आहे. ईश्वराचे स्वरूप अनाकलनीय आहे. तेव्हा त्याची चिकित्सा करण्यात वेळ दवडणे शहाणपणाचे नाही. खऱ्या धर्मसाधनेसाठी त्याची आवश्यकता नाही. " मानवांचा धर्म सत्य खरी नीती "[३७] अशी आपण आपल्या मनाशी खूणगाठ बांधली पाहिजे. सत्याचा संबंध समग्र जीवननिष्ठेशी आहे. नीतीचे प्रयोजन हे प्रामुख्याने माणसामाणसांच्या परस्परसंबंधांचे नियमन करणे, त्यांना योग्य वळण लावणे, त्यांत सुखसंवाद साधणे हे आहे. नीती ही बहुधा समाजाच्या विशिष्ट अवस्थेची द्योतक असते. अर्थातच ती कालसापेक्ष, परिस्थितिसापेक्ष व परि-

वर्तनशील असते. ती समतेवर आधारलेली असेल, किंवा विषमतेवर आधारलेली असेल. सत्याच्या बाबतीत तसे म्हणता येणार नाही. त्याचा आविष्कार आणि आकलन जरी परिस्थितिसापेक्ष असले तरी निखळ सत्य हे स्थलकालनिरपेक्ष असते असेच सर्व ईश्वरनिष्ठ व चिद्वादी तत्त्वचिंतक मानतात. म्हणून नीती ही ज्याप्रमाणे सत्याशी सुसंगत असेल, त्या प्रमाणात ती ईश्वरी कृपा संपादन करण्याचे साधन म्हणून उपकारक ठरते. या दृष्टीनेच जोतीरावांनी नीतीचे लक्षण सांगताना तिचा सत्याशी संबंध जोडला आहे. "आपल्या सर्वांच्या निर्मीकास संतोष देण्यासाठी सार्वजनिक सत्याचे भय मनी धरून जो कोणी इतर मानव बांधवांबरोबर आचरण करील, त्यास नीती म्हणावी; मग तो खिस्ती असो, महमदी असो, सत्यशोधक समाजीयन असो, अथवा एखादा गावंढेकरी अज्ञानी असो."[३८] सत्य, न्याय आणि नीती यांची फारकत जोतीरावांना अनिष्ट वाटत होती. यासाठीच स्त्री आणि पुरुष, ब्राह्मण आणि शूद्रातिशूद्र यांच्या बाबतीत पक्षपात करणारी आर्यांची परंपरागत नीती त्यांनी निषेधार्ह मानली आहे. "आर्यभट्ट ब्राह्मणांच्या ग्रंथांमध्ये ब्राह्मणांचे शूद्रापासून घ्यावयाचे माप एक आणि ब्राह्मणांनी शूद्रादिअतिशूद्रांस द्यावयाचे माप एक"[३९] अशी अन्यायमूलक दुहेरी नीती आढळून येते. वस्तुतः ही खरी नीतीच नव्हे असे जोतीरावांचे मत होते. त्यांनी सत्यवर्तनाचा जो तपशील दिला आहे, त्यात त्यांना ग्राह्य वाटत असलेले नीति-नियमच अंतर्भूत आहेत. प्रत्येक मनुष्याने स्वतः अंगमेहनत करून आपला निर्वाह करावा अशी सृष्टिकर्त्या ईश्वराची योजना आहे. तिच्याशी प्रतारणा करणे यासारखे दुसरे पाप नाही अशी त्यांची भावना होती. म्हणून त्यांनी श्रमप्रतिष्ठेच्या तत्त्वाचा सातत्याने पाठपुरावा केला आहे.

"कोणास न पिडी कमावलें खाई। सर्वां सुख देई। आनंदांत॥
खरी हीच नीती मानवाचा धर्म। बाकीचे अधर्म। जोती म्हणे"[४०]

सत्यवर्तन करणाऱ्याने "स्त्री अथवा पुरुष, जे चांभाराच्या घरी का होईना, बिगाऱ्यांचा धंदा करून आपला निर्वाह"[४१] करतात, त्यांना तुच्छ लेखणे बरोबर नाही. उलट स्वतः काही उद्योगधंदा न करता धर्माच्या नावाखाली अज्ञजनांना लुबाडून आपला योगक्षेम चालू ठेवणाऱ्या लोकांना असत्याचरणी व नीतिभ्रष्ट मानले पाहिजे अशी जोतीरावांची विचारसरणी होती. म्हणून त्यांनी अशा बेजबाब-दार ऐतखाऊ लोकांना "स्वकष्टानें पोटें भरा"[४२] असा मित्रत्वाचा सल्ला दिला आहे.

ईश्वराने सर्व मनुष्ये जन्मतःच स्वतंत्र निर्माण केली आहेत. त्यामुळे त्यांचे

मूलभूत मानवी अधिकार आहेत ते स्वतःसिद्ध आहेत. ते कुणी कुणाला द्यावयाचे किंवा नाकारायचे असा प्रश्नच उद्‌भवत नाही. प्रत्येक मनुष्याला, मग तो कोणत्याही थरातील अथवा जातीतील असो, सधन किंवा निर्धन असो, सुशिक्षित वा अशिक्षित असो, पुरुष असो वा स्त्री असो, आपले मानवी अधिकार उपभोगण्याची पूर्ण मोकळीक असली पाहिजे. मात्र हे स्वातंत्र्य म्हणजे अनिर्बंधपणाचा किंवा बेजबाबदारपणाचा परवाना नव्हे. आपले हक्क उपभोगताना त्यामुळे अकारण कुणाचे नुकसान होणार नाही, कुणाच्या स्वातंत्र्यावर गदा येणार नाही याची काळजी सर्वांनीच वाहिली पाहिजे. एकाच जगज्जनकाची आपण सर्व अपत्ये आहोत या व्यापक बंधुभावाची जाणीव न ठेवता समाजाच्या एका घटकाने बळजबरीने किंवा कपटनीतीने दुसऱ्या घटकावर आपले वर्चस्व स्थापणे, त्यातील लोकांना तुच्छ लेखून त्यांचा छळ करणे, त्यांचे मानवी अधिकार हिरावून घेणे हे धर्मशीलतेचा टेंभा मिरविणाऱ्या माणसांना लांछनास्पद आहे. अशा तऱ्हेने मानवी जीवनात विषमतेची जोपासना करणाऱ्या प्रवृत्तीचा सार्वजनिक सत्याशी व खऱ्याखुऱ्या नीतीशी काडीचाही संबंध नाही. जोतीरावांच्या या विवेचनाला एक विशिष्ट सामाजिक संदर्भ आहे. त्यांच्यासमोर एका बाजूला हिंदुधर्मातील वर्णवर्चस्व, विषमता, उच्चवर्णियांचे विशेषाधिकार आणि दुसऱ्या बाजूला शूद्रातिशूद्रांवर लादलेले अन्यायमूलक निर्बंध इत्यादी गोष्टी आहेत. या दोहोंतील विसंवादाला अनुलक्षून त्यांनी हे सत्यवर्तनाचे विवरण केलेले आहे.

ईश्वराविषयी चुकीचे ग्रह निर्माण करणाऱ्या मूर्तिपूजेसारख्या उपासनापद्धतीचा सत्यधर्मी लोकांनी त्याग केला पाहिजे, कारण या प्रथेमुळे धर्मजीवनात भिक्षुकशाहीला आपले वर्चस्व कायम ठेवण्यास भरपूर अवसर मिळतो. शास्त्रोक्त पूजाविधीला नसते महत्त्व येऊन निर्मिकाच्या सत्यस्वरूपाचा शोध घेण्याची इच्छा मारली जाते; आणि धर्मकृत्यात वेळोवेळी जीवनोपयोगी द्रव्यांची विनाकारण नासाडी होते, अशी जोतीरावांची भूमिका होती. सत्यधर्म ही कोणत्याही एका जनसमूहाची मिरास नाही. म्हणून धार्मिक मतभेदांच्या बाबतीत, जर त्यांत उघडउघड असत्याचा किंवा अनीतीचा भाग नसेल, तर आपण नेहमीच उदारतेची व सहिष्णुतेची वृत्ती बाळगली पाहिजे. आपल्या मतांचा अनाठायी व अविवेकी आग्रह धरून त्यापायी दुसऱ्यांची छळणूक करणे, त्यांना सक्तीने आपली मते स्वीकारावयास लावणे हे खचितच गर्हणीय आहे. त्यात मनुष्यत्वाची अप्रतिष्ठा आहे हे जोतीरावांनी अनेकदा आवर्जून सांगितले आहे. आपल्या सत्यनिरूपणात आणि नीतिनिर्णयात त्यांनी व्यक्तीची प्रतिष्ठा आणि मतस्वातंत्र्य या दोन्ही तत्त्वांचे सतत अनुसंधान राखले आहे.

## पवित्र धर्मग्रंथ व धर्मकलह

जोतीराव हे धर्मभावनेचे पावित्र्य मानत असले, तरी कोणत्याही एका मोठ्या धर्मातील स्वतःप्रमाण आदिग्रंथ ईश्वरदत्त व सर्वांगपरिपूर्ण आहे असे त्यांना वाटत नव्हते. अशा प्रत्येक धर्मग्रंथाच्या आशयात काही शाश्वत स्वरूपाचा व काही कालसापेक्ष भाग असतोच. काळ बदलला तरी त्या ग्रंथातील कालसापेक्ष भागात बदल घडवून आणण्यास त्या त्या धर्मसंस्थेच्या ठेकेदारांचा कडवा विरोध असतो. त्यामुळे बहुधा प्रत्येक धर्माच्या अनुयायांच्या नित्यनैमित्तिक व्यवहारात विशुद्ध धर्मभावनेबरोबर अनेकविध संकुचित व शबल प्रवृत्तींचा शिरकाव होतो. म्हणून आपल्या सदसद्विवेकबुद्धीला प्रमाण मानूनच कोणत्याही धर्मग्रंथाचे परिशीलन केले पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. त्यासाठीच त्यांनी ईश्वरदत्त धर्मग्रंथाच्या रूढ कल्पनेला जोराचा धक्का दिला आहे. धर्मग्रंथासंबंधीच्या त्यांच्या विवेचनात कुठेही संभ्रम किंवा संदिग्धता आढळून येत नाही. "या पृथ्वीच्या पृष्ठभागावर जेवढी म्हणून मानवांनी धर्मपुस्तके केली आहेत, त्यांपैकी एकाही ग्रंथात आरंभापासून शेवटापर्यंत सारखे सार्वजनिक सत्य नाही. कारण प्रत्येक धर्मपुस्तकामध्ये काहीएक व्यक्तींनी त्यावेळच्या प्रसंगांस अनुसरून हेकडपणा केल्यामुळे, ते धर्म एकंदर सर्व मानवी प्राण्यांस सारखे हितकारक न होता, सहजच त्यांमध्ये अनेक फळ्या होऊन त्या एकमेकांचा मनापासून हेवा व द्वेष करू लागतात."[४३]

जोतीरावांच्या या प्रतिपादनावरून हे ग्रंथ मनुष्यनिर्मित आहेत. त्यांना विशिष्ट प्रसंगांची पार्श्वभूमी आहे आणि त्यात समदृष्टीचा अभाव आहे अशा तीन गोष्टी आपल्या ध्यानात येतात. कारण ईश्वराने स्वतःच एखादे धर्मपुस्तक तयार केले असते, तर ख्रिस्ती समाजासाठी एक, मुसलमानांसाठी एक, हिंदूंसाठी एक असा पंक्तिप्रपंच त्याच्याकडून कधीच झाला नसता. उलट "त्याने ते धर्मपुस्तक एकंदर सर्व जगातील निरनिराळ्या भाषांत समजण्याजोगते केले असते."[४४] जोतीरावांचा एका कबीरपंथी साधूशी झालेला संवाद या दृष्टीने उद्बोधक आहे. वेदांच्या अपौरुषेयत्वावर आक्षेप घेताना त्यांनी त्यात ईश्वराने चार वेद जर सर्व मानवी प्राण्यांच्या उद्धारासाठी केले, तर इतर सर्व भाषा सोडून बहुतेक देशांतील लोकांना अपरिचित अशा अतिप्राचीन संस्कृत भाषेतच का केले असा प्रश्न उपस्थित केला आहे. यावरून ईश्वराचा पक्षपातीपणा सिद्ध होतो. जगात संस्कृतखेरीज अनेक भाषा प्रचलित आहेत, आणि त्यांत पुढे कितीतरी भाषांची भर पडणार आहे हे त्याला कळले नाही म्हणावे, तर त्याच्या सर्वज्ञतेस व सर्वसाक्षीपणास बाध येतो. परंतु ईश्वर हा समदृष्टी, सर्वज्ञ व सर्वसाक्षी आहे अशी सर्व धर्मांच्या लोकांची धारणा आहे. तेव्हा हे

ग्रंथ ईश्वरनिर्मित नाहीत हा निष्कर्षच अधिक सयुक्तिक ठरतो अशा भावार्थाचे जोतीरावांचे एकंदर विवेचन आहे. असे असले तरी बायबल, कुराण यांसारख्या धर्मग्रंथांविषयीचा त्यांचा आदर कायम होता. कारण ' अनेक कनवाळू, परोपकारी सत्पुरुषांनी ' ही धर्मपुस्तके लिहिली आहेत, अशी त्यांची भावना होती. येशू ख्रिस्त आणि महंमद पैगंबर या दोन्ही धर्मसंस्थापकांबद्दल त्यांच्या मनात नितांत आदर होता.

" आपण सर्वांच्या निर्मिकाविषयी जो काही येशूने उपदेश केला, त्यामध्ये त्याने आपल्या सर्वांच्या निर्मिकास बापासमान मानून अज्ञानी मानव बंधूजनांचे तारण होण्या-साठी त्यांस मोठ्या आशेने बोध केला, यावरून अर्थात हल्लीचे एकंदर सर्व ख्रिस्ती लोक त्याला देवाच्या पुत्रासारिखा मानून त्यास तारणारा म्हणतात. महंमदाने निर्मिकाच्या अधिकाऱ्यांविषयी बरेच पवित्र कुराण लिहून ठेविले आहे; त्यात त्याने जो काही उपदेश केला आहे, त्या सर्वांमध्ये एकंदर सर्व मानव बंधुजनांस सुमार्गावर आणण्या-करिता आपण सर्वांच्या निर्मिकाने महंमदाला येथे पाठविले आहे, म्हणून तो मोठ्या आवेशाने उघड सर्वांस कळवीत असे. यावरून अर्थात हल्लीचे एकंदर सर्व सुन्नी अथवा शिय्या महमदी लोक त्याला पैगंबर अथवा आपण सर्वांच्या निर्मिकाने पाठव-लेला म्हणतात. "[४५] या उताऱ्यात जोतीरावांनी येशू ख्रिस्ताचे श्रेष्ठत्व वर्णन केले आहे–त्याखालोखाल महंमदाच्या मोठेपणाची ग्वाही दिली आहे. मात्र या धर्म-ग्रंथांतही पुरुषप्रधान संस्कृतीचा पक्षपातीपणा दिसून आल्याखेरीज राहात नाही. त्यात स्त्रियांच्या मानवी अधिकारांची उपेक्षा करून मुख्यतः पुरुषांच्या हक्काचेच विवेचन केलेले आहे, हे त्यांनी निर्भीडपणे सांगून टाकले आहे. ख्रिस्ती लोक जगातील सर्व भाषांतून बायबलचा अनुवाद करून हा आपला धर्मग्रंथ कुठलाही भेदभाव न करता सर्वांना वाचावयास देतात. या व्यापक दृष्टीमुळे ख्रिस्तीमत हे " सार्वजनीक ईश्वरप्रणीत सत्याच्या नावाला काहीसे शोभण्यासारखे दिसते. "[४६] असा जोतीरावांनी आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. मुसलमानांनी कुराणाची अशी भाषांतरे करून त्याचा प्रसार केला नाही, तरी आपला धर्मग्रंथ वाचण्यास ते कुणालाही प्रतिबंध करीत नाहीत. हिंदू लोक मात्र आपले वेदादी ग्रंथ आपल्याच धर्मातील शूद्रातिशूद्रांच्या कानी पडू नयेत याची खबरदारी घेतात. इतकेच नव्हे तर हिंदू धर्मशास्त्रकारांनी त्यांना विद्याध्ययनाची बंदी करून आपल्या धार्मिक गुलाम-गिरीची त्यांना जाणीवच होऊ नये म्हणून कायमचा बंदोबस्त करून ठेवला आहे. आपल्याच धर्माच्या खालच्या जातींतील लोकांना अशा प्रकारे दूर लोटणारा हिंदू धर्म आणि सार्वजनिक सत्यधर्म यांत तमःप्रकाशवत विरोध आहे असा जोतीरावांच्या प्रतिपादनाचा मथितार्थ आहे.

मोठमोठ्या सत्पुरुषांनी लिहिलेल्या निरनिराळ्या धर्मग्रंथांत अंशतः का होईना

सार्वजनिक सत्याचे निरूपण आहे; तर त्यांच्या अनुयायांत इतका विसंवाद का निर्माण व्हावा अशी शंका येणे साहजिक आहे, पण याचे कारण वरेचसे लोक वेगवेगळ्या धर्मांच्या संबंधात सारासारविचार न करता आपलाच धर्म खरा असा 'बेलगामी हट्ट' घेऊन बसतात हे होय.

"सत्य सोडूनियां धर्मवादी होती । संग्रामीं करीती रक्तपात ॥

लढण्याचा कित्ता संताना घालीती । पिढीजादा देती । दुःख जगा ॥"[४७]

बहुसंख्य लोक धर्माच्या मूलतत्त्वांकडे पाठ फिरवून बाह्य प्रतीकांचा अभिमान बाळगतात. त्यामुळे आपली प्रतीकेच काय ती श्रेष्ठ प्रतीची आणि दुसऱ्यांची प्रतीके हीन दर्जाची असे पूर्वग्रह बळावतात. वास्तविक पाहता सर्वजण एकाच ईश्वराची लेकरे पण धर्माच्या, पंथाच्या नावाखाली त्यांच्यात दुफळी होऊन त्यांची भांडणे सुरू होतात. ते स्वतः तर एकमेकाशी लढतातच, पण पुढच्या पिढ्यांनाही कलहशीलतेचा, वैरभावाचा कित्ता घालून देतात.

"जो तो म्हणे माझा धर्म शेकला । गर्वानें फुगला । जगामाजी"[४८]

ज्याला त्याला आपला धर्मच मोठा असे वाटते. ईश्वरी कृपेचे त्यांना काहीच सोयर-सुतक नसते. खोट्या सामूहिक अहंतेमुळे दोन्ही पक्षांचा अधःपात मात्र होतो. याची तर कुणालाच खंत नसते. उलट अशा धार्मिक झगड्यात जे बळी पडतात, त्यांना गौरवपूर्वक हुतात्म्यांची प्रतिष्ठा देण्यात येते.

"जगामाजी धर्म अगणीत होती । लढाया खेळती । रेड्यापरी ॥

रेडे धरणारे प्राणास मुकती । कित्येक म्हणती । स्वर्गीं गेले ॥

कोणी म्हणे सर्व मार्टर झाले । जन्नतीस गेले । कोणी म्हणे ॥

सद्विवेकावीण सर्व भांबावले । रक्तपाती झाले । जोती म्हणे ॥"[४९]

अशा रक्तपिपासू धर्मांधतेचा जोतीरावांनी धिक्कार केला आहे. हिंदू धर्ममार्तंडांचा त्यांनी समाचार घेतला यात नवल नाही. परंतु येशू खिरस्त व महंमद पैगंबर यांच्या-बद्दल आदर असूनही खिरस्ती व मुसलमान लोकांच्या धर्मवेडेपणावर त्यांनी ताशेरे झाडले आहेत.

"आवेशी खिस्तास करा सत्यबोध । करावे सावध । बंधूपरी"

"सुनांशिया सर्व करा सत्यवादी । त्याची जहामर्दी । जगाठायीं"[५०]

एकमेकांच्या धर्माविषयी सारासारविचार करून त्यातील सत्यांश समजून घेतल्यास कोणी कोणाच्या धर्माला खोटे म्हणणार नाही; आणि मग अर्थातच भांडणाचे कारण उरणार नाही. मुसलमान, खिस्ती, महारमांग, ब्राह्मण या सर्वांना जोतीरावांचे एकच सांगणे होते.

"निर्मीकाचा धर्म सत्य आहे एक । भांडणें अनेक । कशासाठीं ॥"[५१]

## धार्मिक स्वयंनिर्णय आणि निर्मळ भाऊपणा

धर्म ही प्रत्येक मनुष्याची वैयक्तिक बाब आहे याबद्दल जोतीरावांच्या मनात तिळमात्र संदेह नव्हता. त्यामुळे त्यांनी आपल्या धर्मविचारात स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा आवर्जून पुरस्कार केला आहे. त्यांच्या धर्ममीमांसेचे अधिष्ठान ईश्वरनिष्ठ मानवतावाद हे आहे; आणि व्यक्तीची प्रतिष्ठा हे या मानवतावादाचे एक प्रमुख अंग आहे. मनुष्य जन्माला येतो तो केवळ सृष्टिकर्त्याचे अपत्य म्हणून; एक स्वतंत्र माणूस म्हणून. नंतर त्याचा जात, धर्म, समाज, देश इत्यादिकांशी संबंध येतो. त्यांचा तो घटक बनतो. जीवनकलहात टिकून राहण्यासाठी आणि आपल्या व्यक्तित्वाचा विकास साधण्यासाठी या संस्थांचे साह्य त्याला वारंवार घ्यावे लागते; त्यासंबंधीची आपली कर्तव्ये पार पाडावी लागतात. तरी देखील ईश्वराशी आणि मानवतेशी असलेल्या आपल्या मूलभूत नैसर्गिक संबंधाचा त्याला विसर पडता कामा नये. या दृष्टीनेच अनेक जुन्या-नव्या व लहानमोठ्या धर्मपंथांनी ईश्वराचे पितृत्व आणि मानवांचे भ्रातृत्व या दोन तत्त्वांवर सातत्याने भर दिला आहे. ' देशधर्मभेद नसावा अंतरीं '[५२] असे जेव्हा जोतीराव म्हणतात, तेव्हा त्यांना देशाभिमान आणि धर्माभिमान यांचे मानवी जीवनातील वास्तविक महत्त्व आणि मर्यादा आपण ओळखल्या पाहिजेत; त्यांपायी माणसामाणसांच्या परस्परसंबंधांतून माणुसकीचाच बळी दिला जाणार नाही याची काळजी घेतली पाहिजे असे ध्वनित करावयाचे असते. इच्छास्वातंत्र्य, निर्णयस्वातंत्र्य हेच मनुष्यत्वाचे व्यवच्छेदक लक्षण आहे. हे स्वातंत्र्य त्याला किती निर्वेधपणे उपभोगता येते यावर त्याच्या व्यक्तित्वाची प्रतिष्ठा अवलंबून असते. व्यक्तीची प्रतिष्ठा हे मूल्य एकदा मान्य केले, म्हणजे आपल्या स्वातंत्र्यामुळे दुसऱ्याचे स्वातंत्र्य धोक्यात येणार नाही, त्याचे नुकसान होणार नाही याची दक्षता घेणे प्रत्येकाचे कर्तव्य ठरते. हे पथ्य काटेकोरपणे पाळले गेले, तर मग दुसऱ्या कोणत्याही कारणास्तव व्यक्तींच्या स्वातंत्र्याची गळचेपी होणे इष्ट नाही अशी जोतीरावांची धारणा होती. धर्माच्या संबंधात तर स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला आगळेच महत्त्व आहे. कारण थॉमस पेन यांनी म्हटल्याप्रमाणे "To God, and not to man, are all men accountable on the score of religion."[५३] धर्माच्या बाबतीत सर्व माणसांना फक्त ईश्वरापाशीच आपल्या उभ्या आयुष्याचा हिशोब चुकता करावा लागेल इतर कुणालाही यासंबंधी त्याला जाब विचारण्याचा अधिकार नाही. म्हणून आपण ईश्वराची उपासना कोणत्या स्वरूपात व कोणत्या पद्धतीने करावी हे ठरविण्याची मोकळीक सर्वांना असली पाहिजे. यासाठी कोणत्याही संस्थेने वा जनसमूहाने त्याच्यावर सक्ती करणे, किंवा त्याचा छळ करणे हे उचित

होणार नाही. हे धार्मिक निर्णयस्वातंत्र्याचे तत्त्व जोतीरावांच्या एकंदर लेखनात सर्वत्र अनुस्यूत आहे.

"या भूमंडळावर महासत्पुरुषांनी जेवढी म्हणून धर्मपुस्तके केली आहेत, त्या सर्वांत त्या वेळेस अनुसरून त्यांच्या समजुतीप्रमाणे काहींना काही सत्य आहे. यास्तव कोणत्याही कुटुंबातील एका मानव स्त्रीने बौद्धधर्मी पुस्तक वाचून तिच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास तिने तो धर्म स्वीकारावा व त्याच कुटुंबातील तिच्या पतीने जुना व नवा करार वाचून त्याच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास त्याने ख्रिस्ती व्हावे व त्याच कुटुंबातील त्यांच्या कन्येने कुराण वाचून तिच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास तिने महमदी धर्मी व्हावे. आणि त्याच कुटुंबातील त्यांच्या पुत्राने सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक वाचून त्याच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास त्याने सार्वजनिक सत्यधर्मी व्हावे; आणि या सर्व माता-पित्यांसह कन्यापुत्रांनी आपला प्रपंच करीत असता प्रत्येकाने कोणी कोणाच्या धर्माचा हेवा करून द्वेष करू नये आणि त्या सर्वांनी आपण सर्वांच्या निर्माणकर्त्याने निर्माण केलेली लेकरे असून त्याच्याच (निर्मिकाच्या) कुटुंबातील आहोत, असे समजून प्रेमाने व गोडीगुलाबीने एकमेकांनी वर्तन करावे, म्हणजे ते आपल्या सर्वांच्या निर्माणकर्त्याच्या राज्यात धन्य होतील."[५६]

जोतीरावांनी सर्वधर्मसमावेशक अशा उदारमतवादी कुटुंबाचे चित्र येथे उभे केले आहे. अशा कुटुंबात सलोख्याचे व खेळीमेळीचे वातावरण निर्माण होण्यास केवळ परधर्मसहिष्णुता असून भागणार नाही; तर सर्वांच्या मनात एकमेकांच्या धर्माविषयी आदरबुद्धी वसत असली पाहिजे. आता एका कुटुंबात जर अनेक धर्मांचे लोक सुखाने नांदू शकले, तर मग एकंदर समाजात त्यांना एकोप्याने राहण्यास का अडचण पडावी? काही झाले तरी, बहुतेक सर्व धर्म 'सार्वजनिक सत्याची लेकरे' आहेत. आपण विधायक वृत्तीने त्यांतील सत्यांश ग्रहण करण्याची तत्परता बाळगली पाहिजे. मात्र त्यांत व्यापक विवेकदृष्टीला व चिरंतन नीतिमूल्यांना जे विघातक असेल, त्याची गय करण्यात हशील नाही. त्यावर सडकावून ताशेरे झाडलेच पाहिजेत. जोतीरावांच्या लेखनात निर्मिकाच्या राज्याची कल्पना अनेकदा आली आहे. ईश्वर हा न्यायी, समदृष्टी व दयाळू आहे. त्याचे राज्य या पृथ्वीवर स्थापन व्हावे यासाठी प्रत्येक ईश्वरनिष्ठाने प्रयत्नशील असले पाहिजे असे ते मानतात. परंतु जगात सर्वत्र जात, धर्म, देश यांच्या नावाखाली स्वार्थ साधण्याची प्रवृत्ती प्रकर्षाने दिसून येते.

"तेथें कैचा देश, धर्म, जातीभेद। सर्वांची उमेद। सुखासाठीं।
सुखापोटीं मोह उत्पन्न तो झाला। पिडी सर्वत्राला। एकसहा॥"[५७]

अशा अनियंत्रित सुखलालसेमुळे मानवांच्या सामूहिक जीवनात अमंगळ भेदाभेद

उत्पन्न होतात. आपापल्या क्षुद्र स्वार्थासाठी लहानमोठे गट एकमेकांशी हिरिरीने झगडतात. मूळच्या विश्वबंधुत्वाच्या भावनेचा विसर पडतो. अशा स्वार्थमूलक संकुचित प्रवृत्तींचा लोप होऊन सर्वांमध्ये 'निर्मळ भाऊपणा' जागृत झाल्याखेरीज येथे ईश्वराचे राज्य स्थापन होणे शक्य नाही. "आपल्याकरिता निर्मीकाने निर्माण केलेल्या वस्तूंचा, त्याच्या नावाने काही धर्मसंबंधित कल्पित छक्केपंजे उत्पन्न केल्याशिवाय आपल्या सर्वांच्या श्रमाप्रमाणे उपभोग घेण्याची सुरवात केल्याबरोबर, एकंदर सर्व जगातील मानवप्राण्यांत कोणत्याही तऱ्हेचे निरर्थक कलह उत्पन्न होणार नाहीत. व आपण सर्व बहीण-भावंडांसारखे वागू लागल्याबरोबर एकंदर सर्व मानवप्राणी सुखी होऊन साक्षात निर्मीकाचा अम्मल बसून त्याचे राज्य होणार आहे."[५६] पण असे घडून येण्याची अगदी पुसटशी पूर्वचिन्हे देखील सध्या दिसून येत नाहीत. तेव्हा "या आपल्या दुर्दैवी जगात निर्मीकाचे राज्य तूर्त होणे नाही."[५७] असा जोतीरावांनी खेदजनक निष्कर्ष काढला आहे.

## सत्यधर्माचा सामाजिक आशय

जोतीरावांच्या मनावर एकोणिसाव्या शतकातील उदारमतवादाचे खोलवर संस्कार झाले होते. त्यामुळे स्वातंत्र्य, समता, बंधुभाव या तत्त्वांचे त्यांनी वारंवार गोडवे गाईले आहेत. व्यक्तिस्वातंत्र्य, व्यक्तिविकास या कल्पनांचा त्यांनी आवर्जून पुरस्कार केला. पण त्याबरोबरच त्यांना सामाजिक न्यायाच्या तत्त्वाची जोड देण्याची त्यांनी काळजी घेतली होती. कारण समाजाच्या अनेकविध घटकांच्या परस्परसंबंधांची न्यायाच्या तत्त्वावर नव्याने उभारणी झाल्याखेरीज व्यक्तिमात्राचा मुक्तपणे विकास होणारा नाही याची त्यांना जाणीव झाली होती. मात्र उदारमतवादाइतकीच त्यांना खिरस्तप्रणीत मानवतावादाची ओढ होती. साहजिकच त्यांच्या मतप्रतिपादनात इहवादी उदारमतवाद आणि ईश्वरनिष्ठ मानवतावाद यांची सांगड घालण्याचा प्रयत्न सर्वत्र दिसून येतो. ईश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, समदृष्टी व दयाशील आहे हे आपण नेहमीच वाचतो, ऐकतो. जोतीरावांनी ईश्वराच्या न्यायीपणावर सतत भर दिला आहे. त्यांच्या धर्मनिरूपणात तर त्यांची ही न्यायनिष्ठा जागोजाग प्रतिबिंबित झालेली आहे. त्यांच्या सार्वजनिक सत्यधर्माचे अंतिम उद्दिष्ट ह्या पृथ्वीवरच ईश्वरी राज्याची स्थापना करणे हे आहे. त्यात एकेका व्यक्तीच्या पारमार्थिक कल्याणाला अवास्तव महत्त्व दिलेले नाही. हेच लौकिक भाषेत सांगायचे झाल्यास जोतीरावांना न्याय, स्वातंत्र्य, समता, बंधुभाव या तत्त्वांची प्रत्यक्ष अंमलबजावणी करणारा समाज निर्माण करण्याची तळमळ होती. रूढिवादाच्या आहारी जाऊन व्यक्तिस्वातंत्र्याला थारा न देणारा साचेबंद जीवनक्रम त्यांना त्याज्य वाटत

होता. पण बेबंद व दिशाहीन लोकव्यवहारही त्यांना तितकाच हानिकारक वाटत होता. विमुक्त, प्रगतिपर पण स्वयंशासित व शिस्तबद्ध सामाजिक जीवन त्यांना अभिप्रेत होते. "आपण सर्वांच्या निर्मिकाने या अगम्य पोकळीतील अनंत सूर्यमंडळासह त्यांच्या ग्रहोपग्रहांवरील अनंत प्राणीमात्रांस त्याने धडा घालून दिल्याप्रमाणे, ते आपल्या सुवर्तनाने कसे वर्तन करीत आहेत."[५८] सृष्टिव्यापारातील ही सुसूत्रता व नियमबद्धता लक्षात घेऊन मानवी समाजाने आपल्या जीवनक्रमाला नीट वळण लावले पाहिजे. त्यात सहजता हवी, पण यंत्रवत नियमितपणाही हवा; मात्र प्रेरणाशून्य यांत्रिकता नको. म्हणून जोतीरावांनी विचार, उच्चार आणि आचार या तिन्ही बाबतींत सदासर्वकाळ न्यायशील ईश्वराचे भय बाळगण्याची शिकवण दिली आहे. "आपण सर्व मानवांनी निर्माणकर्त्याचे भय सदा सर्वकाळ जागृत न ठेविता, त्याने निर्माण केलेल्या मानव स्त्री-पुरुषांनी एकमेकांविषयी बहीण-भावंडपणाची पवित्र वृत्ती जागृत न ठेविल्यामुळे या जगामध्ये सत्याचा मुळीच ऱ्हास होत गेला व यामुळे एकंदर सर्व जगात असंतोष होऊन दुःखाचे प्राबल्य झाले."[५९] असे त्यांना मनापासून वाटत होते. यासाठी त्यांनी "सर्वांचा निर्मीक आहे एक धनी। त्याचें भय मनीं। धरा सर्व." "मानवांनों, तुम्ही ईशा नित्य भ्यावें"[६०] असे आग्रहपूर्वक सांगितले आहे. ईश्वराचे भय बाळगणे याचा अर्थ विश्वनियामक शक्तीचे भान राखणे, ईश्वराच्या योजनेशी संवाद साधणे हाच आहे. एकदा हे सूत्र सांभाळले की, मग कोणत्याही लौकिक शक्तीची वा सत्तेची फिकीर करण्याचे कारण नाही. ईश्वराचे भय बाळगूनच जगात सर्वत्र निर्भयतेने वावरता येते. ईश्वर हा सर्वशक्तिमान आहे, तरी त्याचे शासन हे न्यायाचे आहे, पूर्वनियोजित नियमांचे आहे. या शासनपद्धतीत आंधळी वज्रकठोर न्यायनिष्ठा नाही; तिच्यात दयार्द्रतेला स्थान आहे. ईश्वराची सत्ता सार्वभौम असली, तरी त्या नेआपल्या राज्यशासनात व्यक्तीच्या निर्णयस्वातंत्र्याला मर्यादित वाव ठेवला आहे शिवाय प्रत्येक व्यक्तीला, मग ती स्त्री असो वा पुरुष असो, यत्किंचितही आवडनिवड न करता, काही जन्मसिद्ध मानवी अधिकार त्याने बहाल केले आहेत. त्याबरोबरच सम्यक निर्णय करण्याची जबाबदारीही तिच्यावर येऊन पडली आहे. ही परिभाषा आधुनिक युगातील उदारमतवादी राजकीय परिभाषेशी मिळतीजुळती आहे हे उघड आहे. कुटुंबसंस्था व राज्यसंस्था या दोहोंशीही माणसाचा दीर्घकालीन ऋणानुबंध आहे. ईश्वराला याकरिताच जगत्पिता व जगन्नायक म्हणून संबोधण्यात येते. कौटुंबिक जिव्हाळ्याचे मोल जोतीराव जाणत होते. त्याखेरीज त्यांनी 'निर्मळ भाऊपणाचा' इतका आग्रह धरला नसता. परंतु आपल्या धार्मिक जीवनातील बहुविधता, शैथिल्य व असंघटितपणा पाहूनच कदाचित त्यांनी शासनसंस्थेतील एकसूत्रीपणाला व शिस्तबद्धतेला झुकते माप दिले असेल.

शूद्रातिशूद्रांच्या प्रबोधनासाठी जोतीरावांची खटपट चालू होती. तत्कालीन धर्म-जीवनात भजनपूजन, नामसंकीर्तन, मंत्रतंत्र, नवस-सायास, व्रतवैकल्ये आणि तीर्थ-यात्रा या गोष्टी प्रचारात होत्या. त्यातील अंधश्रद्धा, भाववशता आणि कोरडा कर्मठपणा जोतीरावांना बिलकुल मान्य नव्हता. त्यापायी घालवलेला वेळ आणि द्रव्यसामग्री हा अनाठायी खर्च होय, असे त्यांचे मत होते. निर्मिकाने यच्चयावत पदार्थ मानवांच्या उपभोगासाठी तयार केले आहेत. त्यांचा यथोचित विनियोग न करता ते ईश्वराला अर्पण करण्यात शहाणपणा नाही. सध्याच्या उद्योगप्रधान युगात वेळ आणि कार्यशक्ती यांचे महत्त्व आपण ओळखले पाहिजे; त्यांचा अपव्यय कटाक्षाने टाळला पाहिजे अशी जोतीरावांची विचारसरणी होती. या काळात बेंथॅम आणि जेम्स मिल यांच्या उपयुक्ततावादाचा येथील अनेक समाजचिंतकांवर प्रभाव पडला होता. जोतीरावांनी आपल्या ईश्वरोपासनेच्या पद्धतीत उपयुक्ततावादाचा आशय ओतला आहे. ईश्वराला कशाचीच गरज नाही. एकदा थोडा वेळ तन्मय-तेने त्याची प्रार्थना केली; आणि सर्वकाळ त्याच्या पवित्र इच्छेचे स्मरण ठेवले म्हणजे झाले. त्याला काही अर्पण करण्याची किंवा त्याच्या आराधनेत तासन्‌तास घालवण्याची मुळीच आवश्यकता नाही. आपली कृती ही कुणाच्या तरी उपयोगी पडणारी असावी. स्वतःच्या श्रमाने आपल्या कुटुंबाचा योगक्षेम चालवणे आणि उरलेल्या वेळात गरजू लोकांना मदत करणे किंवा आपल्या समाजबांधवांच्या कल्याणासाठी झटणे हीच खरी ईश्वरोपासना होय असा जोतीरावांचा दृष्टिकोण होता. म्हणून त्यांनी उत्पादक श्रमाचा वारंवार उदोउदो केला आहे. दुसऱ्याच्या श्रमावर आपला उदरनिर्वाह करणे यासारखा दुसरा करंटेपणा नाही. या भावनेने

"स्त्रीपुरुषें सर्व कष्टकरी व्हावें। कुटुंबा पोसावें। आनंदानें"[६१]

असा आपल्या अनुयायांना त्यांनी उपदेश केला आहे. या दृष्टीनेच त्यांनी संन्यास-वादाचा धिक्कार केला आहे. हा एक प्रकारचा पलायनवाद आहे. ईश्वराच्या जातिसातत्याच्या योजनेला तो विघातक आहे. अशा आपमतलबी सर्वसंगपरित्यागा-मुळे निर्मिकाला संतोष होणार नाही. उलट न्यायबुद्धीने सर्व वस्तूंचा उपभोग घेण्याने त्याच्या इच्छेला मान दिल्यासारखे होणार आहे. म्हणून 'न्यायानें वस्तुंचा उपभोग घ्यावा'[६२] असे त्यांचे आग्रहपूर्वक सांगणे होते.

जोतीरावांनी हिंदू धर्मावरच वारंवार त्वेषाने हत्यार उपसले हे खरे असले, तरी त्यांना इतर धर्मातील उणिवा वा अनिष्ट प्रवृत्ती यांची अजिबात जाण नव्हती असे नाही. बुद्ध, खिस्त व महंमद यांच्या धर्मातील उदात्त तत्त्वांचा त्यांनी महिमा गाइला. पण त्याबरोबरच त्यांच्या अनुयायाच्या संकुचित सांप्रदायिकतेचा व मिथ्या-भिमानाचा त्यांनी निःसंदिग्धपणे निषेध केला आहे. मात्र त्यांची भूमिका ही एखाद्या

वस्तुनिष्ठ दृष्टीच्या व समतोल वृत्तीच्या तत्त्वप्रतिपादकाची नव्हती; तशीच ती इतिहासमीमांसकाचीही नव्हती. त्यांची भूमिका ही संघर्षवादी, क्रियाशील समाज-चिंतकाची होती. येथील शूद्रातिशूद्रांची धार्मिक व सामाजिक गुलामगिरी नष्ट करणे हे त्यांनी आपले जीवितकार्य मानले होते; आणि त्याचा संबंध पदोपदी प्रामुख्याने हिन्दू धर्माशीच येत होता. त्यामुळे बाकीच्या धर्मांतील गुणावगुणांची तपशीलवार चिकित्सा करण्याची त्यांना गरज भासली नाही. मात्र ज्या ज्या वेळी त्यांच्यासंबंधी लिहिण्याचा प्रसंग आला, त्या त्या वेळी त्यांनी आपले मत सडेतोडपणे मांडले आहे.

जोतीरावांनी धर्माचे क्षेत्र हे व्यावसायिक जीवन व सामाजिक व्यवहार यांपासून वेगळे काढले होते. सामाजिक जीवनात निरनिराळ्या धर्मांच्या लोकांना एकोप्याने राहता यावे म्हणून जे नियम घालून द्यावयाचे, जे व्यवस्थापन करावयाचे ते धर्म-निरपेक्ष असले पाहिजे असे त्यांचे मत होते. परंतु सत्याचे निरूपण करताना किंवा सत्यवर्तनाची कलमवार ओळख करून देताना त्यांनी त्यात अनेक सामाजिक प्रश्नांचा अंतर्भाव केला आहे. इतकेच नव्हे तर मनुष्याचे समग्र जीवन धर्ममय बनले पाहिजे असा त्यांच्या एकंदर विवेचनाचा सूर आहे. वरवर पाहता यात विसंगती आहे असे वाटण्याचा संभव आहे. परंतु जरा बारकाईने विचार केला, तर त्यात तशी विसंगती नाही असे दिसून येईल. जोतीरावांनी ज्याची सामाजिक जीवना-पासून फारकत केली, तो धर्म म्हणजे हिन्दू, मुसलमान, खिरस्ती, बौद्ध यांसारखा विशिष्ट सांप्रदायिक धर्म होय. उलट विशुद्ध धर्मभावना मानवी जीवनात ओतप्रोत भरून राहिली पाहिजे असे जेव्हा ते म्हणतात, तेव्हा त्यांच्या डोळ्यांसमोर विश्वधर्म असतो; सार्वजनिक सत्यधर्म असतो. त्यात धर्मग्रंथ, धर्मसंस्था, रूढी, परंपरा यांचे निरपवाद प्रामाण्य मान्य केलेले नाही इतर लौकिक गोष्टींप्रमाणेच चिकित्सक दृष्टीने त्यांचे परिशीलन करून त्यांत ग्राह्य कोणते आणि अग्राह्य किती ते ठरवले पाहिजे. लौकिक जीवनातील हिताहित, कार्याकार्य, सत्यासत्य यांचा निर्णय भोव-तालची परिस्थिती लक्षात घेऊन तर्कबुद्धी व सदसद्विवेकबुद्धी यांच्या साह्याने स्वतंत्रपणे केला पाहिजे. मात्र हा निर्णय ईश्वरी योजनेशी सुसंगत असला पाहिजे; म्हणजेच सत्य, न्याय, नीती, समता व बंधुभाव या तत्त्वांना धरून असला पाहिजे अशी जोतीरावांची विचारसरणी होती. धर्मनिरपेक्ष इहवाद आणि ईश्वरनिष्ठ सत्यधर्म यांत सुसंवाद निर्माण करण्याचा त्यांचा दृष्टिकोण होता; आणि त्या दिशेने ते सतत प्रयत्नशील राहिले.

## संदर्भ व टीपा

१. ज्ञानोदयाचीं पहिलीं शंभर वर्षें, पृ. १००
२. समग्र वाङ्मय, पृ ९२, २६५
३. समग्र वाङ्मय, पृ. ४६१
४. समग्र वाङ्मय, पृ. ३५८
५. समग्र वाङ्मय, पृ. ४००, ४०४
६. समग्र वाङ्मय पृ. ३५४
७. समग्र वाङ्मय, पृ. ४४८, ४४७
८. समग्र वाङ्मय, पृ. ४५५
९. समग्र वाङ्मय, पृ. ४८२
१०. भगवद्गीता, पृ. ४–८
११. समग्र वाङ्मय, पृ. ४८३
१२. समग्र वाङ्मय पृ. ३५७
१३. समग्र वाङ्मय, पृ. ३५६
१४. समग्र वाङ्मय, पृ. ४४७
१५. समग्र वाङ्मय, पृ. १२६
१६. समग्र वाङ्मय, पृ. ३८२
१७. समग्र वाङ्मय, पृ. ४७१
१८. तुकाराम–गाथा, ९३
१९. समग्र वाङ्मय, पृ १५०
२०. समग्र वाङ्मय, पृ. ४७८
२१. समग्र वाङ्मय, पृ. ४७६
२२. समग्र वाङ्मय, पृ. ४८२
२३. समग्र वाङ्मय, पृ. ४८२
२४. समग्र वाङ्मय, पृ. २५१
२५. समग्र वाङ्मय, पृ. ३५८
२६. समग्र वाङ्मय, पृ. ४६२
२७. समग्र वाङ्मय, पृ. ३६४
२८. समग्र वाङ्मय, पृ. ३६०
२९. समग्र वाङ्मय, पृ. ३७१
३०. आगरकर–निबंधसंग्रह, (फडतरे) ३–१५०

३१. पुरोगामी सत्यशोधक, व. ३, अं. १, पृ. ५१–५२
३२. समग्र वाङ्मय, पृ. ४३३
३३. " I consider myself in the hands of my Creator, that he will dispose of me after this life consistently with his justice and goodness. I leave all these matters to him as my Creator and friend, and I hold it to be presumption in man to make an article of faith as to what the Creator will do with us hereafter. "—The Age of Reason, p. 123.
३४. समग्र वाङ्मय, पृ. ३५१
३५. समग्र वाङ्मय, पृ. ४९७
३६. समग्र वाङ्मय, पृ. ४५०, ४४७, ४४९
३७. समग्र वाङ्मय, पृ. ४५९
३८. समग्र वाङ्मय, पृ. ३८५
३९. समग्र वाङ्मय, पृ. ३६३
४०. समग्र वाङ्मय, पृ. ४५९
४१. समग्र वाङ्मय, पृ. ४१४
४२. समग्र वाङ्मय, पृ. ५४
४३. समग्र वाङ्मय, पृ. ३५३
४४. समग्र वाङ्मय, पृ. ४१५
४५. समग्र वाङ्मय, पृ. ४१५
४६. समग्र वाङ्मय, पृ. ३९५
४७. समग्र वाङ्मय, पृ. ४६४
४८. समग्र वाङ्मय, पृ. ४६५
४९. समग्र वाङ्मय, पृ. ४६६
५०. समग्र वाङ्मय, पृ. ४५०
५१. समग्र वाङ्मय, पृ. ४४१
५२. समग्र वाङ्मय, पृ. ४७२
५३. Political Writings, p. 35
५४. समग्र वाङ्मय, पृ. ४१७
५५. समग्र वाङ्मय, पृ. ४५८
५६. समग्र वाङ्मय, पृ. ३५६
५७. समग्र वाङ्मय, पृ. ३७७

६

# सामाजिक न्याय आणि समता

जोतीरावांच्या समग्र जीवनसरणीत त्यांची ईश्वरनिष्ठा ओतप्रोत भरून राहिली होती. तेव्हा त्यांच्या सामाजिक तत्त्वाचिंतनाचा त्यांच्या धर्मभावनेशी जिव्हाळयाचा ऋणानुबंध असल्यास काही नवल नाही. त्यांच्या सत्यधर्मात 'मानवतेची प्रतिष्ठा' या तत्त्वाला अत्यंत महत्त्वाचे स्थान आहे. इतकेच नव्हे तर निर्मिकाच्या योजनेशी संवाद साधण्याचा, त्याच्या इच्छेला मूर्त स्वरूप देण्याचा अधिकार व क्षमता फक्त माणसांच्याच ठिकाणी आहे; आणि त्यांचा खरोखर सदुपयोग व्हावयाचा असेल, तर त्यासाठी माणसामाणसांच्या संबंधांना सार्वजनिक सत्यधर्माची बैठक मिळवून दिली पाहिजे अशी त्यांची धारणा होती. या दृष्टीने जोतीरावांच्या विचारप्रणालीला 'ईश्वरनिष्ठ मानवतावाद' असे म्हटले, तर ते खचितच अन्वर्थक होईल.

या सृष्टीतील प्राणिमात्रांत मानवप्राणी हा श्रेष्ठ आहे. या श्रेष्ठत्वाचे गमक काय ते सांगताना जोतीरावांनी मनुष्य आणि मनुष्येतर प्राणी यांच्यातील नेमका फरक दाखवून दिला आहे. "निर्मिकाने पशुपक्ष्यादी वगैरे प्राण्यांस एक स्वाभाविक खोड दिली आहे. ती जशीच्या तशीच नेहमी कायम राहून तिच्या योगाने त्यांच्याने आपल्यांमध्ये तिळप्राय सुधारणा करून घेता येत नाही. परंतु निर्मिकाने मानव-प्राण्यांस सारासारविचार करण्याची बुद्धी दिली आहे, तिच्या योगाने कालेकरून ते आपल्यांमध्ये जास्ती जास्ती सुधारणा करू शकतात. हजारो वर्षांपूर्वी पाकोळी नावाच्या पक्ष्यांनी बांधलेली कोठी व त्यांनी हल्ली नवीन बांधलेली कोठी यांमध्ये तिलप्राय सुधारणा झालेली दिसून येत नाही. यावरून निर्मिकाने पशुपक्ष्यादी इतर प्राण्यांस मानवासारखी सारासारविचार करण्याची बुद्धी मुळीच दिली नाही. परंतु त्याचप्रमाणे हजारो वर्षांच्या पूर्वी झाडांच्या ढोलीत राहून निर्वाह करणारे व गुडघे-

मेटी येऊन हात टेकून जनावरांसारखे पाणी पिणारे मानवप्राणी व हल्लीच्या सुधारलेल्या काळात मोठमोठ्या हवेल्यांत वास करून लोडाशी टेकून रुप्याच्या पंचपात्रीने पाणी पिऊन मजा मारीत असलेले मानवप्राणी, या दोहोंची साम्यता होऊ शकेल काय? यावरून निर्मिकाने मानवप्राण्यांस जी काही अत्युत्तम सारासारविचार करण्याची बुद्धी दिली आहे, तिजपासून त्याला एकंदर सर्व कामी दिवसानुदिवस जास्ती सुधारणा करता येईल." [१] प्राथमिक वन्यावस्थेपासून माणसांच्या जीवनक्रमात कसकशी सुधारणा होत गेली; निर्वाहसाधनांच्या बाबतीत जंगलातील कंदमुळे व फळे, शिकार, शेतीचा शोध व प्रसार अशा तऱ्हेची स्थित्यंतरे कशी घडून आली; पुढे कुटुंब, गावगाडा, राज्यशासन यांसारख्या संस्था कशा उदयास आल्या याचे स्थूलमानाने व अगदी त्रोटक स्वरूपात का होईना जोतीरावांनी आपल्या 'शेतकऱ्याचा असूड' या ग्रंथात दिग्दर्शन केले आहे. ते बहुतांशी वर्णनात्मक आहे. त्यात विश्लेषणाचा भाग अत्यल्प आहे हे उघड आहे. पण त्याबरोबर मानवी जीवन हळूहळू विकसित होत गेले आहे आणि हा विकासही निखळ एकजिनसी नाही; त्याला चांगली व वाईट अशा दोन्ही बाजू आहेत, याची त्यांना कल्पना आली होती यात शंका नाही. मनुष्याच्या जिवंत जाणिवांत आणि गतिशील जीवनप्रवाहात नेहमीच द्वंद्वात्मकता असते; अंतर्विरोध असतो. हजारो वर्षांच्या कालावधीत मनुष्यसमाजाच्या परिस्थितीत कितीतरी सुधारणा घडून आली; त्याच्या भौतिक व सांस्कृतिक जीवनाची पातळी पुष्कळच उंचावली. परंतु हे घडत असताना त्यात अनेक उद्वेगजनक व अनर्थकारक प्रवृत्तींनी आपले व्यवस्थित बस्तान बसवले आहे. जसजसा मनुष्याला आपल्या सामर्थ्याचा प्रत्यय येऊ लागला, तशतशा त्याच्या गरजा वाढत चालल्या. लोकसंख्येत उत्तरोत्तर भर पडतच होती. ज्याने त्याने स्वतः कष्ट करून आपला उदरनिर्वाह करण्याच्या प्रथेची पकड सैल होत गेली; आणि आपल्या स्वार्थासाठी इतरांना बळजबरीने राबवून घेण्याची व स्वतः ऐदीपणाने बसून खाण्याची प्रवृत्ती निर्माण झाली निसर्गाच्या सान्निध्यात उदयास आलेली, समता व बंधुभाव यावर आधारलेली आदिम जीवनपद्धती लुप्त झाली. निरनिराळ्या जमातींत व समाजाच्या वेगवेगळ्या घटकांत झगडे होऊ लागले; तंटेबखेडे माजले. अन्याय, जुलूम-जबरदस्ती, विषमता यांचा अंमल सुरू झाला. सामाजिक जीवनात मालक व गुलाम, शोषक व शोषित, ऐतखाऊ व कष्टकरी असे दुभगलेपण आले. हे सर्व लक्षात घेऊन जोतीरावांनी "निर्मिकाने मानवप्राण्यास सारासारविचार करण्याची बुद्धी देऊन त्यांस सर्वांमध्ये श्रेष्ठ केले असून त्यांनी त्या अमोल्य पवित्र बुद्धीचे काहीच सार्थक केले नाही." [२] अशी आपली प्रतिक्रिया व्यक्त केली आहे. साहजिकच ही दुभंगलेपणाची स्थिती बदलून, पण झालेल्या सुधारणेचा फायदा न गमावता माणसामाणसांचे संबंध पुन्हा

समतेच्या व बंधुभावाच्या पायावर कसे उभारता येतील याविषयीचे विचार त्यांच्या मनात रात्रंदिवस घोळत राहिले.

## जन्मसिद्ध मानवी अधिकार

मानवाचे नैसर्गिक अधिकार हा महात्मा फुले यांच्या सामाजिक विचारांचा केंद्रबिंदू आहे. मनुष्यमात्राच्या जन्मसिद्ध अधिकारांची ही कल्पना नेपोलियनच्या स्वाऱ्यांनंतर युरोपात सर्वत्र प्रसृत झाली. माणसांच्या नागरिक हक्कांचा उगम हा त्यांच्या नैसर्गिक हक्कांतून झालेला आहे असे काही आधुनिक पाश्चात्त्य तत्त्वचिंतकांचे मत होते. इंग्रजी शिक्षणाच्या द्वारे या नव्या कल्पना भारतीय विचारवंतांपर्यंत येऊन पोहोचल्या. प्रॉटेस्टंट पंथातील ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या सहवासातून आणि विशेषतः थॉमस पेन यांच्या ग्रंथांमधून जोतीरावांना मानवाच्या या जन्मसिद्ध अधिकारांचे महत्त्व उमगले. पेन यांचा ‘ Rights of Man ’ हा ग्रंथ त्यांनी वाचला होताच. हिंदू धर्मशास्त्रात वेगवेगळ्या जातींच्या विशिष्ट अधिकारांचे व विहित कर्तव्यांचे निरूपण आहे. परंतु मनुष्यमात्राचे जन्मसिद्ध अधिकार व निरनिराळ्या जातींचे परस्परसंबंध यांचा येथे तात्त्विक पातळीवरून कधी फारसा ऊहापोह झाला नाही. शिवाय शूद्रातिशूद्रांना विद्यार्जनाची मोकळीक नव्हती. त्यामुळे त्यांना आपल्या नैसर्गिक मानवी अधिकारांची जाणीव होण्याचा यत्किंचितही संभव नव्हता. तेव्हा जोतीरावांना मानवी अधिकारांच्या या आधुनिक संकल्पनेचे खास आकर्षण वाटले असले, तर त्यात काही नवल नाही. “ Man is born free and everywhere he is in chains.” [3] मनुष्य जन्मतः स्वतंत्र असतो, पण नंतर तो सर्वत्र कृत्रिम बंधनांनी जखडला जातो हे फ्रेंच तत्त्वचिंतक रूसो याचे सूत्रवचन सर्वश्रुत आहे. वास्तविक पाहता प्रत्येक मनुष्याला निसर्गतःच काही अधिकार मिळालेले असतात. पण प्रत्यक्षात फारच थोड्या लोकांना ते उपभोगता येतात. कारण सामाजिक संस्था, रूढी, शिष्टाचार यांच्या पाशात बहुसंख्य लोक गुंतून पडलेले असतात. त्यांतून त्यांना मुक्त केल्याशिवाय मानवी समाजाला सुखस्वास्थ्य लाभणार नाही; त्याची सर्वांगीण प्रगती होणार नाही अशी पाश्चात्त्य देशांतील उदारमतवादी विचारवंतांची धारणा होती. त्यांच्या या विचारसरणीशी जोतीराव पूर्णपणे समरस झाले होते. त्यामुळे त्यांच्या स्वतःच्या अनुभवांतून त्यांना जी एक मूलग्राही दृष्टी प्राप्त झाली होती, तिला व्यापक तत्त्वविचारांची जोड मिळाली आणि ती अधिकाधिक सखोल व सर्वस्पर्शी बनत गेली. ह्या आधुनिक तत्त्वविचारांचे पडसाद त्यांच्या मतप्रतिपादनात ठिकठिकाणी उमटले आहेत.

मनुष्य हा मुळात सत्प्रवृत्त आहे. परंतु निसर्गाशी झगडताना आपण अखेर

निसर्गाचेच अपत्य आहोत याचे त्याला पुष्कळदा भान राहत नाही. या झगड्यात यशस्वी होण्यासाठी तो जे संस्थात्मक जीवन उभे करतो, त्यातील अस्वाभाविकता, अंतर्विरोध आणि गुंतागुंत यांमुळे त्याची दिशाभूल होते. तो चुकीच्या मार्गाला लागतो आणि मग त्याच्या स्वभावातील निरागसता नष्ट होते अशी जोतीरावांची समजूत होती. म्हणूनच मूळच्या आदिम अवस्थेतील लोकांचे वर्णन करताना त्यांनी त्यांना 'पवित्र' हे विशेषण लावले आहे.[४] ख्रिस्ती, मुसलमान, महार, ब्राह्मण अशा भेदभावनेचा ओझरता स्पर्शही त्या आदिम अवस्थेतील लोकांच्या मनाला कधी झाला नव्हता. ते एकमेकांना केवळ माणूस या नात्यानेच ओळखत होते. ही रानटी अवस्था मोठी स्पृहणीय होती असे नाही. परंतु निसर्गाशी द्रोह करणारी, व आपल्याच देशातील दीनदुबळ्यांना गुलाम बनविणारी आधुनिक जीवनपद्धती ही त्या रानटी अवस्थेहूनही अधिक घातक आहे असे ते मानत होते. प्रगती अवश्य हवी; पण त्यापायी माणुसकीचा बळी दिला जाता कामा नये यावर जोतीरावांनी प्रामुख्याने भर दिला आहे. मानवताधर्माचे ते एकनिष्ठ उपासक होते. त्या दृष्टीनेच त्यांनी फ्रेंच राज्यक्रांतीला प्रेरक व प्रोत्साहक ठरलेल्या स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तत्त्वत्रयीचा वारंवार उद्घोष केला आहे. " आपण सर्वांच्या निर्मिकाने एकंदर सर्व प्राणिमात्रांस उत्पन्न करतेवेळी मनुष्यास जन्मतः स्वतंत्र प्राणी निर्माण केला आहे. आणि त्यास आपआपसांत सारखे हक्काचा उपभोग घेण्यास समर्थ केला आहे. मनुष्याला स्वतंत्रता असणे ही एक मोठी जरूरीची गोष्ट आहे. जेव्हा मनुष्य स्वतंत्र असतो, तेव्हा त्यास आपले मनात उद्‌भवलेले विचार स्पष्ट रीतीने इतर लोकांस बोलून अथवा लिहून दाखविता येतात. तेच विचार त्यास स्वतंत्रता नसल्यामुळे मोठे महत्त्वाचे असून लोकांचे हितावह का असेनात, तथापि ते त्यास दुसरे कोणास कळविता येत नाहीत; आणि असे झाले म्हणजे काही काळाने ते सर्व विचार लयास जातात. त्याचप्रमाणे मनुष्य स्वतंत्र असल्यापासून तो आपले, सर्व मनुष्यमात्रांस जे सर्वसाधारण हक्क, सर्व जगाचा जो नियंता व सर्वसाक्षी परमेश्वर त्याने दिलेले असून केवळ स्वहिताकडेस ज्यांचे लक्ष असे कृत्रिमी लोकांनी लपवून ठेविले, तर त्यांपासून मागून घेण्यास कधी मागे सरणार नाही."[५] म्हणून स्वातंत्र्य हा व्यक्तिमात्राचा मूलभूत हक्क आहे. तो कोणत्याही एका क्षेत्रापुरता मर्यादित असणे श्रेयस्कर नाही. सामाजिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांतील हक्कांसंबंधीचे आपले विचार व मते प्रत्येकाला निर्बंधपणे व्यक्त करता आली पाहिजेत. यासाठी त्याला भाषणस्वातंत्र्य, लेखनस्वातंत्र्य, प्रकाशनस्वातंत्र्य यांचा निःशंकपणे उपभोग घेता आला पाहिजे. मात्र हे हक्क बजावताना त्यामुळे दुसऱ्या कुणाचेही नुकसान होत नाही किंवा त्याच्या हक्कांची पायमल्ली होत नाही याची प्रत्येकाने काळजी घेतली पाहिजे. स्वातंत्र्य, समता व बंधुभाव ही तीन अगदी स्वतंत्र व स्वयंपूर्ण

मूल्ये नाहीत; तर ती आपल्या प्रयोजनाच्या परिपूर्तीसाठी एकमेकांवर अवलंबून आहेत म्हणून ती परस्परपूरक ठरतील अशी दक्षता घेण्याची आवश्यकता आहे. जोतीराव हे एकेश्वरवादी असल्याने मानवाचे नैसर्गिक अधिकार हे ईश्वरदत्त आहेत अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. ईश्वर हा समदृष्टी आहे. त्याने "एकंदर सर्व स्त्री-पुरुषांस एकंदर सर्व मानवी अधिकारांचे मुख्य धनी केले आहेत."[६] म्हणून स्वातंत्र्याइतकीच समतातत्त्वाची बूज आपण राखली पाहिजे. या दोन तत्त्वांत विसंवाद किंवा विरोध उत्पन्न होऊ नये म्हणून सर्वांनीच जागरूक राहिले पाहिजे. आपल्या सामाजिक व्यवहारात संधिसमानतेचे तत्त्व आपण जाणीवपूर्वक अवलंबिले पाहिजे. समाजाच्या कोणत्याही एका बलिष्ठ घटकाने दुसऱ्या दुर्बळ घटकांवर जुलूम-जबरदस्ती करून त्यांचे स्वातंत्र्य हिरावून घेता कामा नये, त्यांच्या स्वाभाविक विकासाचा मार्ग रोखून धरता कामा नये. समाजात कुणाही व्यक्तीला वा गटाला अमर्याद, अनिर्बंध स्वातंत्र्य असत नाही. हक्कांच्या संकल्पनेत जबाबदारीचे तत्त्व अंतर्भूत आहे. तेव्हा स्वातंत्र्यप्रिय मनुष्याने नेहमीच विवेकाची कास धरली पाहिजे; स्वयंशासित बनण्याचा प्रयत्न केला पाहिजे. "आपल्यावरून जग ओळखावें । सर्वा निववावें । संसारांत "[७] अशी आत्मौपम्यबुद्धी त्याने बाळगली पाहिजे. समतावादी लोकांचा विरोध अर्थातच मानवनिर्मित विषमतेला आहे. बुद्धिमत्ता, सामर्थ्य, शरीरसौष्ठव, संवेदनक्षमता यांमुळे निर्माण होणारी नैसर्गिक विषमता आपण टाळू शकत नाही. परंतु याही बाबतीत निसर्गाची ज्यांच्यावर अवकृपा झाली आहे; त्यांच्याविषयी सामंजस्याचा व सहानुभूतीचा दृष्टिकोण ठेवून आपण त्यांचे दुःख कमी करू शकतो. सामाजिक जीवनात अशा तऱ्हेचे वातावरण सदोदित राहावे म्हणून स्वातंत्र्य व समता यांच्याबरोबर बंधुभावाचीही जोपासना करण्याची खास गरज आहे. बंधुभावामुळे माणसा-माणसांच्या संबंधांत कौटुंबिक जिव्हाळा निर्माण होण्याचा अधिक संभव आहे.

> "ख्रिस्त महंमद मांग ब्राह्मणासी । धरावे पोटाशीं । बंधूपरी ॥
> मानव भावंडें सर्व एकसहा । त्याजमध्यें आहां । तुम्ही सर्व "
> "मानवांचा जो कां अन्याय न करी । भावंडांचे परी । लेखी सर्वा
> रंजले गांजले अनाथा पोसावें । प्रीतीनें वागावें । बंधूपरी "[८]

या अर्थाची कितीतरी वचने जोतीरावांच्या वाङ्मयात आढळतात. ही तिन्ही तत्त्वे आपल्या जीवनसरणीत एकजीव व्हावीत, त्यांचा स्वीकार केवळ बौद्धिक पातळीवरून न होता ती माणसाच्या मनोविश्वाचा एक अविभाज्य भाग होऊन राहावीत अशी जोतीरावांची अपेक्षा होती. म्हणून त्यांनी विश्वबंधुत्वाच्या भावनेचा आवर्जून पुरस्कार केला आहे. ह्या तत्त्वत्रयीबरोबर त्यांनी न्यायनिष्ठेचाही आग्रह धरला आहे.

निरनिराळ्या माणसांशी वागताना, इतकेच नव्हे तर कोणत्याही गोष्टीचा उपभोग घेताना आपली न्यायबुद्धी आपण जागृत ठेवली पाहिजे असे ते वारंवार निक्षून सांगतात. आपल्या परंपरागत धार्मिक व सामाजिक तत्त्वनिरूपणात समबुद्धी, बंधुभाव यांना स्थान नाही असे नाही. परंतु सामाजिक न्यायाची कल्पना मात्र त्यात प्रभावीपणे मांडलेली कुठे दिसून येत नाही. उलट जोतीरावांनी आपल्या मतप्रणालीत या कल्पनेला बुद्धिपुरःसर अत्युच्च स्थान दिले आहे. शिवाय स्वतंत्रतेप्रमाणेच शरीर व मालमत्ता यांचे संरक्षण आणि जुलमापासून बचाव यांची मनुष्यमात्राला समाजाकडून हमी मिळाली पाहिजे. तो त्याचा एक जन्मसिद्ध मानवी अधिकार आहे. फ्रेंच राज्यक्रांतीनंतर फ्रान्सच्या राष्ट्रीय सभेने मानवाच्या व नागरिकांच्या हक्कांचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यातील काही कलमे जोतीरावांच्या या प्रतिपादनाशी जुळणारी आहेत. थॉमस पेन यांनी आपल्या ‘ Rights of Man ’ या ग्रंथात हा जाहीरनामा उद्धृत केला आहे. तेव्हा तो जोतीरावांच्या पाहण्यात आला असेलच. जोतीरावांनी मानवांच्या जन्मसिद्ध हक्कांचे सर्वसामान्य विवेचन केले. पण एवढेच करून ते थांबले नाहीत, तर त्यांनी या हक्कांच्या आड येणाऱ्या हिंदू समाजातील वर्णव्यवस्था, जातिभेद, स्त्रीविषयक दृष्टिकोण यांसारख्या गोष्टींवर टीकेची झोड उठवली.

## वर्णव्यवस्था

वर्णव्यवस्था हे हिंदू समाजाचे एक व्यवच्छेदक लक्षण आहे. या व्यवस्थेत निरनिराळ्या लोकांची जन्मतःच गुणकर्मानुसार विभागणी होते. “ चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ” [१] चातुर्वर्ण्य मी म्हणजे साक्षात ईश्वराने गुणकर्मविभागानुसार निर्माण केले आहे. हे भगवद्गीतेतील प्रतिपादन सुप्रसिद्ध आहे. येथे गुण म्हणजे सत्त्व, रज, तम हे त्रिगुण. सात्त्विक वृत्तीचे पुण्यशील लोक ब्राह्मण कुटुंबात जन्मास येतात. त्यांना शम, दम, तप, शुचिर्भूतपणा इत्यादी कर्मे नेमून दिली आहेत. सत्त्वमिश्रित रजोगुणाचे प्राबल्य असलेले लोक क्षत्रिय कुळात जन्म घेतात. शौर्य, तेज, दान, प्रभुत्वशक्ती ही त्यांची नियत-कर्मे होत. तमोगुणमिश्रित राजस वृत्तीचे लोक वैश्याच्या जन्माला येतात. शेती, गोरक्षण, व्यापार ही त्यांची स्वभावसिद्ध कर्मे म्हणून सांगितली आहेत. रजोगुणमिश्रित तमोगुणी मनुष्य शूद्रवर्णात जन्मतो; आणि त्रैवर्णिकांची सेवाचाकरी करणे हेच त्याचे कर्तव्यकर्म ठरते. अशा रीतीने गुणानुसार वर्णविहित कर्मांची विभागणी होते. गीतेतील गुणकर्मविभागाचा हाच इत्यर्थ आहे. ही वर्णव्यवस्था ईश्वरनिर्मित असल्याने शाश्वत, कल्याणप्रद व अपरिवर्तनीय आहे अशी जुन्या सनातनी हिंदूंची समजूत आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण जगाचे आदिकारण जो विराट पुरुष त्याचे मुख, हात, मांड्या व पाय यांपासून उत्पन्न झाले

ही श्रुतिप्रणीत उपपत्ती सर्वांच्या परिचयाची आहे. हे वर्णन रूपकात्मक असले, तरी त्यात उच्चनीच भावाची, अधिकारभेदाची, सामाजिक विषमतेची बीजे आहेत यात शंका नाही. जोतीरावांनी वर्णव्यवस्थेतील या वैगुण्यावर घणाघाती प्रहार केले आहेत. आधुनिक पद्धतीने विचार करणारे काही लोक वर्णव्यवस्था ही जन्मावर अवलंबून नसून त्या त्या माणसाच्या ठिकाणी आढळून येणाऱ्या गुणांवर अवलंबून आहे असे प्रतिपादन करतात. परंतु मनुयाज्ञवल्क्यादी स्मृतिकारांनी वर्णविभाग जन्मसिद्ध आहे; तो जन्मानंतर व्यक्तीच्या ठिकाणी दिसून येणाऱ्या गुणकर्मांवर अवलंबून नाही असे निःसंदिग्धपणे म्हटले आहे.

मानवसमाजात कृत्रिमतेने असे कायमचे बंदिस्त विभाग पाडणारी ही व्यवस्था अन्यायमूलक व पक्षपाती आहे, असे जोतीरावांना वाटत होते. ती ईश्वरनिर्मित आहे हा दावा असत्य व फसवेगिरीचा आहे अशी त्यांची खात्री होती. म्हणून ज्या धर्मग्रंथांनी या कल्पनेचा उच्चरवाने प्रसार केला, त्यातील मतलबीपणा उघडकीस आणण्याचा त्यांनी कसून प्रयत्न केला. ह्या ग्रंथांत त्यांच्या कर्त्यांनी असे लिहून ठेवले आहे की "शूद्रांस ईश्वराचा उत्पन्न करण्याचा हेतू इतकाच आहे की, त्यांनी सदासर्वदा भट लोकांच्या सेवेत तत्पर असावे व जेणेकरून त्यांची मर्जी खूष राहील असे करावे; म्हणजे ते ईश्वराला पावन होऊन त्यांचे देहाचे व जन्मास येण्याचे सार्थक झाले. आता कोणी या ग्रंथांविषयी थोडासा विचार केला असता ते कितपत खरे आहेत व ते ईश्वरापासून आले असावे किंवा कसे, हे लागलीच कळून येईल. अशा ग्रंथांपासून सर्वशक्तिमान, सर्व जगाचा व त्यातील सर्व वस्तूंचा उत्पन्नकर्ता जो परमेश्वर त्याच्या समदृष्टीला मोठे गौणत्व आणले "[१०] आहे असे जोतीरावांचे मतप्रतिपादन आहे. वर्णव्यवस्थेकडे ते केवळ इहवादी विवेकदृष्टीने बघत होते. आर्य लोक बाहेरून या देशात आले; आणि येथील मूळच्या रहिवाश्यांना जिंकून त्यांनी त्यांना शतकानुशतके गुलामगिरीत डांबून ठेवले. आर्यांचा समाज हा वास्तविक त्रैवर्णिकांचा होता. नंतर जिंकलेल्या येथील लोकांना आपले दास बनवून त्यांनी त्यांचा चौथा 'शूद्र' वर्ण कल्पिला; आणि चातुर्वर्ण्याची इमारत उभी केली. "इराणातून आलेल्या आर्य टोळ्यांपैकी काही आर्य पशुयज्ञ करण्याचे कामी चांगले वाकबगार असत; वा धर्मसंबंधी बाकीचे सर्व विधी चालविणारांस ब्राह्मण म्हणत; काही आर्य शिपायांचा धंदा करीत असत त्यांस क्षत्रिय म्हणत. आणि काही आर्य गुरेमेंढरे पाळण्याचा धंदा करीत त्यांस वैश्य म्हणत. त्याचप्रमाणे या बलिस्थानातील एकंदर सर्व मूळच्या रहिवासी लोकांस क्षत्रिय म्हणत असत. प्रथम आर्य ब्राह्मण, आर्य क्षत्रिय आणि आर्य वैश्य अशा तीन प्रकारच्या लोकांनी एके ठिकाणी जमून वारंवार या बलिस्थानात स्वाऱ्या केल्या; तेव्हा ( त्यांनी ) येथील एकंदर सर्व बलिस्थानातील रहिवासी लोकांचे

क्षेत्रावरील स्वामित्व नष्ट केले. नंतर हे तीनही प्रकारचे इराणी लोक एकविचाराने आपणा सर्वांस फक्त ब्राह्मण असे म्हणवून घेऊ लागले व बलिस्थानातील एकंदर सर्व पदच्युत केलेल्या क्षेत्रस्थांस धिक्काराने शूद्रादी अतिशूद्र म्हणू लागले." [११] तेव्हा सध्या हिंदुस्थानात ब्राह्मण व शूद्र असे दोनच वर्ण उरले आहेत ही आर्य लोकांची समजूत खरी आहे असे आपले मत जोतीरावांनी व्यक्त केले आहे.

परंपरागत जन्मसिद्ध वर्णव्यवस्थेवर जोतीरावांचे अनेक आक्षेप होते. ब्राह्मण व शूद्र यांच्यातील सेव्यसेवकभाव, धनी-दाससंबंध सार्वजनिक सत्यधर्मातील बंधुभावाच्या तत्त्वाला छेद देणारा आहे. म्हणून "आर्य कसे धनी, शूद्र कां हो दास ? । शोधा कृत्रीमास वेळ हीच" [१२] असे ते सत्यधर्मी लोकांना बजावतात. ब्राह्मण हे भूदेव, सर्व वर्णांमध्ये श्रेष्ठ, 'ब्राह्मणः सर्वत्र पूज्यः–' असे म्हणून हिंदू धर्मग्रंथांनी ब्राह्मणांचे अतोनात स्तोम माजवले आहे. "शमोदमस्तपःशौचं क्षांतिरार्जवमेव च । ज्ञानविज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम्" हे "आर्य धर्मातील गीतेत आर्य ब्राह्मणांचे स्वाभाविक गुणांचे केलेले वर्णन, केवळ अज्ञानी जनांच्या डोळयांत माती टाकून त्यांस फसविण्याकरिता ते भारुड रचिले असावे" [१३] याबाबत जोतीरावांच्या मनात मुळीच संदेह नव्हता. ब्राह्मणांचे जन्मजात श्रेष्ठत्व हा केवळ हिंदू धर्मशास्त्रकारांच्या कल्पनेचा खेळ आहे. ब्राह्मण आईबापांची अपत्ये ही हमखास सात्त्विक वृत्तीची असतात असे कुठे दिसून येत नाही. चातुर्वर्ण्यातील गुणकर्मविभागात जे आनुवंशिकतेचे तत्त्व गृहीत धरलेले आहे, ते बुद्धी, गुण व पराक्रम या तिन्ही बाबतींत लागू पडत नाही. सर्वांची बुद्धी सारखी नसते हे तर खरेच. परंतु एका वर्णाचे सर्व लोक बुद्धिमान आणि दुसऱ्या वर्णाचे सर्वजण बुद्धिमंद असे कधीच आढळत नाही. बुद्धिमत्तेतील हा फरक, ही विषमता व्यक्तिगत असते, समूहगत असत नाही.

"मानव सारिखे निर्मीकें निर्मीले । कमी नाहीं केले । कोणी एक ।।
कमी जास्ती बुद्धी मानवा वोपीली । कोणा नाही दिली । पिढीजादा" [१४]
"निर्मीकें निर्मीले मानव पवित्र । कमी जास्त सूत्र । बुद्धीमध्यें ।।
पिढीजादा बुद्धि नाहीं सर्वांमधीं । शोध करा आधीं । पुर्तेपणीं" [१५]

बुद्धीप्रमाणेच गुणसंपदा व कर्तृत्वही वर्णसापेक्ष व पिढीजाद असत नाहीत. उच्चवर्णातील कितीतरी लोक दुराचरणी व व्यसनाधीन असल्याचे आपण पाहतो. उलट खालच्या थरांतील माणसेही योग्य संधी मिळताच सत्प्रवृत्त, महत्त्वाकांक्षी व कर्तबगार निघाल्याची अनेक उदाहरणे दृष्टीस पडतात.

"दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुषं" [१६] ही वेणीसंहारातील कर्णाची उक्ती सर्वश्रुत आहे. जोतीरावांना शूद्रातिशूद्रांच्या अंतःकरणातील न्यूनगंड नाहीसा करावयाचा होता. म्हणून माणसाची बुद्धिमत्ता व कर्तृत्व हे कोणत्या वर्णात वा कुळात

त्याचा जन्म होतो यावर अवलंबून नाही ही गोष्ट त्यांच्या मनावर बिंबवण्याची त्यांनी पराकाष्ठा केली.

"या भूग्रहावरील एकाच मातापितरांपासून एक मुलगा मूर्ख आणि दुसरा मुलगा शहाणा असे विपरीत जन्मतात. तर यावरून मूर्खपणा अथवा शहाणपणा हे पिढीजादा आहेत, असे अनुमान करिता येत नाही. तसेच स्त्रीपुरुषांचा समागम होण्याचे वेळी त्या उभयतांचे कफवातादी दोषात्मक प्रकृतीच्या मानाप्रमाणे व त्या वेळेस त्यांच्या मनावर सत्त्वरजादी त्रिगुणांपैकी ज्या गुणांचे प्राबल्य असते, त्या गुणांच्या महत्त्वप्रमाणाने गर्भपिंडाची धारणा होते. म्हणूनच एका आईबापाचे पोटी अनेक मुले भिन्न प्रकृतीची व स्वभावाची जन्मतात. असे जर न म्हणावे, तर इंग्लंडातील प्रख्यात गृहस्थांपैकी टॉमस पेन व अमेरिकन शेतकऱ्यांपैकी जॉर्ज वॉशिंग्टन या उभयतांनी शहाणपणा व शौर्य ही पिढीजादा आहेत म्हणून म्हणणाऱ्या ख्यालीखुशाली राजेरजवाड्यांस आपआपले कृतीने लाजविले असते काय? शिवाय कित्येक अज्ञानी काळे शिपायी केवळ पोटासाठी कोर्टमार्शलचे धाकाने काबूल व इजिप्टातील जहामर्दांशी सामना बांधून लढण्यामध्ये मर्दुमगिरी दाखवितात व त्याचप्रमाणे कित्येक अमेरिकेतील समंजस विद्वानांपैकी पारकर व मेरियन सारख्या कित्येकांनी जन्मतः केवळ शेतकरी असूनही स्वदेशासाठी परशत्रूशी नेट धरून लढण्यामध्ये शौर्य दाखविलेली उदाहरणे आपले पुढे अनेक आहेत. यावरून जहांमर्दी अथवा नामर्दी पिढीजादा नसून, ज्याच्या त्याच्या स्वभावजन्य व सांसर्गिक गुणावगुणांवर अवलंबून असते असेच सिद्ध होते. कारण जर हा सिद्धान्त खोटा म्हणावा, तर एकंदर सर्व या भूमंडळावरील जेवढे म्हणून राजेरजवाडे व बादशहा पहावेत त्यांपैकी कोणाचे मूळ पुरुष शिकारी, कोणाचे मेंढके, कोणाचे शेतकरी, कोणाचे मुल्लाने, कोणाचे खिजमतगार, कोणाचे कारकून, कोणाचे बंडखोर, कोणाचे लुटारू व कोणाचे मूळ पुरुष तर हद्दपार झालेले राम्युलस आणि रीमस आढळतात. त्यांतून कोणाचाही मूळ पुरुष पिढीजादा बादशहा अथवा राजा सापडत नाही." [१५]

हिंदू धर्मसंस्थेने शूद्रसमाजावर जर कोणता मोठा अन्याय केला असेल, तर त्यांच्यावर कायमची लादलेली विद्याध्ययनाची बंदी हा होय. त्यामुळे दिवसभर काबाडकष्ट उपसण्यापलीकडे त्यांच्या जीवनाला काही प्रयोजन उरले नाही. इतकेच नव्हे तर ही क्लेशदायक जीवनाची चाकोरी तोडण्याचा विचारदेखील त्यांच्या मनाला शिवू नये अशी या बंदीमुळे हिंदू धर्मशास्त्राने कायमची व्यवस्था करून ठेवली होती. आपल्याच लोकांस स्वतःचे धर्मग्रंथ वाचण्यास मनाई करणारा हिंदू धर्म हा जगातील बहुधा एकमेव धर्म असेल. त्यामुळे या कष्टकरी वर्गाला आपल्या जन्मसिद्ध मानवी हक्कांची कधी जाणीव झाली नाही. अगतिकतेने पिढ्यान्‌पिढ्या

गुलामगिरीचे जीवन ते कंठीत राहिले. या विद्याबंदीचा आणखी एक अनिष्ट परिणाम म्हणजे हिंदू समाजाच्या परंपरेतील ज्ञान व श्रम यांची फारकत हा होय. शूद्र समाजाचे उत्पादनकार्याशी जिव्हाळ्याचे नाते होते. पण विद्याव्यासंगाची व तत्त्वान्वेषणाची संधी व सवय नसल्याने त्यांच्याकडून उत्पादनसाधनांत सुधारणा होऊ शकली नाही. ज्यांच्याकडे विद्येची मक्तेदारी होती, त्यांचा उत्पादनकार्याशी अजिबात संबंध नव्हता. त्यामुळे न्यायव्याकरणवेदान्तातील घटपटाच्या चर्चेतच त्यांनी आपले बुद्धिसर्वस्व खर्च केले. आपल्या येथे अगदी प्राचीन काळ सोडला, तर विज्ञानाची प्रगती न होण्याचे हे एक महत्त्वाचे कारण आहे. शिवाय स्वतः मेहनत न करता धर्माच्या नावाखाली दुसऱ्यांच्या श्रमावर उपजीविका करणारा शास्त्री-पुराणिक-पुरोहितांचा वर्ग येथे प्रतिष्ठितपणे मिरवू लागला होता.

" काय तुझा धर्म । कळूं दे रे वर्म ।
भिक्षा शूद्राची खातोस । कोणता धर्म तुझा खास " [१८]

शूद्राच्या घरचे शिजवलेले अन्न सनातनी ब्राह्मण निषिद्ध मानतात. इतकेच काय पण शूद्राचा चुकून स्पर्श झाला, तरीदेखील ते अन्न व पाणी त्यांना चालत नाही. परंतु शूद्रांच्या श्रमाचे कोरडे अन्नधान्य शिधा म्हणून घेताना त्यांना कमीपणा वाटत नाही. घरभरणीच्या वेळी गावभोजन असले की, ब्राह्मणांची पंगत आधी, आणि ज्यांच्या निढळाच्या घामातून घर बांधले गेले, ते सुतार, गवंडी, बिगारी यांच्या वाट्याला मात्र शिळेपाके अन्न. या प्रथेला अनुलक्षूनच जोतीरावांनी " जळो जळो तुमचें जिणें । उद्योग्या आधीं ताजें खाणें " [१९] असे म्हटले आहे; आणि सोवळ्या-ओवळ्याच्या व उच्चनीचतेच्या ' अमंगल ' कल्पनेचा धिक्कार केला आहे.

## परदेशगमन

हिंदू धर्मशास्त्रकारांनी परदेशगमनाला प्रतिबंध केला होता. त्यामुळे आपल्या देशातील उदमी, कारागीर व व्यापारी यांचे किती नुकसान झाले; आणि एकंदर समाजाची प्रगती कशी खुंटली ते जोतीरावांनी सडेतोडपणे दाखवून दिले आहे. " शूद्रादी अतिशूद्रांवर पुरातन काळी आपले वाडवडिलांनी महत्प्रयासांनी व कपटांनी मिळविलेले वर्चस्व चिरकाळ चालावे, व त्यांनी केवळ घोडा, बैल, वगैरे जनावरांसारखे राबून आपणांस सौख्य द्यावे, अथवा निर्जीव शेते होऊन आपणासाठी जरुरीचे व ऐषारामाचे पदार्थ त्यांनी उत्पन्न करावेत, या इराद्याने अटक नदीचे पलीकडेस हिंदू लोकांपैकी कोणी जाऊ नये, गेले असता तो भ्रष्ट होतो, अशी बाब ब्राह्मण लोकांनी हिंदू धर्मात घुसडली. यापासून ब्राह्मण लोकांचा इष्ट हेतू सिद्धीस गेला; परंतु इतर लोकांचे फारच नुकसान झाले. परकीय लोकांच्या चालचलणुकीचा त्यांस

पडोसा न मिळाल्यामुळे ते खरोखर आपणांस मानवी प्राणी न समजता, केवळ जनावरे समजू लागले आहेत. इतर देशांतील लोकांशी व्यापारधंदा अगदी नाहीसा झाल्याने ते कंगाल होऊन बसले; इतकेच नाही परंतु " आपले देशात सुधारणा करा, आपले देशात सुधारणा करा " अशी जी सुधारलेले ब्राह्मण लोक निदान बाह्यात्कारी हल्ली हकाटी पिटीत आहेत, त्यास कारण त्यांची ही वर जाणविलेली धर्माची बाब कारण झाली असावी हे अगदी निर्विवाद आहे. या कृत्रिमी बाबीमुळे साळी, सुतार वगैरे कारागीर लोकांचे तर अतिशय नुकसान झाले. आणि त्यांस ती पुढे किती भयंकर स्थितीस पोहोचवील, याचा अदमास खऱ्या देशकल्याणेच्छूखेरीज कोणासही लागणार नाही "[२०] वर्णव्यवस्थेने एकंदर समाजावर जे सर्वसामान्य निर्बंध घातले, त्यामुळे देखील मुख्यतः व्यापारी-कारागीर यांचेच किती नुकसान झाले; आणि शूद्रातिशूद्रांवर लादलेल्या खास निर्बंधामुळे तर त्यांच्या मानवी हक्कांवरच कशी गदा आली ते जोतीरावांनी निर्भीडपणे दाखवून दिले आहे.

## जातिभेदाचे थोतांड

हिंदू समाजाचे खास वैशिष्ट्य प्रामुख्याने त्याला आधारभूत असणाऱ्या जातिसंस्थेत आहे. या समाजातील प्रत्येक मनुष्याचा दर्जा, हक्क, कर्तव्ये, आचारधर्म इत्यादी सर्व काही त्याच्या जातीवरून ठरत असे. जातिबहिष्कृत माणसाला हिंदू समाजात अधिकृत स्थान नव्हते. त्यामुळे जनसामान्यांच्या मनात व्यापक सामाजिक जाणिवेपेक्षा जातीची जाणीवच शतकानुशतके अधिक प्रबळ होती. अधिकारभेद, उच्चनीचभाव व वंशपरंपरागत व्यवसाय यांवर जातिसंस्थेची उभारणी झाली होती. तिच्यात बंदिस्तपणा तर होताच, पण विषमताही ओतप्रोत भरून राहिली होती. जात ही वस्तुतः सामाजिक संस्था, परंतु तिला धर्मशास्त्राने दैवी अधिष्ठान मिळवून दिले होते. साहजिकच जातिविषयक कर्तव्यांचे पालन हा धर्माचरणाचा एक भाग होऊन बसला. ईश्वराने निर्माण केलेल्या सृष्टीत रूपांचे, रंगाचे, गुणांचे, प्रवृत्तींचे वैचित्र्य स्वभावसिद्ध आहे. जातिव्यवस्थेतील विषमताही त्याच स्वरूपाची आहे. तिच्याबद्दल कुरकुर करण्यात काय अर्थ ? जातिधर्म हे शाश्वत व सनातन आहेत. ईश्वरी सत्तेने पूर्वकर्मानुसार आपण ज्या जातीत जन्मलो, तिच्यावर धर्मसंस्थेने घातलेले निर्बंध आपण निमूटपणे पाळले पाहिजेत. आपल्या वाट्याला आलेली नित्यनैमित्तिक कर्मे, कितीही हलक्या प्रतीची व कष्टप्रद असली; तरी ती " आगा जेया जें विहित । तें ईश्वराचें मनोगत "[२१] या भावनेने यथासांग पार पाडली पाहिजेत. त्यातच आपले ऐहिक व पारमार्थिक कल्याण आहे अशी समाजाच्या सर्व थरांतील लोकांची धारणा होती. " सर्वस्यैवास्य सर्गस्य धर्मतो ब्राह्मणप्रभुः " ब्राह्मण हा या सर्व सृष्टीचा प्रभू

आहे. “ सर्वस्वं ब्राह्मणस्येदं यत्किंचिज्जगतीगतम् ” या जगामध्ये जेवढे म्हणून धन आहे ते धर्मतः सर्व ब्राह्मणाचेच आहे, “ एकमेव तु शूद्रस्य प्रभुः कर्म समादिशत् । एतेषामेव वर्णानां शुश्रूषामनसूयया ॥ ”[२२] या तीन वर्णांच्या लोकांची शुश्रूषा, त्यांच्या गुणांचे ठायी दोषदृष्टी न ठेवता करणे हे एकच कर्म प्रभूने शूद्रांकरिता सांगितले आहे. “ स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ”[२३] स्वधर्माप्रमाणे वागत असता मरण आले तरी त्यात कल्याण आहे; परंतु दुसऱ्याचा धर्म भयावह होय. यांसारखी कितीतरी शास्त्रवचने सर्वत्र मान्यता पावली होती. त्यामुळे जातिसंस्थेविरुद्ध तात्त्विक व व्यावहारिक अशा दोन्ही पातळींवर येथे फार मोठे प्रभावी आंदोलन उभे राहू शकले नाही. याचा अर्थ या व्यवस्थेतील विषमता कुणाला कधीच खुपली नाही असा नाही. अनेक उदारचरित महात्म्यांनी जातिव्यवस्थेतील भेदभावासंबंधी आपली नाराजी कधी सौम्य, तर कधी कठोर शब्दांत व्यक्त केली आहे. शूद्र व अतिशूद्र समाजातील साधुसंतांना जन्मसिद्ध उच्चनीचभावाचे आघात कित्येकदा अगदी दुःसह होत. तुकाराम, चोखा मेळा यांच्यासारखे सत्त्वशील संत आपल्या यातिहीनत्वाचा जेव्हा उल्लेख करतात, तेव्हा त्यांतून त्यांच्या व्यथित अंतःकरणाची साक्ष पटल्याखेरीज राहात नाही. या व्यवस्थेतील भेदभावना त्यांना त्याज्य वाटत होती. परंतु जात आणि उदरनिर्वाहाचा व्यवसाय यांची येथे सांगड घातली गेल्याने त्यांच्या डोळ्यांपुढे या व्यवस्थेला दुसरा पर्याय नव्हता. शिवाय त्यांच्या मनावर वेदान्तमताची छाप होती. कर्मसिद्धान्तावर त्यांचा विश्वास होता. सामाजिक जीवनातील विपरीत परिस्थितीमुळे चोखा मेळा हे काही काळ प्रक्षुब्ध होतात. पण अखेर पूर्वसंस्काराच्या दडपणाखाली “ कृष्णनिंदा घडली होती । म्हणोनी महार जन्मप्राप्ती ”[२४] अशी ते स्वतःच स्वतःची समजूत घालतात.

मध्ययुगीन समाजातील बहुतेक प्रगमनशील तत्त्वचिंतकांची अशीच स्थिती होती. म्हणून जातिसंस्थेचे समूळ उच्चाटन करण्याऐवजी तिच्यातील भेदभावना नष्ट करण्यावर त्यांनी सतत भर दिला.

ब्रिटिशांची राजवट सुरू झाल्यावर येथील एकंदर परिस्थितीत पुष्कळच फरक पडला. आधुनिक उद्योगप्रधान संस्कृतीशी आपला परिचय झाला, उदारमतवादातील नव्या मूल्यसरणीची आपल्याला ओळख पटली. वैयक्तिक जबाबदारीचा व व्यवसायस्वातंत्र्याचा जमाना सुरू झाला. त्यानंतर सामाजिक संस्थांकडे पाहण्याचा परंपरागत दृष्टिकोण बदलला. दादोबा पांडुरंग आणि लोकहितवादी यांनी जातिभेदाचे दुष्परिणाम लोकांच्या निदर्शनास आणून दिले. परंतु त्यांच्या वाङ्मयाचे वाचक बहुतांशी शहरवासी व उच्चवर्णीय होते. महात्मा फुले हे खेड्यापाड्यांतील शूद्र व अतिशूद्र समाजांच्या सुखदुःखाशी तादात्म्य पावले होते. बहुजनसमाजातील नव-

शिक्षित तरुण हे त्यांचे सहकारी व अनुयायी होते; आणि त्यांनाच जातिसंस्थेतील पक्षपातीपणाची पदोपदी झळ लागत होती. म्हणून जोतीरावांनी या व्यवस्थेवर अत्यंत त्वेषाने ताशेरे झाडले आहेत.

आर्य लोक बाहेरून या बलिस्थानात आले; आणि त्यांनी कुणबी, माळी, आगरी, कोळी, भील, रामोशी, मांग, महार इत्यादी येथील मूळच्या क्षेत्रपतींना आपले दास बनविले. तेव्हा ह्या नवागत आर्यांच्या सामाजिक जीवनात वर्णविभाग असला, तरी जातिभेद अस्तित्वात नव्हता, पण पुढे त्यांच्या हुकमतीखाली आलेला शूद्रातिशूद्रांचा समाज "जसजसा वाढत चालला, त्याप्रमाणे भट लोकांस भीती वाटू लागली आणि त्यांनी त्यांच्यामध्ये परस्पर वाकडेपणा राहील अशी काही तजवीज योजली, तरच आपला येथे राहण्याचा टिकाव लागून सदासर्वदा ते लोक वंशपरंपरे आपले व आपले वंशजांचे गुलामगिरीत राहून आपणास काही श्रम न करिता त्यांचे निढळयाचे घामाने मिळविलेले उत्पन्नावर बिनधास्त मौजा मारिता येतील, हा त्यांचा विचार सिद्धीस जाण्याकरिता जातिभेदाचे थोतांड उपस्थित करून त्याजवर अनेक स्वहित साधक ग्रंथ केले; व ते त्या अज्ञानी लोकांचे मनात भरविले. याप्रमाणे भट लोकांनी आपल्याशी इतर लोकांनी जसजशी वर्तणूक केली, त्या त्या प्रमाणे त्यांच्या जाती बांधून त्यांस सजा अथवा बरकांतीचा आश्रय देऊन सर्वस्वी आपले अंकित ठेविले. जेव्हापासून शूद्रादी अतिशूद्रांमध्ये भट लोकांनी जातिभेद उत्पन्न केला, तेव्हापासून त्या सर्वांची मते भिन्न भिन्न झाली."[२५]

वेगवेगळया जातींचे आचारविचार, खाणेपिणे, चालीरीती, आप्तमित्र यांत फरक पडत गेला. प्रत्येक जात आपल्या पृथगात्मतेला जपू लागली. काही जातींत अन्नोदकव्यवहार चालू राहिला; पण विवाहसंबंध निषिद्ध मानला गेला. बऱ्याचशा जातींत रोटीव्यवहार आणि बेटीव्यवहार यांचे क्षेत्र त्या त्या जातीपुरतेच मर्यादित ठेवले गेले. जातीजातींत तुटकपणा येऊ लागला. सामाजिक अभिसरण संपुष्टात आले. त्यामुळे हे सर्व लोक एकत्र येऊन गुलामगिरीविरुद्ध झगडा करतील अशी शक्यता उरली नाही.

जातिसंस्थेच्या उत्पत्तीविषयी अनेक उपपत्ती मांडल्या गेल्या आहेत. जोतीरावांच्या उपपत्तीवर अनेक आक्षेप घेतले जाण्याचा संभव आहे, परंतु एक गोष्ट अगदी स्पष्ट आहे. जातिव्यवस्था हा केवळ श्रमविभाग नसून तिच्या बांधणीत उच्चवर्णीयांचा स्वार्थ दडलेला आहे. किंबहुना हिंदू धर्मशास्त्रकर्त्यांनी जातिधर्माची व्यवस्था लावताना वरिष्ठ जातींचे हितसंबंध सुरक्षित राखण्याची खबरदारी घेतली आहे, हे मात्र जोतीरावांनी बरोबर ओळखले होते. जातिव्यवस्थेतील उच्चनीचभाव हा केवळ दृष्टिगत लहानमोठेपणाचा भाग नसून त्यांचे प्रत्यक्ष आपल्या सामाजिक जीवनावर परिणाम झाले आहेत व

अजूनही होत आहेत. वरिष्ठ जातींतील लोकांचे आर्थिक व सांस्कृतिक जीवन अधिकाधिक समृद्ध होत चालले आहे. उलट शूद्रातिशूद्रांची स्थिती सर्व बाजूंनी खालावत जाऊन त्यांच्यापैकी अगदी तळच्या थरांतील लोक अन्नवस्त्रासही मोताद झाले आहेत. शिक्षणाचा गंधही नसल्याने त्यांना आपल्या दुरवस्थेची कारणमीमांसा करता येत नाही. साहजिकच प्राप्त परिस्थितीत अगतिकतेने राहण्याची सवय होऊन त्यांना आपल्या गुलामगिरीबद्दल खंत वाटेनाशी होते. अशा स्थितीत ज्ञान, पैसा, अधिकार, प्रतिष्ठा या सर्व गोष्टी उच्चवर्णियांनी मोठ्या शिताफीने आपल्या ताब्यात ठेवल्या आहेत. "शेतकरी अज्ञानी असल्यामुळे भटब्राह्मणांस जातिभेदापासून अनंत फायदे होतात. यावरून ब्राह्मणांतील सरकारी कामगारांसहित पुराणिक, कथाडे, शाळेतील शिक्षक वगैरे ब्राह्मण, जातिभेद मोडू नये म्हणून आपला सर्व धूर्तपणा खर्ची घालून रात्रंदिवस खटपट करीत आहेत."[२६] सामाजिक विषमता टिकवून धरण्यास जातिभेद कसा कारणीभूत होत आहे, ते जोतीरावांनी निर्भीडपणे दाखवून दिले आहे. त्यांच्या या विवेचनात पुष्कळच तथ्य आहे यात शंका नाही.

मानवी प्राण्यांत मूळ जातिभेद नाही. हिंदू समाजात दृढमूल झालेली जातिसंस्था ही ईश्वरनिर्मित किंवा निसर्गसिद्धही नाही हे जोतीरावांनी वारंवार निक्षून सांगितले आहे. वेगवेगळ्या जातींचे पशुपक्षी पाहिले, तर ते अवयवांमध्ये एकमेकांपासून भिन्न असतात. त्याचप्रमाणे द्विपाद मानवी प्राणी देखील अवयवांमध्ये इतर चतुष्पाद प्राण्यांहून भिन्न आहेत. परंतु माणसामाणसात शरीररचना व सहजप्रवृत्ती या दोन्ही बाबतींत असा फरक दिसून येत नाही. तेव्हा जातिभेदाचा निर्मिकाच्या योजनेशी अर्थाअर्थी काही संबंध नाही. जातितः सर्व माणसे सारखीच आहेत. व्यवसायभेदावरूनही जातिसंस्थेचे समर्थन करता येणार नाही. व्यवसाय-स्वातंत्र्याचे हे युग आहे. कोणत्याही जातीतील माणसाला हवा तो व्यवसाय करण्याची मोकळीक आहे. समजा, एका गृहस्थाला तीन मुले आहेत. त्यांपैकी एक मेंढरे राखण्याचे काम करू लागला; दुसऱ्याने बागाइतीत लक्ष घातले आणि तिसरा शेतकरी बनला; तर एकाची धनगराची, दुसऱ्याची माळ्याची व तिसऱ्याची कुळंब्याची अशा एकाच कुटुंबात तीन जाती आहेत असे म्हणता येईल का? "त्याचप्रमाणे एका आर्यभट्टास तीन मुले असून त्यांपैकी एका मुलाने निर्वाहाकरिता तबलजीचा धंदा करण्यामध्ये आपला सर्व जन्म घालवला, दुसऱ्याने निर्वाहाकरिता वैद्याचा (डॉक्टरीचा) धंदा करून सर्व लोकांस औषध देऊन, जातीचा विधिनिषेध न पाळता, काही लोकांची प्रेते फाडण्यामध्ये आपला सर्व जन्म घालविला, आणि तिसऱ्याने पोटासाठी घरोघर स्वैंपाकी-आचाऱ्याचा धंदा करण्यामध्ये आपला सर्व जन्म घालविला; तर यावरून आपण त्याच्या पहिल्या मुलाची गुरवाची जात आहे, दुसऱ्याची वैदूची जात व

तिसऱ्याची आचाऱ्याची जात, असे ठरवाल काय?"[२६] ज्ञान, शौर्य व गुणसंपदा यांचा विचार केला, तरी ती जातिसापेक्ष आहेत असे आढळत नाही. वरच्या जातींतील कितीतरी मुले उनाड व दुर्वर्तनी असल्याचे आपण पाहतो. उलट खालच्या जातींतील मुलांना चांगले शिक्षण मिळाले, त्यांच्या मनावर लहानपणापासून उत्कृष्ट संस्कार करण्यात आले, तर त्यांच्यामधून शंकराचार्यांच्या तोलाची प्रज्ञावंत व कर्तृत्वशाली माणसे निघणारच नाहीत असे कोण म्हणू शकेल? कोणत्याही दृष्टीने पाहिले; तरी जातिभेद हा सयुक्तिक व श्रेयस्कर आहे असे सिद्ध करता येत नाही. उलट त्याचे घातुक परिणाम मात्र रोजच्या रोज ढळढळीतपणे सर्वांच्या अनुभवास येत आहेत.

जातिनिष्ठा ही पुरातनकाळापासून हिंदू मनात खोलवर रुजलेली आहे. त्यामुळे उच्चवर्णियांतील सुशिक्षितांच्या सहानुभूतीची कक्षाही जात-पोटजातीच्या पलीकडे क्वचितच जाऊन पोहोचते. शासनात वेगवेगळ्या अधिकारपदांवर हीच मंडळी ठिय्या देऊन बसली होती. एकमेकांना सांभाळून घेण्याची त्यांची स्वाभाविक प्रवृत्ती होती. साहजिकच खालच्या जातींतील माणसावर काही अन्याय झाला, तर त्याला त्याची दाद लावून घेणे फारच कठीण होत असे. जात ही धार्मिक–सामाजिक संस्था. परंतु खेड्यातील कष्टकऱ्यांना जीवनाच्या हरएक क्षेत्रात संकुचित जातीय वृत्तीचे आघात सहन करावे लागत असत. ही जातीयतेची जाणीव इतकी प्रबळ व प्रभावी होती की, धर्मांतर केल्यानंतर देखील तिचे संस्कार सहजासहजी पुसले जात नसत. याचे उत्तम उदाहरण 'प्रार्थना समाजाचा इतिहास' या ग्रंथात पाहावयास सापडते. डॉ. आत्माराम पांडुरंग यांच्या आग्रहावरून 'ज्ञानोदय' या खिस्ती नियतकालिकाचे संपादक शाहूराव कुकडे एकदा प्रार्थना समाजात उपासनेसाठी गेले होते. तेथे भिकाजी लक्ष्मण हे भंडारी गृहस्थ व्यासपीठावर उभे राहून प्रार्थना सांगत होते. हे दृश्य पाहून त्यांच्यातील पूर्वाश्रमीचे ब्राह्मण्य जागे झाले. एक ब्राह्मणेतर व्यासपीठावरून प्रार्थना सांगतो ही गोष्ट त्यांना खटकली; व तसे त्यांनी उघडपणे बोलूनही दाखवले. "खिस्ती झाल्यावरही जातिविषयक पूर्वसंस्कार कसे कायम राहतात."[२८] हे या प्रसंगावरून ध्यानात येते. "सरकारी रिपोर्टर जरी धर्माने खिस्ती, तथापि हाडाचा ब्राह्मण" म्हणून अखेरीस तोही आपल्या जातीवर जातो. आणि धर्मभेद विसरून आपल्या जुन्या जातबांधवांचीच बाजू उचलून धरतो, असा जोतीरावांनीही एके ठिकाणी आपला अभिप्राय नमूद केला आहे.[२९] त्याला शाहूराव कुकडे यांच्या वरील हकीगतीमुळे दुजोरा मिळतो. दुसऱ्या एका संदर्भात जोतीराव म्हणतात : "आता मांगा महारांनी खिस्ती होऊन आपली सुधारणा करून मनुष्यपदास पावावे तर, तेथील कित्येक काळे भट विद्वान खिस्ती, रात्रंदिवस गोऱ्या मिशनरींच्या कानी लागून ते या अनाथांची डाळ शिजू देत नाहीत. कारण तेथेही उंच वर्णातील झालेले खिस्ती

अनेक प्रकारचे भेदाभेद ठेवितात, असे पाहण्यात आले आहे."[३०] ही सर्व परिस्थिती जोतीराव उघड्या डोळयांनी पाहात होते. शूद्रातिशूद्रांच्या प्रगतीच्या मार्गात जर कोणता सगळ्यात मोठा अडसर असेल, तर तो जातिभेदाचा होय अशी त्यांची खात्री पटली होती म्हणून जातिभेदावर हल्ला करताना त्यांनी जागोजाग जे विचार मांडले, ते कितीही प्रखर व प्रक्षोभक असले, तरी मूलगामी समाजपरिवर्तनाशी बांधिलकी सांगणाऱ्या त्यांच्या भूमिकेशी ते सुसंगतच होते.

## दलितमुक्तीची हाक

जोतीराव हे महाराष्ट्रातील सामाजिक समतेच्या चळवळीचे आद्यप्रवर्तक होत. समाजात ज्यांना सगळ्यांत जास्त छळ सोसावा लागतो, ज्यांचा काही अपराध नसताना अत्यंत हलाखीचे जिणे जगणे ज्यांना भाग पडते अशा पददलितांच्यावरील अन्याय कसा दूर करता येईल, त्यांचे दैन्यदुःख कसे हटविता येईल याचीच त्यांना रात्रंदिवस तळमळ लागून राहिली होती. त्यासाठी त्यांनी जन्मभर बहुजनसमाजाचे प्रबोधन केले. इतकेच नव्हे तर वेळोवेळी आपले विचार प्रत्यक्ष कृतीत उतरवून त्यांनी लोकांना उदाहरण घालून दिले. अस्पृश्यता ही आपल्या सामाजिक जीवनातील एक अनर्थकारक व लाजिरवाणी बाब आहे. आर्यांच्या सूडबुद्धीचा तो उद्वेगजनक परिपाक आहे. त्यातच आणखी ह्या अमानुष रूढीची जनसामान्यांवरील पकड सैल होऊ नये म्हणून त्यांनी तिचा धर्मभावनेशी कायमचा संबंध जोडण्याची कारवाई केली हा तर दुष्टबुद्धीचा कळसच होय असे जोतीरावांचे मत होते. "येथील मूळच्या रहिवाशांपैकी जे लोक भट लोकांबरोबर मोठ्या निकराने लढले, त्यांचा त्यांनी एक वर्गच वेगळा केला. त्यांचा पुर्तेपणी सूड उगवण्याकरिता त्यांस व त्यांची जी पुढे संतती होईल तिजला त्यांच्यातीलच लोकांनी म्हणजे हल्ली ज्यांस माळी, कुणबी वगैरे म्हणतात, तर त्यांनी त्यांचा स्पर्शदेखील करू नये असे भट लोकांनी त्यांच्या मनात भरविले. असे जेव्हा झाले तेव्हा अर्थातच त्यांचा व्यापार वगैरे बंद होऊन अन्नास मोताद झाले, त्याजमुळे त्यांस मेल्या गुरांचे मांस खाणे भाग पडले. ते त्यांचे कृत्य पाहून हल्लीचे शूद्र जे आपणांस मोठ्या अहंपणाने माळी, कुणबी, सोनार, शिंपी, लोहार, सुतार इत्यादी मोठमोठ्या संज्ञा केवळ तो तो धंदा केल्याचे योगाने म्हणवून घेतात, तर तेच लोक आपले पूर्वज एकाच घराण्यातील असता त्यांचे पूर्वज स्वदेशासाठी भट लोकांशी मोठ्या निकराने लढले, सबब भट लोकांनी त्यांची अशी दुर्दशा करून त्यांस अन्नअन्न करावयास लाविले, हे आतील गुह्य त्यांच्या लक्षात न येता ते त्यांचा भट लोकांचे सांगण्यावरून द्वेष करावयास शिकले. हर! हर! किती तरी ते ईश्वराचे अपराधी आहेत की, त्या सर्वांचा इतका निकट संबंध असून एखादा

सणावाराला ते त्यांचे दारी दुरून अन्न वगैरे मागण्यास आले असता ते त्यांस झिडकारून देतात, व केव्हा केव्हा काठीसुद्धा घेऊन त्यांचे आंगावर मारण्यास जातात. " ३१

जातिभेदातून निर्माण झालेली कूपमंडूकवृत्ती ही तर हिंदू समाजाच्या पाचवीलाच पूजलेली आहे. उच्चवर्णीय बहुजनसमाजातील कनिष्ठ जातींना तुच्छ लेखतात. स्पृश्य अस्पृश्यांच्या सावलीचाही विटाळ मानतात; महार मांगांना दूर लोटतात. अशा तऱ्हेचे दुराव्याचे, दुहीचे व सहानुभूतिशून्यतेचे वातावरण सर्वत्र आढळते. ते दूर केल्याखेरीज खेड्यापाड्यांतील गरीब शेतकऱ्यांना, कारागिरांना व मोलमजुरी करणाऱ्या कष्टकऱ्यांना चांगले दिवस येण्याचा यत्किंचितही संभव नाही. कोणताही समाज घेतला, तरी तो निखळ एकजिनसी कधीच असत नाही. व्यवसाय, गुणविशेष, बुद्धिमत्ता, कर्तृत्व इत्यादी गोष्टींमुळे त्यात विविधता आल्याखेरीज राहात नाही. परंतु तिच्यात संधिसमानतेचे तत्त्व अनुस्यूत असेल, बंधुभाव जोपासला जात असेल, तर मग तिच्यामुळे माणसामाणसांच्या संबंधातील निकोपपणाला बाध येणार नाही; वेगवेगळ्या समाजघटकांच्या प्रेरणा परस्परपूरक ठरतील; आणि सामाजिक एकात्मकतेची भावना वाढीस लागेल. अशा प्रकारची विविधता आणि जातिभेद यात खूपच फरक आहे. ह्या विविधतेचे मूळ व्यक्तिगत गुणवैचित्र्यात आहे; तर जातिभेदाची भिस्त जन्मसिद्ध सामूहिक अधिकारभेदात आहे. 'व्यक्तीची प्रतिष्ठा' हे आधुनिक युगातील एक श्रेष्ठ मूल्य मानले गेले आहे. म्हणून प्रत्येक मनुष्याला, मग तो कोणत्याही जातीचा वा धर्माचा असो, स्वतःचा पूर्ण विकास करून घेण्याची संधी मिळाली पाहिजे. परंतु अस्पृश्यतेच्या रूढीमुळे दलितांना वेगवेगळ्या व्यवसायांचे दरवाजे पिढ्यान्‌पिढ्या साफ बंद झाले होते. विकासाची संधी, व्यवसायस्वातंत्र्य या गोष्टी तर दूरच. पण माणसाच्या जन्माला येऊनही त्यांच्या मनुष्यत्वाची रोजच्या रोज राजरोस विटंबना होत होती धार्मिक वृत्तीचे उच्चवर्णीय लोक 'शूद्रादी अतिशूद्रांची विष्ठा खाणाऱ्या पशू गाईचे जरी मूत्र पिऊन शुद्ध मानून घेतात,' ३२ तरी महारमांगाच्या माणूसपणाची त्यांना ओळख पटत नाही. पशूपेक्षाही माणसासारखी माणसे त्यांना अपवित्र वाटतात. हे ब्राह्मणी धर्मशास्त्र अजब आहे; अतर्क्य आहे. या निर्घृण रूढीच्या पाशांत गुंतल्यामुळे ब्राह्मण सहृदयतेला कसे पारखे होतात; आणि दलितांशी किती निर्दयतेने वागतात ते जोतीरावांनी दाखवून दिले आहे.

" चांडाळ ब्राह्मण मांगा दूर धरी । स्वतः पाणी भरी । आडावरी ।।
तान्हेनें व्याकूळ जरी मांग मेला । दया ब्राह्मणाला । येत नाहीं ।।
मानवाचे द्वेष्टे गर्व अभिमानी । जगांत दुर्गुणी । कळचेटे ।।
मांगाचे लग्नात दक्षणा ते घेती । सोवळ्यानें खाती । जोती म्हणे " ३३

निसर्गाने महारमांग आणि आर्यब्राह्मण यांत भेदभाव केलेला नाही. ते सर्व

जन्मतः सारखेच असतात. महारमांगांना बंधमुक्त करून त्यांच्या सर्वांगीण प्रगतीचा मार्ग खुला केला, तर तेही देशाच्या ज्ञानभांडारात, संपत्तीत व लौकिकात भर घातल्याखेरीज राहणार नाहीत. म्हणून ही जात श्रेष्ठ व ती जात भ्रष्ट ही समजूत संकुचितपणाची व स्वयंमन्यतेचीच निदर्शक आहे.

" मांग आर्यामध्यें पाहूं जातां खूण । एक आत्मा जाण । दोघांमध्यें ।।
दोघेही सारीखे सर्व खाती पिती । इच्छा ती भोगती । सारखेच ।।
सर्व ज्ञानामध्यें आत्मज्ञान श्रेष्ठ । कोणी नाही भ्रष्ट । जोती म्हणे ।। " [३४]

जोतीरावांची समतेची ओढ ही निर्लेप व निरपवाद अशी होती. त्यांच्या विचार-प्रणालीत पक्षपातीपणा, धरसोड किंवा लोकानुनय यांचा लवलेशही नव्हता. कुणबी, माळी यांच्याबरोबर मांग व महार यांचाही त्यांनी वारंवार आवर्जून उल्लेख केलेला आहे. अस्पृश्यांवर येणाऱ्या अन्यायाच्या बाबतीत त्यांनी जसे ब्राह्मणांना जबाबदार धरले, तशी बहुजनसमाजातील लोकांचीही त्यांनी कानउघाडणी केला आहे.

" देशसुधारासाठीं आमच्या रात्रंदिन ध्यानीं ।
मांगभटां ऐक्य करूं बसवूं पंक्तींनीं " [३५]

ब्राह्मणांपासून अंत्यजांपर्यंत सर्वांचे समतेच्या तत्त्वावर देशोन्नतीसाठी ऐक्य घडवून आणण्याची त्यांची आकांक्षा होती; आणि तिच्या परिपूर्तीसाठी धडपड करताना त्यांनी कधीच कसूर केली नाही.

## स्त्रीस्वातंत्र्याचा पाठपुरावा

सामाजिक विषमतेमुळे ज्यांना आपल्या नैसर्गिक मानवी अधिकारांना मुकावे लागले होते अशा शूद्रातिशूद्रांच्या प्रमाणेच स्त्रियांच्या प्रश्नांतही जोतीरावांनी प्रथम-पासून लक्ष घातले होते. आपल्या सार्वजनिक जीवनाचा प्रारंभच मुळी त्यांनी स्त्री-शिक्षणाच्या, त्यातही दलित समाजातील मुलींच्या शिक्षणाच्या उपक्रमाने केला. स्त्री ही समाजाचा एक स्वतंत्र घटक आहे. म्हणून सामाजिक व्यवहारात स्त्री आणि पुरुष असा भेदभाव करणे उचित नाही. पुरुषाचा उल्लेख करून त्यात स्त्रीचा अंतर्भाव होतो असे मानण्याची सगळीकडे नेहमीची प्रथा आहे. पण ती बाजूस सारून जोतीराव मानवी स्त्रीपुरुष, स्त्री अथवा पुरुष अशी आवर्जून शब्दयोजना करतात. आपल्या परमार्थविचारात समतेचा कितीही उदोउदो केलेला असला, तरी आपला लौकिक व्यवहार विषमतेनेच ग्रासलेला होता. पुरुषप्रधान समाजव्यवस्थेत स्त्रीला हरएक बाबतीत दुय्यम स्थान देण्यात आले होते. ती स्वतः होऊन कोणताच निर्णय घेऊ शकत नव्हती पिता, पती व पुत्र यांच्या आज्ञेत तिने सदैव राहिले पाहिजे. स्वतःच्या पृथगात्मतेची जपणूक करण्याऐवजी पतीला देवपद देऊन आपण त्याची

सावली होऊन राहण्यात धन्यता मानली पाहिजे असे अगदी लहानपणापासून तिच्यावर संस्कार केले जात होते. शिवाय तिला विद्याध्ययनाची मुभा नव्हती. "एकंदर सर्व स्त्रियांस मानवी हक्क समजू देऊ नये, या इराद्याने लोभी पुरुषांनी त्यांस विद्या शिकविण्याचा प्रतिबंध केला"[३६] असावा असा जोतीरावांचा कयास होता. हिंदू धर्मशास्त्रकारांनी पुरुषांना अनेक सवलती दिल्या होत्या, उलट स्त्रियांवर कितीतरी जाचक निर्बंध लादलेले होते. "साठसत्तर वर्षांच्या जरजर झालेल्या बोथऱ्या खल्लड जरठाशी आर्य भट्टांनी पूर्वी लग्न लाविलेल्या स्त्रिया मरताच त्यांनी लावण्यवती अशा अज्ञानी मुलींबरोबर पुनः संबंध करून, त्या अबलांचे तारुण्यात माती कालवितात. परंतु बालपणी वैधव्य आलेल्या अज्ञानी मुलीने मात्र पुनः द्वितीय संबंध करू नये म्हणून कडेकोट प्रतिबंध करून प्रचारात आणिला आहे. ह्याचे कारण, स्त्रीजातीस नीच मानण्याचा त्यांचा प्रघात पडल्यामुळे व त्यास अनेक धूर्त व कावेबाज ऋषींनी केलेल्या संहिता, स्मृत्या वगैरे बळकट आधार मिळाल्यामुळे त्यांनी आजपावेतो ही दुष्ट चाल चालू ठेविली आहे. यास्तव तुम्ही विचार करा की, आर्य ब्राह्मणांनी ही दुष्ट चाल प्रचारात आणल्यामुळे भोळसर अज्ञानी कुळवाडी, सोनार वगैरे जातींतील लोकांनी त्यांचा कित्ता घेतल्यामुळे, ते भट्टांप्रमाणेच आपल्या सुनाबाळांस त्याच प्रकारच्या संकटात पाडतात, या अन्यायावरून आपण सर्वांच्या परमन्यायी व दयामूर्ती निर्माणकर्त्यांस त्यांच्या अघोर दुष्ट आचरणाचा संताप येत नसेल काय?"[३७] तसे पाहिले तर "स्त्री आणि पुरुष एकसारखे एकंदर सर्व मानवी अधिकारांचा उपभोग घेण्यास पात्र असता स्त्रियांस एक तऱ्हेचा नियम लागू करणे व लोभी धाडस पुरुषांस दुसरा नियम लागू करणे हा निवळ पक्षपात होय."[३८] अशा तऱ्हेने उघड उघड पक्षपात करणाऱ्या दुहेरी नीतीबद्दल जोतीरावांना चीड येणे स्वाभाविक होते. ही चीड त्यांच्या लिखाणात जागोजाग प्रगट झाली आहे. "बहु स्त्रियांचा हा पती। स्त्रीस का उलटी रीती"[३९] असा त्यांचा रास्त सवाल होता. बालविवाह, बालाजरठविवाह, बहुपत्नीकत्व, पुनर्विवाहप्रतिबंध, केशवपन, नियोग, वेश्यागमन यांसारख्या स्त्रियांवर अन्याय करणाऱ्या रूढींवर त्यांनी अत्यंत कठोर शब्दांत कोरडे ओढले आहेत. स्त्रीपुरुषांची शारीरिक व मानसिक वाढ पुरेशी होण्याआधी झालेले विवाह त्यांच्या स्वतःच्या प्रकृतीला तर अपायकारक होतातच, पण त्यांच्या संततीलाही त्यांचे अनिष्ट परिणाम भोगावे लागतात. पहिल्या लग्नाची बायको सुखाने नांदत असताही तिच्या भावनांची कदर न करता बेजबाबदारपणे दोन दोन तीन तीन लग्ने करणाऱ्यांच्या संसाराची कशी दैना होते त्याची कल्पनाही करवत नाही. या दृष्टीनेच जोतीरावांनी "शूद्र शेतकऱ्यांनी एकीपेक्षा जास्त बायका करू नयेत व त्यांनी आपल्या मुलीमुलांची लग्ने लहानपणी करू नयेत म्हणून कायदा

केल्याविना संतती वळकट होणे नाही." [40] असा निष्कर्ष काढला होता.

स्त्रीस्वातंत्र्याची आपली भूमिका निर्दोष व परिणामकारक व्हावी म्हणून जोतीरावांनी विवाहसंस्थेसंबंधी खोलवर विचार केला होता. सत्यशोधक समाजाच्या अनुयायांसाठी त्यांनी सुटसुटीत विवाहविधी तयार करून दिला. त्यात धार्मिकतेला एकदम फाटा दिला नव्हता हे खरे. पण ही धार्मिकता वैयक्तिक, फार तर कौटुंबिक स्वरूपाची होती. जुन्या प्रस्थापित धर्मसंस्थेचे वर्चस्व त्यांनी झुगारून दिले होते. "वधूवरांचे जातीस नीच मानून त्या सर्वांस आपले सेवक, दास म्हणणाऱ्या, धूर्त, कपटी आर्यभट ब्राह्मणाची या कामी सावली देखील पडू देऊ नये." असा त्यांनी आग्रह धरला होता. शिवाय या शुभ प्रसंगी "मोठ्या आनंदाने शूद्रादी अतिशूद्रांपासून तो खिस्ती, मुसलमान, पार्शी, ब्राह्मण वगैरे मानव बांधवांपावेतो कोणाची आवडनिवड न करिता त्यांच्यातील पोरक्या मुलीमुलांस व अंधपंगूंस शक्त्यनुसार दानधर्म" करावा असे त्यांचे सांगणे होते. [41] हे त्यांच्या धर्मनिरपेक्ष व्यापक दृष्टीचेच गमक आहे. आपल्या सत्यशोधक विवाहविधीत त्यांनी आधुनिक आशय ओतला आहे. विवाह हा एक पवित्र संस्कार आहे यात शंका नाही. पण त्याबरोबरच तो वयात आलेल्या जाणत्या व जबाबदार वधूवरांनी एकमेकांशी केलेला करार आहे; कबुलायत आहे. "एकंदर सर्व मानवप्राण्यांत काही अविचारी दांडग्या लोकांस कलह करिता येऊ नये, म्हणून सर्वानुमते असे ठरले असावे की, हरएक मानव पुरुष व स्त्री हे उभयता मरेतोपावेतो एकमेकांचे साथी व साह्यकारी होऊन एकचित्ताने वर्तन करून त्यांनी सुखी व्हावे म्हणून जी काही परस्परांशी कबुलायत करण्याची वहिवाट घातली आहे, त्यास लग्न म्हणतात." [42] यास्तव आपल्या वडिलधाऱ्या मंडळींचा व इष्टमित्रांचा सल्ला घेऊन आणि स्वतः सर्व बाजूंनी सारासारविचार करून मुलामुलींनी आपला जोडीदार निवडावा आणि पंचांसमक्ष प्रतिज्ञापूर्वक विवाहबद्ध व्हावे असे त्यांचे प्रतिपादन आहे. त्यात समदृष्टीला प्राधान्य आहे. मंगलाष्टकांत वधू वराला बजावते,

"मानींशी जरी त्वां दिलें अनुदिनीं, कर्त्या समाधानसें ॥
आम्हां सर्व स्त्रियां असे बहु पिडा, हें नेणशी तूं कसें ॥
स्वातंत्र्यानुभवाची ओळख आम्हां, झाली नसे मानशीं ॥
यासाठीं अधिकार देशिल स्त्रियां, घे आण त्याची अशी"

यावर तो आश्वासन देतो की,

"स्थापाया अधिकार मी झटतसें, या बायकांचे सदा ॥
खर्चाया न मनीं मि भी किमपिही, सर्वस्व माझें कदा" [43]

स्त्रीला सामाजिक जीवनात सर्वत्र समान दर्जा व संधी मिळाली पाहिजे. एवढे म्हणून जोतीराव थांबले नाहीत, तर स्त्री ही पुरुषापेक्षा श्रेष्ठ आहे असे आपले मत

त्यांनी निःशंकपणे मांडले आहे. मुलाला जन्म दिल्यानंतर ती त्याचे निरलसपणे पालनपोषण करते. त्याच्यासाठी वाटेल तेवढ्या खस्ता खाते. त्याला बोलायला, चालायला शिकवते. त्याचे कोडकौतुक करते. त्याला वळण लावते. धर्म, अर्थ, काम या पुरुषार्थांच्या साधनेत ती सहभागी होते. पुरुष कितीही अविवेकाने व अनिर्बंधपणे वागला, तरी ती आपले कर्तव्य न चुकता करीतच राहते. एवंच स्त्री ही अधिक सहनशील, प्रेमळ, त्यागी, कर्तव्यदक्ष, परहितपरायण असते असे जोतीरावांच्या यासंबंधीच्या विवेचनाचे तात्पर्य आहे.

## गुन्हेगारीचा प्रश्न

जोतीरावांचे विचार आणि कार्य यांत त्यांनी मुख्यतः शेतकऱ्यांच्या भवितव्यावर आपले लक्ष केंद्रित केले होते. तरी त्यांची दृष्टी मूलतः सर्वसमावेशक होती. दलित जाती आणि वन्य जमाती यांच्या पराधीनतेचा व हालअपेष्टांचा त्यांना कधी विसर पडला नव्हता. येथील मूळ रहिवाशांचा उल्लेख करताना कुणबी, माळी यांच्याबरोबर महारमांग आणि भिल्लरामोशी यांचाही त्यांत त्यांनी जाणीवपूर्वक अंतर्भाव केला आहे. आदिवासींच्या प्रश्नांबद्दल त्यांना मनापासून आस्था होती. " गोंड भिल्ल क्षेत्री होते मुळ धनी ", " शूर भिल्ल कोळी शरानें तोडीले । हाकलून दिले । रानींवनीं " [४४] या त्यांच्या उद्‌गारांचा आशय अगदी स्पष्ट आहे. यापेक्षाही गुन्हेगारांकडे पाहण्याचा त्यांचा जो उदार दृष्टिकोण होता, तो तर त्यांच्या भूमिकेचा लक्षणीय विशेष म्हटला पाहिजे. ज्या काळात गुन्हेगारीच्या प्रश्नाचा सहृदयतेने व मूलगामी दृष्टीने विचार करण्याची कुणालाच आवश्यकता वाटत नव्हती, त्या काळात जोतीरावांनी या प्रश्नाची सम्यक्‌दृष्टीने दखल घेतली. कोणताच मनुष्य गुन्हेगार म्हणून जन्माला येत नाही. भोवतालची परिस्थिती आणि यथोचित शिक्षण व संस्कार यांचा अभाव यांमुळे बरेचसे लोक चुकीच्या मार्गाकडे वळतात. कधी अगतिकतेने, तर कधी अविचाराने गुन्हे करण्यास ते प्रवृत्त होतात. " कुटुंबातील मुख्य माता अथवा पिता; गावातील मुख्य पाटलीण अथवा पाटील, देशातील मुख्य देशमुखीण अथवा देशमुख; पृथ्वीवरील मुख्य महाराणी अथवा महाराजा, या सर्व मुख्य अधिकाऱ्यांत सत्यपाळकपणाची मुळीच कळकळ नसल्यामुळे ते आपल्या ताब्यात असलेल्या मुलीमुलांवर चांगली चौकशी न ठेविता त्यांस उनाड होऊ देतात; आणि त्यांस योग्य वेळी योग्य शिक्षण देण्याची हयगय करितात. यामुळे एकंदर सर्व जगात चोऱ्या वगैरे प्रकारच्या दुष्ट आचरणांचा फैलाव झाला व होतही आहे. " [४५] जोतीरावांच्या या प्रतिपादनावर वेगळे भाष्य करण्याची मुळीच गरज नाही. मनुष्य एकदा का बिघडला की, तो कायमचा वाया गेला असे जोतीरावांना वाटत नव्हते. त्याला

खरोखरीच तशी निकड तीव्रतेने जाणवली, तर कोणत्याही क्षणी तो आपल्या आयुष्याची दिशा बदलू शकतो. मनुष्यमात्राच्या ठिकाणी असलेल्या परिवर्तनक्षमतेवर त्यांचा विश्वास होता. त्यासाठी शासन व शिक्षण या दोन्ही साधनांचा सारासारविचार करून पद्धतशीर अवलंब केला पाहिजे असे त्यांचे मत होते. त्यानुसार त्यांनी "आपल्या कनवाळू सरकाराने या बळिस्थानातील शेतकऱ्यांच्या शाळांशिवाय भिसाडी-लोहार-बढई–सुतार–कढई–चांभार–सोनार–तांबट–साळी–शिंपी वगैरे कारागिरांच्या मुलांकरिता निरनिराळ्या शाळा घालून त्यांमध्ये त्या सर्वांच्या कसबांसंबंधी सर्व प्रकारच्या विद्या शिकविण्याच्या कामी थोडा थोडा खर्च केल्याबरोबर त्या सर्व शाळांत शिकलेली कारागिरांची मुले फारच थोडी चोर निपजतील असे मी खात्रीने सांगतो"[७] असा आशावाद प्रगट केला आहे. शिवाय नीतिअनीतीचा निर्णय करताना ज्या त्या माणसांची परिस्थितीही ध्यानात घेतली पाहिजे. पोटासाठी चोऱ्या करणारे अज्ञानी लाचार लोक आणि सरकारपासून दरमहाचे दरमहा मोठाथोरला पगार आणि गाडीघोड्याबद्दल भत्ते घेऊनसवरून पुन्हा गरीब रयतेला लुबाडणारे लाचखाऊ लोक हे सर्व गुन्हेगार तर खरेच. परंतु त्यांच्या गुन्ह्याचे स्वरूप सारखे नाही. पहिल्या प्रकारचे लोक प्रतिकूल परिस्थितीमुळे गुन्हेगारी प्रवृत्तीला बळी पडतात. उलट दुसऱ्या प्रकारचे लोक जाणूनबुजून आपल्या कष्टकरी समाजबांधवांच्या अज्ञानाचा व असहाय्यतेचा स्वार्थांधतेने गैरफायदा घेत असतात. यांपैकी अधिक समाजद्रोही कोण याचा बारकाईने विचार करण्याची गरज आहे. नैतिकता हीसुद्धा कशी परिस्थितिसापेक्ष असते ते जोतीरावांनी लोकांच्या निदर्शनास आणून दिले आहे. अशा तऱ्हेचे अनेकविध सामाजिक प्रश्नांवरचे त्यांचे विचार तपासून पाहिले, तर त्या काळाच्या संदर्भात त्यांचा मानवतावाद हा अद्ययावत होता, अस्सल बावनकशी होता याची निर्विवाद खात्री पटते.

## संदर्भ व टीपा


१ समग्र वाङ्मय, पृ. ३७१–७२

२ समग्र वाङ्मय, पृ. ३७२

३ Social Contract, p. 100

४ समग्र वाङ्मय, पृ. २१७

५ समग्र वाङ्मय, पृ. ४०३, ८५

६ समग्र वाङ्मय, पृ. ४११

७ समग्र वाङ्मय, पृ. ४७२

८ समग्र वाङ्मय, पृ. ४४९, ४५२, ४६१
९ भगवद्गीता, ४–१३
१० समग्र वाङ्मय, पृ. ८३
११ समग्र वाङ्मय, पृ. ३६८–६९
१२ समग्र वाङ्मय, पृ. ४७३
१३ समग्र वाङ्मय, पृ. ३६९
१४ समग्र वाङ्मय, पृ. ४६४
१५ समग्र वाङ्मय, पृ. ४६९
१६ वेणीसंहार, ३–३७
१७ समग्र वाङ्मय, पृ. २१४–१५
१८ समग्र वाङ्मय, पृ. ४८
१९ समग्र वाङ्मय, पृ. ५४
२० समग्र वाङ्मय, पृ. २०५
२१ ज्ञानेश्वरी, १८–९०७
२२ मनुस्मृति, १–९३, १००, ९१
२३ भगवद्गीता, ३–३५
२४ सकलसंतगाथा–चोखा मेळा, ८९
२५ समग्र वाङ्मय, पृ. ९१
२६ समग्र वाङ्मय, पृ. २६०
२७ समग्र वाङ्मय, पृ. ३६६
२८ प्रार्थना समाजाचा इतिहास, पृ. ३९
२९ समग्र वाङ्मय, पृ. २४२
३० समग्र वाङ्मय पृ. २५०
३१ समग्र वाङ्मय, पृ. ९१
३२ समग्र वाङ्मय, पृ. ४०२
३३ समग्र वाङ्मय, पृ. ४७४
३४ समग्र वाङ्मय, पृ. ४५७
३५ समग्र वाङ्मय, पृ. ४९३
३६ समग्र वाङ्मय, पृ. ३६०
३७ समग्र वाङ्मय, पृ. ३६१
३८ समग्र वाङ्मय, पृ. ३६२
३९ समग्र वाङ्मय, पृ. ४८०

४० समग्र वाङ्मय, पृ. २६०
४१ समग्र वाङ्मय, पृ. ३३२, ३३६
४२ समग्र वाङ्मय, पृ. ४२२
४३ समग्र वाङ्मय, पृ. ४२३
४४ समग्र वाङ्मय, पृ. ४९६, ४५६
४५ समग्र वाङ्मय, पृ. ४२५–२६
४६ समग्र वाङ्मय, पृ. ४२६

# ७



# राजकीय दृष्टिकोण

राजकारण हा मुख्यतः सत्तेचा खेळ आहे. त्याविषयी आपल्या देशातील सर्वसामान्य लोक पूर्वीपासून प्रायः उदासीन होते. तरीदेखील राजकीय स्थित्यंतरांचा त्यांच्या जीवनावर जो परिणाम व्हायचा तो होतच होता. इंग्रजांच्या सुनियंत्रित शासनपद्धतीमुळे राज्यसंस्थेचा प्रभाव अधिकाधिक जाणवू लागला होता. त्यामुळे जनसामान्यांच्या हितसंबंधांची जपणूक करणाऱ्या समाजाचिंतकांना राजकीय घडामोडींची दखल घेण्याखेरीज गत्यंतर नव्हते. सत्यशोधक समाजाच्या उद्देशपत्रिकेत " या समाजात राजकीय विषयांवर बोलणें अजी वर्ज आहे. "[१] असे म्हटले असले, तरी राज्यकर्त्यांचे धोरण, प्रशासकांची कार्यपद्धती, धार्मिक-सामाजिक व्यवस्थेच्या आड दडलेला राजकीय स्वार्थ यांकडे जोतीरावांचे बारीक लक्ष होते. समाजाच्या दुर्बल घटकांची दैन्यावस्था कशी दूर करता येईल हा एकच एक प्रश्न त्यांच्या मनात रात्रंदिवस घोळत होता. त्या दृष्टीने ते प्रत्येक गोष्टीचा विचार करीत असत. आपल्या कार्यात त्यांनी लोकशिक्षणाला प्राधान्य दिले होते हे खरे. परंतु सत्ता हे देखील समाजपरिवर्तनाचे एक महत्त्वाचे साधन आहे याचा त्यांना विसर पडला नव्हता. सत्ता गेली की तिच्या पाठोपाठ स्वाभिमान लुप्त होतो, कर्तृत्व लयाला जाते. " सत्तेवांचून सकळ कळा, झाल्या अवकळा, पुसा मनाला "[२] असे त्यांनी उच्चवर्णियांचे गुलाम बनलेल्या ' दस्यु ' जनांना खडसावून सांगितले आहे. शूद्रातिशूद्रांची धार्मिक व सामाजिक गुलामगिरी नष्ट होऊन त्यांच्या हाती मोक्याची सत्तास्थाने आल्याशिवाय त्यांना ऊर्जितकाळ येणे शक्य नाही अशी जोतीरावांची धारणा होती. अत्यंत विपन्नावस्थेत खितपत पडलेले आणि शतकानुशतके विद्येला वंचित झालेले हे लोक निःसत्त्व व प्रवाहपतित बनले आहेत. त्यांना प्रगतिपथावर आणून सोडण्याच्या

कामी शासनाने पुढाकार घेतला पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. मात्र शूद्राति-शूद्रांनी आपल्यातील न्यूनगंड झटकून टाकून सरकारच्या प्रयत्नांना तत्परतेने प्रतिसाद दिला पाहिजे. ब्रिटिश राज्य आता येथे स्थिरावले आहे. या उदार व न्यायशील सरकारच्या छत्राखाली कष्टकरी समाजातील लोकांच्या दारी सर्वांगीण प्रगतीची संधी चालून आली आहे. "इंग्रज लोक आज आहेत, उद्या नाहीत, ते आपल्या जन्मास पुरवतील म्हणोन कोणाच्याने खास करून सांगवत नाही. यास्तव त्या लोकांचे राज्य या देशात आहे, तोच आपण सर्व शूद्रांनी जलदी करून भटांच्या वडिलोपार्जित दास्यत्वापासून मुक्त व्हावे, यामध्ये मोठा शहाणपणा आहे"[३] अशी जोतीरावांची एकंदर विचारसरणी होती. इंग्रज राज्यकर्त्यांकडून आपल्या शूद्र व अतिशूद्र बांधवांना न्याय मिळेल असा जो आशावाद त्यांच्या मनात निर्माण झाला होता, त्याची कारणे अगदी उघड आहेत.

इंग्रजी राज्य हे त्यातील शांतता व सुव्यवस्था यांमुळे खेडोपाड्यांतील सामान्य जनांना दैवी वरदान आहे असे वाटले. स्वराज्य गेल्याची फारशी कुणाला खंत नव्हती. कारण जुन्या राजवटींचा त्यांचा अनुभव उद्वेगजनकच होता. मोगल साम्राज्याचा ऱ्हासकाल सुरू झाल्यानंतर भारतात सर्वत्र अंदाधुंदी व बजबजपुरी माजली होती. देशोदेशीचे मांडलीक व सुभेदार शिरजोर होऊन मन मानेल तसा कारभार करीत होते. कित्येक राज्यकर्ते तर निरुपद्रवी प्रजेची लूटमार करण्यासाठी पेंढाऱ्यांना जवळ करीत होते. दक्षिणेत रामोशी व भिल्ल वाटमारीपणा करीत असत. त्यांना कित्येक लहानमोठे राजे सामील असत. ज्यांनी प्रजेच्या रक्षणाची हमी घ्यावयाची, तेच जर लुटालूट व जुलूमजबरदस्ती यांचा अवलंब करू लागले, तर त्यांच्याविषयी रयतेला कशी आपुलकी वाटणार? पेशवाईच्या अखेरच्या काळात शेतकऱ्यांची स्थिती अत्यंत हलाखीची होती. पक्षपातीपणा व लाचलुचपत यांना ऊत आला होता. साऱ्याच्या ओझ्याखाली शेतकरी हवालदिल होऊन गेला होता. कष्टकरी लोकांच्या श्रमातून मिळालेली ही संपत्ती खर्च करताना किती संकुचित वृत्ती ठेवली जात होती, त्याचे जोतीरावांनी केलेले वर्णन मर्मभेदक आहे. त्यात त्यांनी आपल्या जुन्या परंपरागत शासनव्यवस्थेवर ताशेरे ओढले आहेत, "शेकडो वर्षे भट राजांनी प्रजेवर वाकेतोपर्यंत कराचे ओझे लादून कोट्यवधी रुपये घशात टाकिले, परंतु त्याचा एक छदाम तरी ईश्वराला स्मरून तिच्या कल्याणाकडे लावायचा होता! हर हर! प्रजेपासून वसूल केलेल्या पैशांचा ज्या रीतीने त्यांनी व्यय केला ती सांगण्यास आम्हांस लज्जा वाटते. त्यांनी आपले जातीचे भट लोकांकरिता जागोजागी देवाची संस्थाने स्थापन करून तेथे त्याजकरिता अन्नछत्रे घातली. प्रजेकडून पैसा वसूल झाला की लागलीच ब्राह्मणभोजनप्रीत्यर्थ अमुक संस्थानाकडेस दोन लक्ष रुपये, अमुक संस्थाना-

कडेस पन्नास हजार, येणेप्रमाणे ठराव करून पैसा वाटून घ्यावा. आणि दररोज पर्वतीसारख्या संस्थानावर आज काय, फक्त ब्राह्मणांस तूपपोळीचे जेवण व वर दहा-दहा रुपये दक्षणा, आज काय ब्राह्मणांस लाडूचे जेवण व वर वीस वीस रुपये दक्षणा, आज ब्राह्मणांस केशरभाताचे जेवण व वर ओगराळे भरून रुपये प्रत्येकास दक्षणा. याशिवाय कित्येक ब्राह्मणांस शालजोड्या, कित्येकांस पागोटी, कित्येकांस धोतरजोडे, कित्येकांस यथासांग वर्षासन देण्याच्या नेमणुका, अशा रीतीने दररोज ब्राह्मणांस यथेच्छ भोजन घालून वर रगड दक्षिणा देण्यात व बक्षिसे देण्यात प्रजेस अतिदुःख होऊन वसूल केलेल्या सर्व पैशांची नासाडी करून टाकली होती." [४] हे वर्णन बहुतांशी पेशवाईच्या उत्तरार्धातील परिस्थितीला लागू पडते. पेशवाईच्या पूर्वी महाराष्ट्रात होऊन गेलेले बहुतेक सर्व राज्यकर्ते क्षत्रियकुलातील होते. होळकरांसारखे काही तर शूद्र समाजातीलच होते. परंतु त्यांनी देखील यज्ञयाग, व्रतवैकल्ये, तीर्थयात्रा, ब्राह्मण-भोजने, देवस्थानांना देणग्या यांपायी अमाप खर्च केला होता. त्या सर्वांच्या मनावर परंपरागत धर्मसंस्थेचा पगडा होता. जोतीरावांच्या विवेचनातील तथ्यांश इतकाच की ब्रिटिशपूर्व कालातील राजेरजवाडे, मग ते ब्राह्मण, क्षत्रिय अथवा शूद्र यांपैकी कोणत्याही समाजातील असोत, ब्राह्मण्यग्रस्त होते. त्यांनी आपल्या कष्टाळू गरीब रयतेच्या सुखदुःखाची कधी जाणीवपूर्वक दखल घेतली नाही. मुसलमान राज्यकर्ते बोलूनचालून परधर्मी. त्यांच्यापासून आपण प्रजाहितदक्षतेबाबत काय अपेक्षा बाळगणार? परंतु महाराष्ट्रात मुसलमान हे अगदी अल्पसंख्य होते. तेव्हा राज्य-कर्त्यांना साहजिकच हिंदुसमाजातील वरिष्ठ वर्गांशी वारंवार जुळते घेऊन कारभार करावा लागत असे. त्यामुळे नित्याच्या सामाजिक जीवनात सामान्य नागरिकांना परधर्मी सत्तेचा विशेष उपद्रव होत नसे. परंतु येथील मुसलमानी अमदानीचा काल-खंड हा बराचसा धामधुमीचा कालखंड होता. निरनिराळ्या राज्यांत सतत काही ना काही कटकटी चालू असत. त्यातच या झगड्यांना कित्येकदा धर्मकलहाचे उग्र स्वरूप प्राप्त होत असे. अशा वेळी सरकारी अंमलदार व सैनिक यांच्या दंडेलीला काही धरबंध राहात नसे. त्यांचा आततायीपणा व जुलूमजबरदस्ती यांमुळे पर-मुलखातीलच नव्हे, तर त्यांच्या स्वतःच्या प्रदेशातील प्रजाजनही हैराण होऊन जात. तसे पाहिले तर क्रौर्य, कत्तली, कडेलोट, शिरच्छेद यांसारख्या गोष्टी या मध्ययुगीन राजकारणाचा एक भाग होऊन बसल्या होत्या. हिंदू राजवटींतही त्या कमजास्त प्रमाणात रूढ होत्या. मध्ययुगीन युरोपातील परिस्थितीही याहून फार वेगळी होती असे नाही. पण महाराष्ट्रात इंग्रजांची राजवट आली, ती आधुनिक युगातील नव्या जाणिवा घेऊनच आली. त्यामुळे त्यांची शासनपद्धती खचितच अधिक प्रगत व न्यायप्रवण होती. तेव्हा येथील लोकांनी या नव्या राजवटीचे निःशंकपणे स्वागत केले

असल्यास काही नवल नाही.

ब्रिटिश सरकारने प्रथम ठग, पेंढारी, भिल्ल, रामोशी यांचा बंदोबस्त करून सर्वत्र शांतता व सुव्यवस्था स्थापन केली. बेबंदपणा व असुरक्षितपणा यांमुळे त्रासून गेलेल्या लोकांनी सुटकेचा निश्वास सोडला. "हे राज्य झाल्यामुळे प्रजेस पूर्वीच्या राज्यात ( भटशाहीमध्ये ) जे काही द्वेषामुळे, धर्मसंबंधाने, नीतिसंबंधाने, राज्यसंबंधाने आणि दुसऱ्या अनेक गोष्टींच्या संबंधाने जुलूम होत असत, त्या सर्वांतून ती एकदाची सुटली."[५] 'आमचे राज्य हे कायद्याचे राज्य आहे. त्यात प्रशासकांच्या अरेरावी-पणाला व लहरीपणाला वाव नाही' असा या सरकारचा दावा होता. कायद्यापुढे सर्व नागरिक समान आहेत असे ब्रिटिश न्यायपद्धतीचे एक प्रमुख तत्त्व होते. एकच भारतीय दंडसंहिता देशभर लागू करण्यात आली. सार्वजनिक कायद्याच्या अंमल-बजावणीत ब्राह्मण व शूद्र, सुशिक्षित व निरक्षर, श्रीमंत व गरीब, स्त्री व पुरुष असा भेदभाव राहिला नाही. जुन्या समाजव्यवस्थेने शिक्षण, व्यवसाय, राहाणीमान इत्यादी बाबतींत खालच्या जातींतील लोकांवर अनेक जाचक निर्बंध लादले होते, ते या अमदानीत हळूहळू दूर झाले. सरकारने प्रत्येक मनुष्याचा ज्ञानार्जनाचा हक्क मान्य केला होता, तेव्हा शासकीय विद्यालयांचे दरवाजे अर्थातच सर्वांना तत्त्वतः खुले झाले. खिस्ती धर्मोपदेशकांच्या शाळांतूनही समाजाच्या निरनिराळ्या थरांतील मुले शिकू लागली. इंग्रजी विद्येचा संस्कार झालेल्या बहुजनसमाजातील या नव-शिक्षितांना आधुनिक उद्योगप्रधान पाश्चात्त्य संस्कृतीची व उदारमतवादी विचार-प्रणालीची तोंडओळख झाली; आणि आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोण पुष्कळच बदलला. मोठमोठ्या शहरांतून जात व तिच्याशी जोडला गेलेला ठरावीक व्यवसाय यांची उत्तरोत्तर फारकत होऊ लागली. ज्याला त्याला आपल्या इच्छेप्रमाणे हवा तो व्यवसाय करण्याची मोकळीक मिळाली. जातिसंस्थेचा पाया अत्यल्प प्रमाणात का होईना डळमळीत झाला. दळणवळणाची नवी नवी साधने अस्तित्वात आली. दळणवळणाची सुलभता आणि व्यवसायस्वातंत्र्य यांमुळे काही लोकांना गावगाड्याच्या बंदस्त चाकोरीबाहेर पडण्याची संधी मिळाली. सामाजिक गुलामगिरीचे जोखड झुगारून देण्यास उद्युक्त झालेल्या जोतीरावांनी इंग्रजांच्या शासनपद्धतीचे अशा तऱ्हेने गोडवे गाइले तर त्यात काहीच आश्चर्य नाही. परंतु दादोबा पांडुरंग, लोकहितवादी, रानडे, तेलंग इत्यादी उच्चवर्णीय विचारवंतानीही या राज्यकर्त्यांचा मुक्तकंठाने गुणगौरव केला आहे. इंग्रज सर-कारकडून शूद्रातिशूद्रांना मिळालेली सर्वांत जास्त स्पृहणीय देणगी जर कोणती असेल, तर ती म्हणजे विचारस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य ही होय. हे स्वातंत्र्य जर मिळाले नसते, तर आपण कोणताही आडपडदा न ठेवता आपले विचार इतक्या

मोकळेपणाने मांडू शकलो नसतो हे जोतीरावांनी निःसंदिग्धपणे अनेकदा नमूद केले आहे. ब्राह्मणशाहीच्या ' कायिक दास्यत्वापासून ' आता आपली सुटका झाली आहे. अस्पृश्यतेसारख्या अमानुष रूढीवर उघडपणे प्रहार करताना आपल्याला कोणी अडवू शकत नाही. याचे सर्व श्रेय राज्यकर्त्यांच्या उदार धोरणाकडे जाते. म्हणून " अंत्यजांनो, तुम्ही उपकार स्मरा । पोटीं गच्च धरा । इंग्लिशास "[६] असे त्यांनी आपल्या अस्पृश्य बांधवांस आवर्जून सांगितले आहे.

## कुणब्याची दाद नाही

इंग्रजांची राज्यव्यवस्था व कायदेपद्धती या न्यायप्रवण व निःपक्षपाती आहेत. त्यांत समतेचे तत्त्व अनुस्यूत आहे यावर जोतीरावांचा अढळ विश्वास होता. तरी देखील शेतकऱ्यांची परिस्थिती दिवसेंदिवस खालावत चालली आहे हे त्यांना तीव्रतेने जाणवत होते. विद्याबंदी उठली असूनही शूद्रातिशूद्रांची मुले शिकून पुढे येताहेत असे दिसत नाही. सरकारदरबारी त्यांची कोणीच दाद घेत नाही. त्यांची फसवणूक झाली, त्यांच्यावर जुलूम झाला तर पुष्कळदा त्यांना न्याय मिळवणे अशक्यप्राय होऊन बसते. शासकीय अधिकारी त्यांना मदत करण्याऐवजी त्यांच्या अज्ञानाचा, भाबडे-पणाचा गैरफायदा घेऊन चक्क त्यांची लुबाडणूक करतात. या कष्टकरी लोकांविषयी जोतीरावांना खरा कळवळा असल्याने त्यांच्या नजरेतून ही वस्तुस्थिती निसटली नाही. आपल्या उच्चवर्णीय विचारवंतांनीही इंग्रजांच्या शासनपद्धतीला आधारभूत असलेल्या उदात्त तत्त्वांची वारंवार प्रशंसा केली आहे. तरी देखील भारतातील लोकांची दैन्यावस्था का दूर होत नाही, याची मीमांसा करताना त्यांनी या बाबतीत प्रामुख्याने येथील नोकरशाहीला जबाबदार धरले आहे. जोतीरावांचे या प्रश्नासंबंधीचे निदानही फारसे वेगळे नाही. मात्र उच्चवर्णीय विचारवंतांच्या टीकेचा रोख व्हाइसराय व गव्हर्नर, त्यांची कायदेमंडळे, आणि वरिष्ठ दर्जाचे युरोपियन अधिकारी यांच्याविरुद्ध आहे. जोतीरावांनी मात्र युरोपियन शासनकर्त्यांबरोबरच लहानमोठ्या महाराष्ट्रीय अंमलदारांवरही ठपका ठेवला आहे. एकोणिसाव्या शतकात शासनातील बहुतेक सर्व दुय्यम दर्जाचे पदाधिकारी ब्राह्मण व तत्सम जातींचे होते. त्यांना शिक्षणाची व प्रशासनकार्याची परंपरा होती. नव्या अमदानीत थोडेबहुत शिकून त्यांनी शासनयंत्रणेतील लहानमोठी अधिकारपदे ताबडतोब हस्तगत केली. हे सगळे लोक प्रायः अर्धशिक्षित होते; स्वार्थी व संकुचित वृत्तीचे होते. पण नित्याच्या व्यवहारात गरीब शेतकऱ्यांना त्यांच्याकडेच पुन्हा पुन्हा खेटे घालावे लागत असत. त्या वेळी त्यांना सामान्यतः त्यांच्या सहानुभूतिशून्यतेचा व मिजासखोरपणाचा अनुभव येत असे. म्हणूनच जोतीरावांनी या हिंदुस्थानात नावाला जरी 'टोपीवाल्यांचे

राज्य ' असले, तरी गाव, महाल, तालुका व जिल्हा या चाऱ्ही पातळ्यांवर भट-शाहीच अस्तित्वात आहे असे म्हटले आहे.

" सत्ता तुझी राणीबाई । हिंदुस्थानीं जागृत नाहीं ।।
जिकडेतिकडे ब्राह्मणशाई । डोळे उघडूनी पाहीं ।।
खेडेगांवीं कुळकर्णी । आहे लेखणीचा धणी ।।
माहालामध्ये महालकरी । जसा अष्ट अधिकारी ।।
यमवत मामलेदार । शुद्रा शिक्षा अनीवार ।।
धूर्त चिटणिसांचे पुढें । काय कलक्टर बापुडें ।।
रेविन्युची दप्तरदारी । ब्राह्मण किती अधिकारी ।।
चहूंकडे भटभाई । कुणब्याची दाद नाहीं ।
जोती म्हणे धाव घेई । दुष्टापासूनी सोडवीं । " [७]

या अभंगात महाराणीच्या न्यायीपणावर विश्वास आणि ब्राह्मणशाहीविषयीची कटुता अशा परस्परविरोधी भावना व्यक्त झाल्या आहेत.

बहुजनसमाजात शिक्षणाचा प्रसार तेव्हा फारच कमी होता. ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या शाळांतून शूद्रातिशूद्रांची काही थोडी मुले शिकत असत. सरकारी शाळेत तर त्यांचा सहसा निभाव लागत नसे. मग शासनयंत्रणेत त्यांचा शिरकाव कुठून होणार ? " एकंदर सर्व धार्मिक मिशनरी वगैरे युरोपियन लोकांच्या योगाने परागंदा झालेल्या शेतकऱ्यांच्या मुलांस मोठमोठाल्या शहरी थोडीशी विद्या प्राप्त झाल्याबरोबर त्यांस गोऱ्या कामगारांच्या दयाळूपणामुळे चुकून आपल्या कचेऱ्यांनी जागा दिल्या की, एकंदर सर्व कचेऱ्यांतील भटकामगार त्यांच्याविषयी नाना प्रकारच्या नालस्त्या गोऱ्या कामगारांस सांगून त्यांना अखेर कामावरून हाकून देववितात. " [८] जोतीरावांच्या या विधानात अतिशयोक्ती आहे असे समजण्याचे कारण नाही. जुन्या काळात ब्राह्मणात भट, पंडित, हरदास व सराफ असे चार रोजगार असत. पण " हल्ली बहुधा सर्व रोजगार ब्राह्मणांनी बळकाविले आहेत. म्हणजे येकीकडे भटांनी धर्म आणि दुसरीकडे गृहस्थांनी रोजगार अशा दोन्ही बाजू धरून इतर लोकांस आत येऊ देऊ नये अशी शकल केली होती. " [९] लोकहितवादींचे हे उद्‌गार जोतीरावांच्या प्रतिपादनाची सत्यता पटवून देण्यास पुरेसे आहेत.

तत्कालीन शासनयंत्रणेत वरिष्ठ अधिकारी इंग्रज असले, तरी त्यांच्या हाताखालचे वेगवेगळ्या श्रेणींतील जवळपास सर्व पदाधिकारी ब्राह्मणच होते. इंग्रज अधिकाऱ्यांना येथील लोकांची भाषा, रीतरिवाज, जातीजमातींचे परस्परसंबंध यांची अगदीच थोडी माहिती असे. शिवाय ते ऐषआरामी वृत्तीचे असून स्वतःच्या शिकारीचा शौक पुरवण्यात मग्न असत. त्यामुळे आपल्यापुढील प्रत्येक प्रकरणात जातीने लक्ष न घालता

ते सर्व काम ते पुष्कळदा आपल्या खात्यातील अधिकाऱ्याकडे सोपवत, आणि त्यांच्या शिफारशीला धरून निर्णय देत. त्यामुळे उच्चवर्णीय अधिकाऱ्यांचे चांगलेच फावत असे. " सरकारी गोरे अधिकारी हे बहुतकरून ऐषआरामात गुंग असल्यामुळे त्यांना शेतकऱ्यांचे वास्तविक स्थितीबद्दल माहिती करून घेण्यापुरती सवड होत नाही व या त्यांच्या गाफीलपणाने एकंदर सर्व सरकारी खात्यांत ब्राह्मण कामगारांचे प्राबल्य असते. या दोन्ही कारणांमुळे शेतकरी लोक इतके लुटले जातात की, त्यांस पोटभर भाकर व अंगभर वस्त्रही मिळत नाही." [१०] शूद्र शेतकरी कितीही नाडला गेला, नागवला गेला तरी त्याबाबत तक्रार नोंदवण्याची त्याला हिंमत होत नाही. कारण कोणाही एका अधिकाऱ्याविरुद्ध कुणी जरी ब्र काढला तरी बाकीच्या सर्व अधिकाऱ्यांचा जातभाईपणा एकदम जागा होतो. एकमेकांच्या गैरकृत्यांवर पांघरूण घालण्यास ते नेहमीच तयार असतात. मग त्या गरीब बिचाऱ्या शेतकऱ्याला पदोपदी त्यांचा जाच सहन करावा लागतो. पुढे सर्व बाजूंनी कोंडमारा झाल्यावर अखेर त्याच्यावर पस्तावण्याची पाळी येते. तात्कालिक गरज भागवण्यासाठी एकदा का शेतकऱ्याला सावकाराच्या दारी जावे लागले की, मग तो ठार बुडालाच असे समजावे. कारण सावकार ब्राह्मण असो वा मारवाडी असो, शेतकऱ्याच्या अज्ञानाचा व अगतिकतेचा जास्तीत जास्त फायदा उठवण्यास तो टपलेलाच असतो. त्याचा हिशोब चुकता करता करता शेतकरी अगदी मेटाकुटीस येतो. कितीही फसगत झाली, तरी त्याचा काही इलाज चालत नाही. दाद मागण्यासाठी न्यायालयात जायचे म्हटले, तरी तेथेही सर्व पदाधिकारी सावकाराशी ऋणानुबंध असलेले उच्चवर्णीयच. "पहिले वर्षी शेतसारा वारण्यापुरते कर्ज ब्राह्मण सावकारापासून काढून त्यास मळा गहाण देऊन रजिस्टर करून दिला. पुढे त्याने मन मानेल तसे, मुद्दल कर्जावरील व्याजाचे कच्च्यांचे बच्चे करून माझा बारवेचा मळा आपल्या घशात सोडला. ज्या सावकाराच्या आईचा भाऊ रेव्हेन्यूसाहेबांचा दफ्तरदार, चुलता कलेक्टरसाहेबांचा चिटणीस, थोरल्या बहिणीचा नवरा मुनसफ आणि बायकोचा बाप या तालुक्याचा फौजदार, याशिवाय एकंदर सर्व सरकारी कचेऱ्यांत त्याचे जातवाले ब्राह्मण कामगार, अशा सावकाराबरोबर वाद घातला असता, तर त्याच्या सर्व ब्राह्मण आप्तकामगारांनी हस्तेपरहस्ते भलत्या एखाद्या क्षुल्लक कारणावरून माझा सर्व उन्हाळा केला असता." [११] शेतकऱ्याला नेहमीच ही धास्ती असते. शिवाय साक्षीपुरावे दाखल करण्याचे काम देखील कमी जिकिरीचे नसते. या बाबतीत त्याला खेड्यातील आपल्या 'आडमूठ अज्ञानी' शेतकरी बांधवांवर विसबून राहावे लागते. "एक तर ते अक्षरशून्य असल्यामुळे त्यांच्या स्मरणशक्त्या धड नसतात व दुसरे त्यांस मागच्या पुढच्या सवालांचा संदर्भ जुळून जबान्या देण्याची स्फूर्ती नसते, यामुळे त्यांच्या

जबान्या घेतेवेळी धूर्त कामगार त्यांस इतके घाबरे करितात की त्यांस 'दे माय धरणी ठाव' होतो. त्यांनी खरोखर जे काही डोळयांनी पाहिले व कानांनी ऐकले असेल, त्याविषयी इत्थंभूत साक्ष देण्याची त्यांची छातीच होत नाही." [१२] अशी एकंदर स्थिती असल्याने तो कोर्टकचेरी करण्यास सहसा धजत नाही. आपल्या नशिबाला बोल लावून तो जागच्या जागी स्वस्थ बसतो.

अर्धपोटी राहून दिवसभर कष्ट उपसणाऱ्या शेतकऱ्यांविषयी तत्कालीन उच्च-वर्णीय सरकारी अधिकाऱ्यांना यत्किंचितही सहानुभूती नव्हती. त्यांच्या हलाखीचा जरा सुद्धा विचार न करता ते हरएक कामात त्यांच्याकडून बेधडक लाच घेत असत. त्यापायी शेतकऱ्यांचे किती नुकसान होत असेल त्याची कल्पनाही करवत नाही. दुष्काळामुळे किंवा टोळधाडीमुळे कित्येकदा शेतकऱ्यांचे अतोनात नुकसान होते. निसर्गाची ही निर्घृणता पाहून मन अगदी सुन्न होते. परंतु माणूसच जेव्हा निर्दयपणे माणसाला लुबाडताना दिसतो, तेव्हा कुणाही सत्प्रवृत्त मनुष्याला त्याचा संताप आल्याखेरीज राहात नाही लोकहितवादींसारख्या उच्चवर्णीय लेखकांप्रमाणेच म. फुले यांनीही सरकारी अधिकाऱ्यांच्या या अनिर्बंध लाचखाऊपणाचा वारंवार निषेध केला आहे.

"भट कुळकर्णी शुद्रा चिथवीती । कज्जे लाविताती । गांवोगांवीं ॥
कज्जांच्या नादांत शुद्रा कर्ज देती । भट लांच खाती । सर्वांचीही ॥" [१३]

"मामलेदार कचेरीतील ब्राह्मणकामगार अक्षरशून्य अशा वादीप्रतिवादींच्या व त्यांच्या साक्षीदारांच्या जबान्या घेतेवेळी, ज्या पक्षकारांकडून त्यांची मूठ गार झाली असेल, त्यांच्या जबान्या घेतेवेळी, त्यांस काही सूचक प्रश्न घालून अनुकूल जबान्या तयार करितात. परंतु ज्या पक्षकारांकडून त्यांचा हात नीट ओला झाला नसेल, त्यांच्या जबान्या लिहितेवेळी त्यांमध्ये एकंदर सर्व मुद्दे मागेपुढे करून अशा तयार करितात की, त्यांजपासून वाचणाराच्या किंवा ऐकणाऱ्यांच्या मनात त्या कज्ज्याचे वास्तविक स्वरूप न येता, त्यांचा समज त्याविरुद्ध होईल." "एकंदर सर्व खेड्या-पाड्यांनीसुद्धा एक जगप्रसिद्ध म्हण पडली आहे. ती अशी की, सर्व खात्यांत ब्राह्मण कामगारांच्या हातांवर अमुकतमुक केल्याशिवाय ते आपल्या गरिबांच्या कामास हातच लावीत नाहीत. त्यांच्या डोमल्यावर घालायास काही तरी बरोबर घ्या, तेव्हा बाहेर निघा." [१४]

लोकहितवादींनी तर याहून तपशीलवार लिहिले आहे. "जरी इंग्रजांनी भगीरथ प्रयत्न केला, तरी हे लोक अडून अडून लाच खातात हे जगप्रसिद्ध आहे आणि वास्तविक पाहिले तर जो मनुष्य मुनसफाचे काम करितो, तो वेतनाइतका खर्च ठेवून पाच वर्षात दाहा हजार रुपये जवळ करितो. तसेच शिरस्तेदार आपले सर्व वेतना-

इतका किंबहुना जास्तीच खर्च करून सालात पाच हजार रुपये जवळ करितात. तसाच नाझरही सालाचे पाच हजार रुपये मिळवितो. सामान्य कारकूनही दाहा वर्षे काम करितो, तर तो दोन हजार रुपये जवळ करितो. तसेच चपराशी पगाराचे दुप्पट मिळवितात. फौजदार व मामलेदारही यांजप्रमाणे. जर बारीक शोध केला, तर ही सर्व बातमी लागते. आणि जरी जड्ज किंवा कलेक्टरसाहेब प्रमुख असतात; तरी त्यांचा इलाज चालत नाही." [११] जोतीरावांनी आपल्या 'गुलामगिरी' या ग्रंथात शेवटी 'भटकामगार इंजनियर खात्यात कशी पेंढारगर्दी करितात' याविषयीचा स्वत: रचलेला एक छोटासा पवाडा दिला आहे. त्यांनी खडकवासल्याचा तलाव आणि येरवड्याचा पूल यांच्या बांधकामासाठी दगड व चुना पुरवण्याचे ठेके घेतले होते. त्यामुळे या खात्यातील कामकाजाचा त्यांना प्रत्यक्ष अनुभव होता. त्यात खोटेपणा व लबाड्या कशा केल्या जातात त्याचे या पवाड्यात त्यांनी वर्णन केले आहे.

त्या काळच्या अधिकाऱ्यांपैकी बरेचजण ब्राह्मण होते हे खरे आहे. परंतु पेशवाईत ब्राह्मणांची जी जीवनसरणी होती, ती जशीच्या तशीच अव्वल इंग्रजीतही कायम होती असे म्हणता येणार नाही आधुनिक युगातील नव्या विचारप्रवाहांचे संस्कार त्यांच्या मनावर थोडेबहुत झाले होते. धर्मभोळेपणाच्या अनेक जुनाट समजुतींना त्यांनी फाटा दिला होता; काही अनिष्ट रूढींच्या बंधनातून ते बाहेर पडले होते; परंतु जन्मसिद्ध उच्चनीचभावाच्या म्हणजेच वर्णश्रेष्ठत्वाच्या कल्पनेला त्यांनी सोडचिठ्ठी दिलेली नव्हती. कारण या कल्पनेत त्यांचे हितसंबंध गुंतलेले होते. परंतु त्यांच्या व शूद्रातिशूद्रांच्या परस्परसंबंधांवर ब्रिटिशांच्या उदार राजनीतीचे ऐसपैस आवरण होते. त्यामुळे त्यांच्या कारभारातील त्यांचा स्वार्थ निरक्षर शेतकऱ्यांच्या सहजासहजी ध्यानात येत नव्हता. तरीदेखील त्यापासून होणारे दुष्परिणाम या कष्टकरी समाजाला भोगावेच लागत होते. उदारमतवादाच्या मूलतत्त्वांना हरताळ फासून शासनव्यवहारात सगळीकडे बेजबाबदारपणा, वशिलेबाजी, पक्षपात, लाचलुचपत इत्यादी गोष्टी बोकाळल्या होत्या. अशा स्थितीत कष्टकरी समाजाची दैन्यावस्था अधिकाधिक दु:सह होत गेली नाही तरच नवल!

## असे आंधळे सरकार

इंग्रजांच्या न्यायनिष्ठेवर व स्वातंत्र्यप्रियतेवर जोतीरावांचा विश्वास होता. शूद्रातिशूद्रांच्या कायिक व मानसिक दास्यमुक्तीसाठी ईश्वरी योजनेतूनच इंग्लंड व हिंदुस्थान यांचा संबंध जुळून आला आहे अशी त्यांची धारणा होती. इंग्रजांची राजनीती ही प्रगमनशील व सर्व नागरिकांच्या मानवी हक्कांची कदर करणारी आहे. तेव्हा त्यांचे राज्य या देशात दीर्घकाळ राहावे असे त्यांना मनापासून वाटत होते. तरीदेखील

त्यांची धोरणे व प्रत्यक्ष कारभार यांची पाहणी करताना, त्यात कुठे कष्टकरी समाजाच्या हितसंबंधांना बाधक असे काही आढळले, तर त्यावर ते सडेतोडपणे टीका केल्याखेरीज राहात नसत. मूठभर वरिष्ठ दर्जाचे इंग्रज अधिकारी सोडले, तर या मुलखातील बहुतेक सर्व शासनव्यवहार ब्राह्मणांच्या हातात होता. इंग्रज अधिकाऱ्यांना येथील सामाजिक परंपरेचे व खेड्यापाड्यांतील लोकव्यवहाराचे सम्यग्ज्ञान होण्याचा सुतराम् संभव नव्हता. साहजिकच हाताखालचे माहीतगार अधिकारी सांगतील त्यावर त्यांस विसंबून राहावे लागे. त्यातून प्रत्येक प्रश्नाकडे ब्राह्मणी चष्म्यातून पाहण्याची त्यांना सवय जडली होती. बहुजनसमाजाची बाजूच सहसा त्यांच्या कानावर येत नसे. त्यामुळे कित्येकदा अगदी चुकीचे निर्णय घेतले जात. कधी योग्य निर्णय घेतले गेले, तरी अंमलदारांचे पूर्वग्रह व स्वार्थलोलुपता यांमुळे त्यांची कार्यवाही निःपक्षपातीपणाने होत नसे. महाराष्ट्रातील परिस्थती इतर प्रांतांहून बरीचशी वेगळी होती. येथे धर्म, शिक्षण, प्रशासन, वृत्तपत्रव्यवसाय, सावकारी, न्यायदान इत्यादी सर्व क्षेत्रांत ब्राह्मणांचे वर्चस्व होते.

“ अहो कशाची भार । कित्येक ब्राह्मण अम्मलदार ॥
कोणी पंच फौजदार । कोणी शिरस्तेदार । कोणी कुलकर्णी सावकार ॥
मोठमोठे दुकानदार । सारे भटच अम्मलदार । गरीब शूद्रावर कहर ॥
हे पहा करीती जोजार । असें आंधळें सरकार ॥ ”[१६]

समाजाच्या दुर्बल घटकांवर होणाऱ्या अशा अन्यायाबद्दल जोतीरावांनी अखेर सरकारलाच जबाबदार धरले होते म्हणूनच त्यांनी

“ राणीबाई । शोधून पाही ॥
पाप हें तुझ्या शिरावर ॥
काय ! तूं जबाब देणार ? ”[१७]

असे परखडपणे म्हटले आहे. सरकारच्या अन्यायमूलक कारभारावर त्यांनी जागोजाग कोरडे ओढले आहेत गरिबांच्या लाभहानीचा प्रश्न आला, तर त्यांचा आवाज उठवताना त्यांनी कुणाचाही मुलाहिजा ठेवला नव्हता. कष्टकऱ्यांच्या श्रमांतून निर्माण झालेल्या संपत्तीची उधळपट्टी करण्यास त्यांचा सक्त विरोध होता. व्हाइसरायच्या पुणे भेटीच्या निमित्ताने शहर सुशोभित करण्यासाठी नगरपालिकेने एक हजार रुपये खर्च करण्याच्या सूचनेस एकट्या जोतीरावांनी विरोध केला होता. ही गोष्ट त्यांच्या निर्भयपणाची व लोकाभिमुखतेची निदर्शक आहे.

जोतीरावांचा आणखी एक महत्त्वाचा आक्षेप तटस्थतेच्या धोरणावर होता. आपल्या राज्याचे स्थैर्य ढळू नये म्हणून सरकारने प्रजाजनांच्या धार्मिक व सामाजिक व्यवहारात हस्तक्षेप न करण्याचे धोरण स्वीकारले होते. आरंभीच्या काळात समाज-

सुधारणेला साह्यकारक असे काही कायदे सरकारने केले होते. पण अठराशे सत्तावनच्या उठावानंतर ते या बाबतीत जास्त सावधपणे वागू लागले. तटस्थतेचे हे धोरण वरवर पाहता साळसूदपणाचे दिसले, तरी त्याचे खालच्या जातींतील लोकांच्या जीवनावर काय परिणाम होत आहेत, याचा विचार करणे सरकारचे कर्तव्य होते. याबाबतीतली सरकारची उदासीनता जोतीरावांना खटकत होती. हिंदू धर्मसंस्था व समाजव्यवस्था ह्या दोन्ही विषमता आणि जन्मसिद्ध अधिकारभेद यांवर आधारलेल्या आहेत. त्यांनी जोपासलेल्या परंपरा व वहिवाटी पुढे चालू ठेवणे म्हणजे त्यांमधून शूद्रातिशूद्रांवर होणारा अन्याय टिकवून धरण्यास मदत करण्यासारखे आहे. निर्हस्त-क्षेपाच्या नावाखाली जुन्या देवस्थानांची इनामे सुरक्षित ठेवल्यानंतर तेथे शेतकऱ्याच्या श्रमांतून निर्माण झालेल्या संपत्तीचा विनियोग कशा रीतीने होतो ते पाहण्याची जबाबदारी सरकारची नाही का ? परंपरेने चालत आलेल्या "या वहिवाटी आमचे भेकड इंग्रज सरकार जशाच्या तशाच आज दिवसपावेतो चालू ठेवून त्याप्रीत्यर्थ कष्टाळू शूद्रादीअतिशूद्र शेतकऱ्यांचे निढळाचे घामाचे पट्टीचे द्रव्यातून हजारो रुपये साल दरसाल खर्ची घालते."[१८]

धार्मिक तटस्थतेच्या दुसऱ्या एका अंगाकडे लक्ष पुरवण्याची आवश्यकता आहे. सरकारी शाळांतून धर्मशिक्षण देणे श्रेयस्कर नाही असे सरकारला वाटत होते. म्हणून त्यांनी आपल्या शाळांतून बायबलचे निरूपण करण्यास बंदी केली. पण हे धोरण तरी समदृष्टीने व काटेकोरपणे पाळण्यात आले का ? उलट जातिधर्म, वर्णविभाग यांचा पाठपुरावा करणारे जुनेनवे वाङ्मय या शाळांतून सर्रास शिकविले जाते. ही विसंगती राज्यकर्त्यांच्या ध्यानात येत नाही का ? कायद्यापुढे सर्व नागरिक आणि समाजाचे वेगवेगळे घटक समान आहेत हे इंग्रजांच्या राजनीतीचे एक प्रमुख तत्त्व आहे. मग राजकीय क्षेत्रात समता आणि सामाजिक क्षेत्रात विषमता हा अंतर्विरोध कायम राहिला, तर सामाजिक जीवनात सलोखा व सुसंवाद निर्माण होईल का ? असा जोतीरावांचा सरळ सवाल होता. या धर्मविषयक चुकीच्या धोरणामुळे सामाजिक परिवर्तनाचे कार्य मागे पडून त्याला विरोध करणाऱ्या शक्ती मात्र बळावत आहेत अशी त्यांची खात्री होऊन चुकली होती.

आपल्या देशातील सामाजिक विषमता नाहीशी झाल्याखेरीज शूद्रातिशूद्रांचे दैन्य फिटणार नाही, खऱ्या अर्थाने त्यांची उन्नती होणार नाही. त्यासाठी प्रथमतः शासनातील आणि सामाजिक जीवनाच्या अन्य क्षेत्रांतील सत्तेचा असमतोल दूर झाला पाहिजे. ब्राह्मण व तत्सम जाती आणि शूद्र शेतकरी व अतिशूद्र यांचे हित-संबंध परस्परविरोधी आहेत. सरकारी व बिनसरकारी सत्तास्थाने ही उच्चवर्णीयांची मक्तेदारी होऊन बसली आहे. तेव्हा लोकसंख्येच्या प्रमाणात नोकऱ्यांची विभागणी

झाल्यावाचून कष्टकरी समाजाची कुचंबणा थांबणार नाही. आज समाजाच्या सर्व थरांतून लहानमोठ्या शासकीय पदांची जबाबदारी सांभाळू शकतील असे लोक एकदम मिळणार नाहीत. परंतु सरकारने बहुजनसमाजाच्या शिक्षणाकडे खास लक्ष दिले, तर त्यामधून अशा योग्यतेचे लोक पुढे आल्याखेरीज राहणार नाहीत. आरंभी समाजाच्या वेगवेगळया थरांतील प्रशिक्षित पंतोजी तयार केले पाहिजेत. म्हणजे ते आपल्या थरांतील लोकांना विद्येची गोडी लावतील. मात्र काही झाले तरी शूद्राति-शूद्रांना शासनाच्या वेगवेगळया खात्यांत प्रवेश मिळाल्याखेरीज त्यांच्या जीवनाची कोंडी फुटणार नाही. "आपल्या दयाळू सरकारने प्रथम भट समाजाच्या संख्या-प्रमाणाने एकंदर सर्व खात्यांत भट कामगार नेमू नयेत, असे माझे मत नाही. परंतु त्याच प्रमाणाने बाकी सर्व जातींचे कामगार नच मिळाल्यास सरकारने त्याऐवजी फक्त युरोपियन कामगार नेमावेत. म्हणजे एकंदर सर्व भट कामगारांस सरकारसहित अज्ञानी शूद्रांचे इतके नुकसान करता येणार नाही."[१९] युरोपियन कामगार कमी स्वार्थी असतात असे नाही. पण उच्चवर्णीय व शूद्रातिशूद्र यांच्या संबंधात ते त्रयस्थ-पणे खरी बाजू उचलून धरतील व योग्य निवाडा करतील अशी जोतीरावांची अपेक्षा होती. त्यांचा मुख्य कटाक्ष सत्तास्थानांच्या मक्तेदारीवर होता.

"अनुभव स्वतां लक्षून । सांगतों खरें निक्षून ॥
सर्व जाती निवडून । घ्याव्या संख्या प्रमाण ॥
द्यावीं कामें नेमून । होईल सुख साधन ॥
घालितों पदरीं चुकीस । नेमितां एका जातीस ॥
प्रवेश नाहीं शूद्रांस"[२०]

## वर्तमानपत्रे व सार्वजनिक संस्था

वर्तमानपत्र हे लोकांची गाऱ्हाणी वेशीवर टांगण्याचे, लोकमताला वळण लावण्याचे, सरकारकडून लोकांना न्याय मिळवून देण्याचे एक प्रभावी साधन आहे. एकोणिसाव्या शतकातील बहुतेक सर्व मराठी पत्रकार ब्राह्मण व तत्सम जातींचे होते. त्यामुळे साहजिकच उच्चवर्णीय जीवनातील अनेकविध प्रश्नांवर त्यांनी आपले लक्ष केंद्रित केले. खेड्यापाड्यांतील गरीब कष्टकऱ्यांच्या प्रश्नांना जाऊन भिडण्याचा विचारदेखील त्यांच्या मनाला शिवला नाही. त्या वेळच्या शासनयंत्रणेतील बहुसंख्य पदाधिकारी ब्राह्मण होते. राज्यकारभाराच्या बाबतीत त्यांचा खेड्यांतील शेतकऱ्यांशी वारंवार संबंध येत असे. तरी देखील ते त्यांच्याशी कधी समरस झाले नाहीत. त्यांच्या अडीअडचणींची त्यांनी कधी दखल घेतली नाही. उलट स्वतःचा स्वार्थ साधण्या-साठी त्यांनी वेळोवेळी त्यांची लुबाडणूक मात्र केली. शेतकऱ्यांवरील या अन्यायाला

उच्चवर्णीय पत्रकारांनी तत्परतेने वाचा फोडली नाही. सरकारच्या धोरणाची ते परखडपणे चिकित्सा करीत असत. इंग्रज अधिकाऱ्यांच्या कार्यपद्धतीतील दोष ते निर्भीडपणे दाखवून देत असत. पण स्वकीय अंमलदारांनी कितीही गैरकारभार केला, तरी त्यांच्याविरुद्ध हत्यार उपसण्याची त्यांची तयारी नव्हती. कारण ते त्यांचे 'जातभाऊ' होते. शिवाय कोणतेही नवे धोरण आखताना लोकमत अजमावण्याची इंग्रज सरकारची प्रथा होती. या बाबतीतही ते उच्चवर्णीय पत्रकारांच्या प्रतिपादनावर विसंबून राहात. जोतीरावांच्या मते ही सरकारची मोठी चूक होती. कारण त्यांचे मत हे सर्व समाजाचे मत नव्हते. या पत्रकारांचा व शूद्रातिशूद्रांचा अर्थाअर्थी काही संबंध नव्हता. त्यांच्याबद्दल त्यांना यत्किंचितही सहानुभूती नव्हती. तेव्हा त्यांना या कष्टकरी समाजाचे मनोगत कुठून कळणार? चुकून एखाद्या परधर्मी पत्रकाराने वेगळा सूर काढला, तरी मराठी पत्रांतील मजकुराचा गोषवारा काढून सरकारास सादर करण्याचे काम ब्राह्मण अधिकाऱ्याकडेच असे. त्यामुळे कष्टकरी समाजाचे मत सरकारपुढे सहसा कधी जात नसे. या दृष्टीने तत्कालीन पत्रकारितेचा शूद्रातिशूद्रांच्या दास्यमुक्तीच्या कार्याला काही उपयोग झाला नाही. या पत्रकारांची संकुचित वृत्ती व पक्षपातीपणा यांवर जोतीरावांनी निःशंकपणे ताशेरे झाडले आहेत. "एकंदर सर्व भट वर्तमानपत्रकर्त्यांची आणि शूद्र व अतिशूद्रांची जन्मातून एकदासुद्धा अशा कामी गाठ पडत नाही. त्यातून बहुतेक अतिशूद्रांस तर वर्तमानपत्र म्हणजे काय, कोल्हा का कुत्रा, का माकड, हे काहीच समजत नाही. तर मग अशा अनओळखी अतिशूद्रांची मते ह्या सर्व सोवळ्या वर्तमानपत्रांस कोठून व कशी कळणार?... एकंदर सर्व खात्यांत त्यांच्या जातीच्या भट कामगारांचा भरणा असल्यामुळे एकंदर सर्व शूद्रांसहित अतिशूद्रांचे नुकसान होत आहे, याविषयी त्यांस शोध काढण्यास फुरसत जर होत नाही म्हणावे, तर समुद्राच्या पलीकडील लंदन शहरातील राणी सरकारच्या मुख्य प्रधानाने आपल्या स्वप्नात हिंदुस्थानाविषयी काय काय बरळला, याविषयी खित्तमबातमी काढण्यास तरी त्यांस कोठून फुरसत होते."[२१]

जोतीरावांच्या काळात ज्या अनेक सार्वजनिक संस्था उदयास आल्या, त्यांपैकी काहींचा उद्देश आधुनिक युगाशी सुसंगत अशा राजकीय जाणिवा लोकांच्या मनात निर्माण करणे आणि त्यांना अन्यायाविरुद्ध सरकारकडे दाद मागावयास प्रवृत्त करणे हा होता. पुणे येथील सार्वजनिक सभा आणि इंडियन न्याशनल कॉंग्रेस या दोन संघटना सतत जोतीरावांच्या डोळ्यांसमोर होत्या. सार्वजनिक आणि न्याशनल ही त्यांना लावलेली विशेषणे अत्यंत व्यापक अर्थाची होती. पण प्रत्यक्षात त्यांत हिंदू, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती या समाजांतील सुशिक्षित लोकच होते. कुळंबी, साळी, कोष्टी, खत्री, लोहार, सुतार, चांभार, महार, मांग या खालच्या थरांतील लोकांपैकी कुणीही या

संस्थेचे सभासद नव्हते. सार्वजनिक सभेत तर सर्व कार्यकर्ते बहुतांशी ब्राह्मणच होते. मग अशा संघटनांना मोठमोठी नावे देण्यात काय हशील ? असा प्रश्न जोतीरावांनी उपस्थित केला होता. त्याला ह्या संघटनांचे समर्थक काय उत्तर देण्याचा संभव आहे याची त्यांना कल्पना होती. ह्या दोन्ही संस्थांनी आतापर्यंत ठरावांच्या रूपाने ज्या मागण्या केल्या आहेत, त्यांतील एकही मागणी कोणत्याही एका धर्माच्या, पंथाच्या वा जातीच्या लोकांसाठी नाही. त्या साऱ्या मागण्या सर्वांसाठी आहेत. तेव्हा या संस्थांची भूमिका व्यापक नाही असे म्हणणे योग्य होणार नाही. या युक्तिवादाला जोतीरावांनी दिलेले प्रत्युत्तर अगदी साधे पण अर्थपूर्ण आहे. "तू अशी कल्पना कर की, हल्ली सरकाराने अशी जाहिरात दिली आहे की, ज्या कोणास संस्कृत, मराठी आणि इंग्लिश भाषेचे ज्ञान झाले असून त्यास त्या सर्व भाषांमध्ये पत्रव्यवहार ठेविता येईल. अशा म्हारास अथवा मांगास दीड हजार रुपये दरमाहा मिळतील. यावरून ही सदरची जागा चालविण्यास किती म्हार अथवा मांग निवडतील ?" "याचप्रमाणे मोघम आम्हां हिंदूंस कलेक्टरांच्या जागा, युरोपियन लोकांसारख्या इंग्रज सरकाराने द्याव्यात, म्हणून सार्वजनिक सभेच्या रेकार्डात अर्ज असतील, परंतु ते अर्ज अविद्वान शूद्रादी अतिशूद्रांच्या काय उपयोगाचे ? कारण मोघम नाव हिंदूंचे आणि उपभोग घेणारे एकटे ब्राह्मण." [२२] इंग्रज सरकारने जरी कोणतीही राजकीय अधिकारपदे येथील लोकांच्या हवाली केली, तरी सध्याच्या स्पर्धाप्रधान युगात त्याचा फायदा पुढारलेल्या ब्राह्मण समाजालाच मिळणार हे उघड आहे. म्हणून जोपर्यंत या संस्थांचे कार्यकर्ते विषमतेने ग्रासलेल्या आपल्या जुन्या परंपरेचा अभिमान सोडून देऊन समतेच्या तत्त्वावर आधारलेल्या नव्या समाजाच्या निर्मितीसाठी प्रयत्न करीत नाहीत, तोपर्यंत शूद्रातिशूद्रांच्या दृष्टीने पाहता त्यांच्या कार्यामधून काही विशेष निष्पन्न होणार नाही अशी जोतीरावांची खात्री होऊन चुकली होती.

### आधी काय ? सामाजिक की राजकीय ?

इ. स. १८७० च्या सुमारास महाराष्ट्रात राष्ट्रीय चळवळीला नुकतीच सुरुवात झाली होती. हिंदी लोकांना येथील राज्यकारभारात अधिकाधिक सहभाग मिळावा अशी आपल्या देशातील नेत्यांची मागणी होती. भारतातील वेगवेगळ्या धर्मांच्या, पंथांच्या व जातीजमातींच्या लोकांतील साधर्म्य आणि इतर देशांतील लोकांपासूनचे त्यांचे वेगळेपण यांवर भर देऊन लोकांच्या मनात एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण करण्याचा येथील समाजधुरीणांचा प्रयत्न होता. समाजाची एकात्मता, स्थैर्य आणि प्रगती घडवून आणायची असेल, तर राष्ट्रवादाची कास धरण्याखेरीज गत्यंतर नाही.

कारण तोच सध्याचा युगधर्म आहे अशी त्यांची धारणा होती. त्यामुळे धर्म, शिक्षण, साहित्य, इतिहास, तत्त्वज्ञान, समाजसुधारणा इत्यादी अनेकविध क्षेत्रांत जे प्रबोधनाचे कार्य चालू होते, त्याच्या मागे देखील राष्ट्रवादाचीच प्रेरणा होती. मात्र आपल्या राष्ट्रवादाचे तात्त्विक अधिष्ठान कोणते असावे याबाबतीत महाराष्ट्रातील समाजचिंतकांत तीव्र मतभेद होते. त्यातूनच आधी सामाजिक की आधी राजकीय हा प्रश्न उपस्थित झाला होता; आणि त्यावर येथे दीर्घकाळ विचारसंघर्ष चालू होता. येथील राष्ट्रीय चळवळीत मुख्यतः रानडे यांचा समन्वयशील नेमस्त उदारमतवाद, व्यक्तीची प्रतिष्ठा, सामाजिक न्याय व बुद्धिप्रामाण्य यांवर आधारलेला आगरकर-प्रणीत इहवाद आणि चिपळूणकर-टिळकांचा सांस्कृतिक राष्ट्रवाद अशा तीन विचारधारा होत्या.

ईस्ट इंडिया कंपनीसारख्या एका परकीय व्यापारी संघटनेला मूठभर इंग्रज सैनिकांच्या बळावर भारतातील लहानमोठी राज्ये काबीज करता आली याचे कारण आपल्या लोकांतील फुटीर प्रवृत्ती व देशाभिमानाचा अभाव हे होय. आपल्या सामाजिक जीवनातील हा फुटीरपणा बहुतांशी जातिव्यवस्थेतून पोसला गेला होता. प्रत्येक जात ही स्वायत्त असून तिच्या आचारविचारांत बंदिस्तपणा होता. त्यामुळे अनेक जातीजमातींचा समुच्चय असे आपल्या समाजाचे स्वरूप राहिले. साहजिकच प्रत्येक मनुष्याची अस्मिता त्याच्या त्याच्या जातीशीच निगडित होती. निरनिराळ्या जातींतील सामाजिक अभिसरणास वाव नसल्यामुळे या संकुचित जातिनिष्ठेला छेद देणाऱ्या व्यापक सामाजिक जाणिवा येथे निर्माण होऊ शकल्या नाहीत. अर्थातच एकराष्ट्रीयत्वाची भावनाही निर्माण झाली नाही. म्हणून सरकारकडे राजकीय हक्कांची मागणी करीत असतानाच ते जागरूकतेने व एकजुटीने राबवण्याची पात्रता आपल्या लोकांच्या अंगी कशी येईल याचाही आपण विचार केला पाहिजे. आपल्या सामाजिक जीवनातील अनिष्ट प्रवृत्ती काढून टाकण्याचा आपण चिकाटीने प्रयत्न केला पाहिजे. कालबाह्य झालेल्या रूढी व सामाजिक संस्था नष्ट करण्यासाठी आपण झटले पाहिजे; त्यांना पाठीशी घालणाऱ्या सनातनी प्रवृत्तीशी झगडले पाहिजे. आधुनिक पाश्चात्त्य समाजरचनेतील व्यक्तिस्वातंत्र्य, संधिसमानता, सामाजिक न्याय, ऐहिक निष्ठा, बुद्धिप्रामाण्य इत्यादी तत्त्वांचा स्वीकार करून त्यांच्या आधारे आपल्या समाजव्यवस्थेत मूलगामी परिवर्तन घडवून आणले पाहिजे अशी रानडे-आगरकरांची विचारसरणी होती. रानडे यांची समन्वयशीलता व नेमस्तपणा आणि आगरकरांच्या विचारांतील निखळ तत्त्वनिष्ठा व आक्रमक वृत्ती यांमुळे ह्या दोघांच्या प्रतिपादनपद्धतीत फरक होता यात शंका नाही. पण प्रत्यक्ष व्यवहारात रानडे यांच्या सामाजिक सुधारणेच्या कार्यक्रमाला आगरकरांनी नेहमीच पाठिंबा दिला होता. शिवाय सुधारक पक्षाच्या

कार्यक्रमात उच्चवर्णीय जीवनातील प्रश्नांनाच प्राधान्य होते. त्यातही पुन्हा कृतिशीलतेचा भाग पुष्कळच कमी होता. त्यामुळे रानडे-आगरकरांच्याविषयी लोकांना आदर असूनही त्यांचे विचार रूढिग्रस्त जनमानसात मूळ धरू शकले नाहीत. उलट चिपळूणकर–टिळकांचा सांस्कृतिक राष्ट्रवादच येथे प्रभावी ठरला. कारण राष्ट्रीय चळवळीतील बहुतेक सर्व लहानथोर कार्यकर्ते या विचारसंप्रदायाचा हिरिरीने पाठपुरावा करीत होते. सर्वसामान्य लोक तर स्थितिप्रिय, परंपरापूजक व गतानुगतिकच होते.

परतंत्र देशात राजकीय हक्क संपादन करण्याच्या कार्याला अग्रस्थान दिले पाहिजे याबद्दल दुमत होण्याचे कारण नव्हते. सामाजिक सुधारणेच्या बाबतीत तसे म्हणता येणार नाही. भारतीय समाज एकजिनसी नाही. त्यात निरनिराळ्या पातळींवरचे जीवन जगणाऱ्या अनेक जातीजमाती आहेत. त्यांच्या चालीरीतींत व आचारविचारांत खूपच तफावत आहे शिवाय त्यांच्या सामाजिक व्यवहाराचा धर्मभावनेशी घनिष्ठ संबंध आहे; आणि धर्म हा सनातन व अपरिवर्तनीय आहे अशी त्यांची दृढ समजूत आहे. म्हणून सामाजिक सुधारणेचा आग्रह धरल्यास लोकांच्या भावना दुखावतील व समाजात फूट पडेल. त्यामुळे राजकीय चळवळीचा जोर कमी होईल असे येथील जहाल राष्ट्रीय वृत्तीच्या पुढाऱ्यांना वाटत होते. शिवाय सुधारणा होत जाऊन उत्तरोत्तर सामाजिक विषमता हटत गेल्यास वरिष्ठ जातींतील लोकांना आपल्या परंपरागत जन्मसिद्ध विशेषाधिकारांना मुकावे लागले असते. त्याला या लोकांच्या मनाची तयारी नव्हती. साहजिकच त्यांना सामाजिक सुधारणेचे वावडे होते. त्या काळात राजकीय दृष्ट्या हाच वर्ग जागृत असल्याने त्याच्यावरच राष्ट्रीय चळवळीची सर्व मदार होती. म्हणून तत्कालीन राष्ट्रवादी नेत्यांनी सामाजिक सुधारणेला कसून विरोध केला. इतकेच नव्हे तर लोकांच्या मनातील इंग्रजांविषयीचा न्यूनगंड नष्ट करून त्यांच्यात स्वत्वभावनेचा पीळ निर्माण केल्याखेरीज ते या परकीय राज्यकर्त्यांशी झगडण्यास उद्युक्त होणार नाहीत, म्हणून आपला पुरातन धर्म, तत्त्वज्ञान, इतिहास, साहित्य व संस्कृती यांवर त्यांनी आपल्या राष्ट्रवादाची उभारणी केली. देशाभिमानाची व धर्माभिमानाची त्यांनी सांगड घातली. आपल्या धर्मजीवनात जन्मसिद्ध अधिकारभेदाचे अतोनात स्तोम माजले होते. आपल्या सांस्कृतिक परंपरेत शूद्रातिशूद्रांच्या नैसर्गिक मानवी अधिकारांची बूज राखली गेली नव्हती. त्यामुळे जोतीराव ह्या सांस्कृतिक राष्ट्रवादाविषयी सदैव साशंक राहिले.

एकोणिसाव्या शतकात शूद्र व अतिशूद्र समाजांत शिक्षणाचा प्रसार अत्यल्प प्रमाणातच झालेला होता. राजकीय जागृती जवळपास शून्यच होती. उलट आम्हीच भारतीय जनतेचे खरे प्रवक्ते व प्रतिनिधी आहोत असा उच्चवर्णीय सुशिक्षितांचा

दावा होता. तो मान्य करून ब्रिटिश सरकारकडून हिंदी जनतेला काही राजकीय अधिकार मिळाले, तर प्रत्यक्षात त्यांचा फायदा महाराष्ट्रात फक्त ब्राह्मण व तत्सम जातींच्याच पदरात पडेल आणि या अधिकारांचा वापर ते आपले वर्णवर्चस्व टिकवून धरण्यासाठी केल्याखेरीज राहणार नाहीत अशी जोतीरावांना भीती वाटत होती. पुणे नगरपालिकेतील लोकनियुक्त सभासदांच्या धोरणातील संकुचित जातिनिष्ठा व पक्षपातीपणा पाहून प्रातिनिधिक संस्थांच्या कारभाराबाबत त्यांचा भ्रमनिरास झाला होता. तेव्हा शूद्रातिशूद्रांनी उच्चवर्णियांच्या नादी लागून राजकीय हक्कांसाठी हाकाटी न करता इंग्रज सरकारच्या मदतीने खेड्यापाड्यांतील लोकांत शिक्षणाचा प्रसार करावा आणि आपले नैसर्गिक मानवी अधिकार उपभोगण्याची पात्रता त्यांच्या अंगी आणण्यासाठी झटावे असे जोतीरावांच्या सामाजिक-राजकीय प्रश्नासंबंधीच्या एकंदर विवेचनाचे अंतःसूत्र आहे.

इंग्रज राज्यकर्ते परकीय असल्याने त्यांनी येथील धार्मिक व सामाजिक बाबतीत तटस्थतेचे धोरण स्वीकारले आहे. त्यामुळे सामाजिक सुधारणेच्या कार्याला मदत न झाली, तरी विरोध होणार नाही. उलट येथे स्वकीयांची राजवट असती तर सुधारकांची स्थिती अधिक विकट झाली असती. "स्वतंत्र स्थितीत समाजाग्रणी आणि धर्माधिकारी यांस सरकारी अधिकाऱ्यांचे बरेच पाठबळ असते. ज्या अधिकाऱ्यांस जी धर्ममते किंवा जे सामाजिक आचार ग्राह्य असतात, त्या मतांचे व आचारांचे मंडन व प्रसार करण्यास त्यांकडून समाजाग्रणींस आणि धर्माधिकाऱ्यांस पुष्कळ मदत होते. जे सरकारी अधिकारी असतात, ते सामाजिक व धार्मिक जुन्या मतांनाच नव्याण्णव वाट्यांनी अनुकूल असतात. यामुळे स्वतंत्र देशात सामाजिक व धार्मिक गोष्टींच्या संबंधाने नवीन मत स्थापणे किंवा नवीन आचार पाडणे फार कठीण असते. तसे नसते तर प्रत्येक स्वतंत्र देशातील प्रसिद्ध आद्य सुधारकांचा इतका छळ का झाला असता ? सरकारी अधिकाऱ्यांनी व धर्माधिकाऱ्यांनी अशा सुधारकांस जाळल्याची, पुरल्याची, तोडल्याची, सोलल्याची, कड्यावरून लोटल्याची, हत्तीच्या पायाशी बांधल्याची व फाशी दिल्याची अनेक उदाहरणे इतिहासात सापडण्यासारखी आहेत. यावरून काय दिसते की, सामाजिक व धार्मिक सुधारणा करण्यास पारतंत्र्य जितके अनुकूल आहे, तितके स्वातंत्र्य नाही." [२२] अशा तऱ्हेचे मत आगरकरांनी 'अशी वेळ कधी आली नव्हती' या आपल्या लेखात मांडले आहे. राजकीय पारतंत्र्य ही वस्तुतः आपत्तीच आहे. परंतु सध्या तरी इंग्रजांना घालवून देण्याइतके बळ कुणाच्याही अंगी नाही. तेव्हा निदान त्यांच्या तटस्थतेच्या धोरणाचा सामाजिक सुधारणेच्या चळवळीसाठी जेवढा फायदा उठवता येईल, तेवढा उठवावा इतकाच आगरकरांच्या ह्या म्हणण्याचा इत्यर्थ आहे. जोतीरावांचा दृष्टिकोणही बहुतांशी

असाच होता. इंग्रजांच्या ऐवजी येथे हिंदू समाजातील उच्चवर्णीयांची राजवट असती, तर मला माझे विचार इतक्या निर्धास्तपणे कधीच व्यक्त करता आले नसते असे त्यांनी अनेकदा आवर्जून सांगितले आहे.

जोतीरावांना स्वातंत्र्याची महती कळत नव्हती असे नाही. ते खरे तत्त्वनिष्ठ स्वातंत्र्यवादी होते. मात्र त्यांना समाजाच्या सर्व थरांतील लोकांचे स्वातंत्र्य अभिप्रेत होते; आणि तेही एकदेशीय नव्हे; तर धार्मिक, सामाजिक, आर्थिक अशा सर्वांगीण स्वातंत्र्याचे ते पुरस्कर्ते होते. म्हणून भारतीयांचे स्वातंत्र्य म्हणजे केवळ वरिष्ठ जातींचे स्वातंत्र्य का त्यात शूद्रातिशूद्रांचे स्वातंत्र्यही अंतर्भूत आहे, असा त्यांचा प्रश्न होता. देशांतर्गत स्वातंत्र्य तर ते मानत होतेच. पण एका देशाच्या राज्यकर्त्यांनी सत्तेच्या किंवा संपत्तीच्या हव्यासापायी दुसऱ्या देशातील लोकांच्या स्वातंत्र्यावर घाला घालता कामा नये यावर देखील त्यांचा कटाक्ष होता. या दृष्टीनेच त्यांनी युद्धखोरपणाचा निःसंदिग्धपणे निषेध केला आहे.

"या सर्व पृथ्वीचे पृष्ठभागावर बहुतेक देशांतील लोभी लक्षाधीश (स्त्रिया नव्हेत) पुरुष, शेजारचे निर्बळ मानव बांधवांचे देश काबीज करण्याकरिता, भलत्यासलत्या कुरापती काढून आपआपल्या लाव-लष्करासहित दलभारास बरोबर घेऊन दुसऱ्याचे मुलुखात स्वाऱ्या करितात, त्यावेळी उभयतांमध्ये तुंबळ युद्ध चालू असता शेतकी, व्यापार, कारखाने वगैरे अनेक लहानमोठे धंदे बंद पडून चोहोंकडे काळोखमय दुःखाचे धुके पसरून कोणास कोणी ओळखू येत नाही. अनेक ठिकाणी निर्दय पेंढारी, कहीवाले यांची लूटधुमाळी चालू असल्याने कित्येक घरंदाज श्रीमंतांचे, कंगाल होऊन दाण्यास महाग होतात. आणि बहुतेक शेतकऱ्यांची जनावरे तृणावाचून मरू लागतात. यामुळे कित्येक कुटुंबवत्सल शेतकरी आपली मुलेमाणसे व गुरेढोरे बरोबर घेऊन परागंदा होतात. यामुळे कित्येक खेडीपाडी ओसाड पडतात. एकाचे स्वार्थबुद्धीवरून दोन्ही पक्षांतील टोलेजंग सैन्ये एकमेकांशी लढताना लक्षावधी शिपाई आपल्या अमोल जीवास मुकतात व तेणेकरून हजारोहजार स्त्रियांचे कपाळी वैधव्य आल्यामुळे त्यांना आपले शेवटले आयुष्य परम संकटात व दुःखात कंठावे लागते... इकडे विजयी सत्ताधारी आपले शिपायांकडून पराजित केलेल्या सत्ताधाऱ्याचे निराधार रयतेस लुटून त्यांची घरेदारे जाळून, फस्त करून, त्यांस निखालस उघडेबंब करून टाकितात, आणि आपल्या मुलुखात ( घरी ) आल्यावर मोठमोठाले जंगी दरबार भरवून त्यांमध्ये आपल्या फौजेतील अतिशय क्रूर, अतिशय निष्ठुर, अतिशय धाडसी व नित्य नवी भयंकर कामे करणाऱ्या शिपायांतून कोणास उमरावबहादूर, कोणास जंगबहादूर, वगैरे लांबचलांब बड्या नावाच्या पदव्या देतात."[२४] युद्धखोरपणा हा किती अनर्थकारक होतो; आणि मर्दुमकीच्या नावाखाली त्याच्याकडे

कशी डोळेझाक केली जाते हे जोतीरावांनी येथे दाखवून दिले आहे. मात्र विस्तारवादी आक्रमक युद्ध आणि लादले गेलेले बचावात्मक युद्ध यात त्यांनी फरक केला आहे. या बाबतीत ते पेन यांच्या युद्धविषयक विचारसरणीशी बव्हंशी सहमत होते. देशाच्या रक्षणासाठी किंवा लोकांच्या स्वातंत्र्यासाठी युद्ध पुकारले गेले, तर त्यात भाग घेणे हे प्रत्येक नागरिकाचे कर्तव्य आहे अशी त्यांची धारणा होती. म्हणूनच त्यांनी आर्यांच्या आक्रमणाविरुद्ध शक्तिसर्वस्व एकवटून लढणाऱ्या महाअरींचा, शूर महार योद्ध्यांचा मुक्तकंठाने गौरव केला आहे.

जातीपातींचा व पंथोपपंथांचा अभिमान बाजूला ठेवून आपण आपल्या सर्व लोकांची एकी केल्याशिवाय आपल्या देशाची उन्नती होणार नाही, पुढारलेल्या पाश्चात्त्य देशांची आपण बरोबरी करू शकणार नाही असे वरिष्ठ जातींतील नेते नेहमी बोलत असतात. परंतु त्यांच्या या बोलण्यात काही तथ्यांश नाही. सदोदित ऐक्याची भाषा बोलणाऱ्या ह्या विद्वज्जनांचा दैनंदिन व्यवहार पाहिला, तर त्यात पदोपदी सोवळेओवळे व उच्चनीचभाव यांचेच प्रस्थ आढळून येते. किंबहुना त्यांचे सर्व जीवनच भेदभावनेने बरबटलेले आहे. एक जात दुसऱ्या जातीला हलकी मानते. ती जात पुन्हा आपल्याहून खालच्या मानलेल्या जातीला तुच्छ लेखते. जातीजातींत रोटीव्यवहार व बेटीव्यवहार होऊ शकत नाही. "अशा अठरा धान्यांची एकी होऊन त्याचे चरचरीत कोडबुळे म्हणजे एकमय लोक 'Nation' कसे होऊ शकेल?"[६६] संकुचित वृत्ती आणि दुरावा यांमुळे शतशः विभागलेल्या या समाजात एकात्मतेची भावना कशी निर्माण होणार? कुणाच्याही मनात असा विचार आल्याखेरीज राहिला नसता. परंतु उच्चार आणि आचार यांतील अशा विसंवादाबद्दल येथे कुणालाच काही खंत नव्हती. जोतीरावांना हे ढळढळीत दिसत होते. त्यामुळे उच्चवर्णीयांचा देशाभिमान हा फसवा व मतलबी आहे अशी त्यांची भावना झाली. मात्र यात काही अस्वाभाविक आहे असे त्यांना वाटले नाही. कारण या आर्यब्राह्मणांच्या पूर्वजांना देशाभिमानाची यत्किंचितही ओळख नव्हती. "या सुधारल्या विद्वानांच्या पूर्वजांस स्वदेशाभिमान जर खरोखर ठाऊक असता, तर त्यांनी आपल्या पुस्तकांत आपल्या देशबंधू शूद्रांस पशूपेक्षा नीच मानण्याजोगे लेख करून ठेविलेच नसते. ते विष्ठा खाणाऱ्या पशूचा गोमूत्र पिऊन पवित्र होतात; परंतु ते शूद्राचे हातचे स्वच्छ कारंजाचे पाणी पिण्यास अपवित्र मानितात."[६७] हीच मनोवृत्ती एकोणिसाव्या शतकातही अनुभवास येत होती. या दृष्टीनेच जोतीरावांनी तत्कालीन उच्चवर्णीयांच्या देशाभिमानाला 'अपवित्र देशाभिमान' असे म्हटले आहे. पवित्र देशाभिमान म्हणजे काय ते समजून घ्यायचे असेल, तर इंग्रजांच्या जीवनपद्धतीकडे लक्ष पुरवले पाहिजे. "इंग्रज लोकांनी मुळीच तो बळीराजा येण्यापूर्वी देशाभिमान ग्रीक लोकांच्या शाळेत

शिकले." [२८] परंतु पुढे तो गुण त्यांनी इतका आत्मसात केला की, आता त्याबाबतीत जगात कुणीच त्यांची बरोबरी करू शकत नाही. त्यांच्या जोडीला आणखी अमेरिकेतील जॉर्ज वॉशिंग्टन, व फ्रान्समधील सेनानी लाफायेत यांचा आणि अर्थातच त्यांच्या अनुयायांचा अवश्य उल्लेख करावा लागेल. जोतीरावांचे देशाभिमानविषयक हे सर्वच प्रतिपादन लक्षणीय आहे. त्यातून त्यांच्या विचारांचे खास वेगळेपण ठळकपणे जाणवते. त्याबरोबर पेन यांचे ग्रंथ वाचून त्यांच्या मनावर अमेरिकेतील स्वातंत्र्ययुद्ध आणि फ्रेंच राज्यक्रांती यांच्या मुळाशी असणाऱ्या प्रेरणांचा व तत्त्वप्रणालीचा किती खोल ठसा उमटला होता ते स्पष्ट होते.

जोतीरावांनी आपल्या ग्रंथांमधून जागोजाग राजनिष्ठेचे विचार निःसंदिग्धपणे व्यक्त केले आहेत. त्या वेळची एकंदर परिस्थिती लक्षात घेतली, तर याबद्दल नवल वाटण्याचे कारण नाही. प्राथमिक लोकजागृतीचा हा काळ होता. तत्कालीन बहुतेक सर्व उच्चवर्णीय नेते राजनिष्ठच होते. राष्ट्रसभेच्या अधिवेशनांतूनही राजनिष्ठेचे ठराव पास झालेले आहेत. जोतीरावांनी ब्रिटिश राजवटीविषयी जो सद्भाव सातत्याने दर्शविला आहे, त्यात धोरणाचा भाग किती आणि आंतरिक जाणिवेचा भाग किती हे ठरवणे कठीण आहे. तरी केवळ धोरण म्हणून त्यांनी ही भूमिका स्वीकारली होती असे म्हणता येणार नाही. इंग्रजांची राज्यपद्धती उदार, न्यायनिष्ठ व प्रगतिशील आहे. त्यांचे राज्य हे कायद्याचे राज्य आहे; समाजाच्या सर्व थरांतील प्रजाजनांना हे कायदे सारखेच बंधनकारक आहेत. तेव्हा या राजवटीत गोरगरिबांना अन्यायाविरुद्ध दाद लावून घेण्याची संधी प्रथमच तत्त्वतः उपलब्ध झालेली आहे असे जोतीरावांना मनापासून वाटत होते.

" अशा प्रकारे मदांध होऊन प्रजेशी क्रूर रीतीने वागणारे जे राजेलोक व त्यांचे जातीचे लोक यांची सत्ता सर्वशक्तिमान जो परमेश्वर याने हरण करून त्यांस त्यांचे अपराधानुरूप शासन दिले आणि कनवाळू होऊन आपले दुःखांनी पीडित अशा शूद्रादी अतिशूद्र प्रजेस परम न्यायी, हितावह, सौख्यकारक, सदाचारी आणि शांत असे राज्य इंग्रज सरकारच्या अंमलाखाली प्राप्त करून दिले. सबब ती त्या प्रभूची फार फार ऋणी आहे व त्यास रात्रंदिवस अशी प्रार्थना करीत आहे की 'हे प्रभो, अम्हास हे राज्य चिरकाल असू दे.' " [२९] जोतीरावांच्या या उद्गारांतून त्यांचे मनोगत स्पष्टपणे प्रगट झालेले आहे. इंग्रजांचे राज्य येथे आता पक्के स्थिरावले आहे. शिवाय शूद्रातिशूद्रांना आपली उन्नती करून घेण्यास त्यांची राज्यपद्धती बरीचशी अनुकूल आहे. लहानमोठ्या सशस्त्र उठावांनी या राज्याला हादरा बसणार नाही. मात्र त्यांत भाबडेपणाने सामील होणारे गरीब लोक नाहक बळी जाण्याचा संभव आहे. या दृष्टीनेच जोतीरावांनी " स्त्री अथवा पुरुष, जे स्वतःच्या हितासाठी, न्यायाने राज्य

करणाऱ्या संस्थानिकावर अथवा राज्यावर अथवा एकंदर सर्व प्रजेने मुख्य केलेल्या प्रतिनिधीवर बंड करून लक्षावधी लोकांची कुटुंबे उघडी पाडीत नाहीत अथवा बंड करणारांस मदत देत नाहीत, त्यांस सत्यवर्तन करणारे म्हणावेत "[३०] असे म्हटले आहे. साहजिकच १८५७ च्या उठावाबद्दल त्यांना कधी सहानुभूती वाटली नाही. उच्चवर्णीय नेते, विचारवंत व शिक्षक लोकांच्या मनात इंग्रज राज्यकर्त्यांविषयी असंतोष व द्वेषभाव निर्माण करण्याचा नेहमीच प्रयत्न करीत असतात. वास्तविक पाहता हा राजद्रोहच आहे; आणि राजद्रोहाची शिकवण शूद्रातिशूद्रांच्या दृष्टीने अत्यंत तापदायक व हानिकारक आहे असे जोतीरावांचे मत होते. म्हणून त्यांनी राजद्रोही लोकांपासून सावध राहण्याचा कष्टकरी समाजातील लोकांना इशारा दिला आहे.

जोतीराव जरी राजनिष्ठ होते, तरी ते इंग्रज सरकारचे स्तुतिपाठक नव्हते. त्यांचे जीवन हे समर्पित जीवन होते. शूद्राति शूद्रांची दास्यमुक्ती हे त्यांनी आपले जीवितकार्य मानले होते. या कार्याशीच त्यांची खरी बांधिलकी होती. निरनिराळ्या प्रश्नांची उकल करताना त्यांना जे सत्य जाणवले, ते उघडपणे बोलून दाखवताना त्यांनी कुणाच्या रागलोभाची फिकीर केली नाही. सरकारचे धोरण जेव्हा शूद्रातिशूद्रांच्या, विशेषतः शेतकऱ्यांच्या हितसंबंधांना विघातक आहे असे त्यांना दिसून आले, तेव्हा सरकारवर त्यांनी निःशंकपणे टीका केली आहे. " सरकारचे मनात जर आम्हां कंगाल शेतकऱ्यांविषयी खरोखर कळवळा आहे, तर ते आपले विलायती सावकारांचे एक अर्व रकमेचे व्याज अजीबाद बंद का करीत नाहीत." "शेतकऱ्यांस विद्वान करण्याकरिता वद्या-खात्याकडील सरकारी कामगारांचे मनातून खरा कळवळा नाही. कारण आज दीनतागाईत विद्या देण्याच्या निमित्ताने सरकारने लोकल फंडद्वारे शेतकऱ्यांचे लक्षावधी रुपये आपल्या घशात सोडले असून, त्या ऐवजाच्या मानाप्रमाणे आजपावेतो त्यांच्याने शेतकऱ्यांपैकी एकालासुद्धा कलेक्टरची जागा चालविण्यापुरती विद्या देण्यात आली नाही." "जे (शेतकरी) आपल्या विपत्तीत आसपासच्या जंगलातील गवत, लाकूडफाटा व पानफुलांवर गुराढोरांची व आपली जतणूक करीत असत, ती सर्व जंगले सरकारने आपल्या घशात सोडली. त्यांच्या कोंड्याभोंड्याच्या भाकरीबरोबर तोंडी लावण्याच्या मिठावरसुद्धा मोठी जकात बसविली आहे."[३१] यांसारखी कितीतरी उदाहरणे जोतीरावांच्या ग्रंथांतून काढून दाखवता येतील. स्टेट सेक्रेटरी, गव्हर्नर जनरल, इतर युरोपियन अधिकारी आणि हिंदी अंमलदार यांपकी कोणीही त्यांच्या लेखणीच्या तडाख्यातून सुटलेले नाहीत. कित्येकदा तर त्यांनी 'काय हो हे आताचे ज्ञानसंपन्न धर्मराज्य!' 'हल्लीचे आमचे महातत्त्वज्ञानी खऱ्या एका देवास भजणारे इंग्रज सरकार बहादर' अशी उपहासात्मक भाषाही वापरली

आहे. इंग्रजांच्या राज्यपद्धतीच्या जोतीरावांच्या आकलनात काही उणिवा आहेतच. कारण शूद्रातिशूद्रांवर होणारा अन्याय व त्यांचे आर्थिक शोषण यांचे विश्लेषण करताना त्यांनी प्रशासकांचा बेजबाबदारपणा, पक्षपात, लाचखाऊपणा यांसारख्या वैयक्तिक दोषांवरच बहुतांशी भर दिलेला आहे. परंतु ब्रिटिशांची राज्यपद्धती ज्या औद्योगिक स्पर्धाप्रधान व्यवस्थेवर आधारलेली होती, तिच्यातच शोषणाची बीजे अंतर्भूत आहेत हे त्यांच्या ध्यानात येऊ शकले नाही. तत्कालीन उच्चवर्णीयांच्या प्रतिपादनातही या आधुनिक व्यवस्थेचे अशा तऱ्हेचे विश्लेषण आढळून येत नाही. त्यामुळे ही उणीव व्यक्तिगत नसून कालसापेक्ष आहे असेच म्हणणे उचित होईल. मात्र तत्कालीन राजकीय प्रश्नांसंबंधी लिहितानाही त्यांनी कुठल्याही बाह्य शक्तीच्या दडपणाखाली स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीशी कधी प्रतारणा केली नाही; आपल्या अंगीकृत कार्यापासून ते कधी विचलित झाले नाहीत याबद्दल कुणाच्याही मनात संदेह निर्माण होईल असे वाटत नाही.

**संदर्भ व टीपा :**

१ निबंधमाला, पृ. ४५१
२ समग्र वाङ्मय, पृ. ४८७
३ समग्र वाङ्मय, पृ. १३६
४ समग्र वाङ्मय, पृ. ३१६
५ समग्र वाङ्मय, पृ. ३१५
६ समग्र वाङ्मय, पृ. ४६६
७ समग्र वाङ्मय, पृ. ३८
८ समग्र वाङ्मय, पृ. २५८
९ निबंधसंग्रह, पृ. ४६
१० समग्र वाङ्मय, पृ. २०३
११ समग्र वाङ्मय, पृ. २३४
१२ समग्र वाङ्मय, पृ. २०९
१३ समग्र वाङ्मय, पृ. ४७५
१४ समग्र वाङ्मय, पृ. २०७, १२९
१५ निबंधसंग्रह, पृ. ८२
१६ समग्र वाङ्मय, पृ. ४७९
१७ समग्र वाङ्मय, पृ. ५८

१८ समग्र वाङ्मय, पृ. २०२
१९ समग्र वाङ्मय, पृ. १३४
२० समग्र वाङ्मय, पृ. १४८
२१ समग्र वाङ्मय, पृ. १३९
२२ समग्र वाङ्मय, पृ. ४०६–७
२३ निबंधसंग्रह, भा. १, पृ. १३८
२४ समग्र वाङ्मय, पृ. ३०१
२५ "If there is a sin superior to every other, it is that of wilful and offensive war." Political Writings—Introduction, p. 4
२६ समग्र वाङ्मय, पृ. ४०७
२७ समग्र वाङ्मय, पृ. १३५–३६
२८ समग्र वाङ्मय, पृ. १३५
२९ समग्र वाङ्मय, पृ. ३१४–१५
३० समग्र वाङ्मय, पृ. ४१३
३१ समग्र वाङ्मय, पृ. २३१, २४२, २२८

# ८



# आर्थिक प्रश्न

महात्मा फुले यांची सत्यशोधक चळवळ ही सर्वस्पर्शी होती. त्यांनी शूद्रातिशूद्रांना गुलामगिरीत डांबून ठेवणाऱ्या हिंदू धर्मसंस्थेवर आणि सामाजिक परंपरेवर त्वेषाने घाव घातले. त्याबरोबरच त्यांनी कष्टकरी समाजाच्या आर्थिक प्रश्नांचाही तत्परतेने पाठपुरावा केला होता. जोतीराव हे कोणी नाणावलेले व्यासंगी अर्थशास्त्रज्ञ नव्हते; तर ते कृतिशील समाजचिंतक होते. तेव्हा त्यांच्याकडून आर्थिक प्रश्नांच्या सैद्धान्तिक विवेचनाची अपेक्षा करणे चुकीचे ठरेल. त्यांचे विचार हे त्यांच्या सामाजिक कार्यातील प्रत्यक्ष अनुभवातून स्फुरलेले होते. येथील शेतकऱ्यांच्या परिस्थितीचे त्यांनी समरसतेने व सूक्ष्म दृष्टीने अवलोकन केले होते. 'शेतकऱ्याचा असूड' या आपल्या ग्रंथात त्यांनी त्यांच्या दारिद्र्याचे, कर्जबाजारीपणाचे व त्यांच्यावर पदोपदी होणाऱ्या अन्यायाचे तपशीलवार वर्णन केले आहे. इतकेच नव्हे तर त्यांच्या आर्थिक दुरवस्थेची कारणमीमांसा करून त्यानी ती दूर करण्याचे उपायही सुचवले आहेत.

## शेतीतील स्थित्यंतर

इंग्रजांचे राज्य येथे स्थिरावल्यानंतर महाराष्ट्रातील शेतकऱ्यांच्या परिस्थितीत एक मूलगामी स्थित्यंतर घडून येत होते. ब्रिटिशपूर्वकाळात येथील खेड्यापाड्यांतील जीवन आर्थिकदृष्ट्या बहुतांशी स्वयंपूर्ण होते. शेतकरी व कारूनारू यांच्यातील श्रमविभाग व सहकार्य हेच मुख्यतः गावगाड्याच्या अर्थव्यवस्थेचे अधिष्ठान होते. जमिनीची मालकी प्रायः शूद्र समाजातील शेतकऱ्यांकडे असे. मुसलमानी राजवटीत आणि मराठेशाही-तही शेतकऱ्याला आपल्या उत्पन्नाच्या एकतृतीयांश आणि कधी कधी तर निम्मा हिस्साही जमीन-महसूल म्हणून द्यावा लागत असे. जहागीरदार, इनामदार, देशमुख-

देशपांडे यांच्यासारखे प्रतिष्ठित वतनदार यांना महसुलात वाटा मिळत असल्याने तेही शेतकऱ्यांच्या शोषणात सहभागी होते. इंग्रजांनी आपल्या अमदानीत येथे नवीन धारापद्धती अंमलात आणली. शेतकऱ्यांची जमिनीवरील मालकी मान्य करण्यात आली. जमिनीच्या प्रत्येक तुकड्याची मोजणी करून त्याला भूमापन क्रमांक दिला गेला. हरएक खेड्याचा नकाशा तयार करून त्यातील प्रत्येक तुकड्यावरील महसूल मुक्रर करण्यात आला. महसुलाचे हे दर तीस वर्षेपर्यंत कायम ठेवण्यात येणार होते. जमिनीची उत्पादनक्षमता व धान्याचे दर लक्षात घेऊन दर तीस वर्षांनी साऱ्याचे दर नव्याने ठरविण्यात येतील असे शासनाने जाहीर केले.

इंग्रज राज्यकर्त्यांनी सर्व बाजूंचा दूरवर विचार करून साऱ्याचे हे दर माफकच ठेवले होते. परंतु त्यांची महसूल-यंत्रणा पूर्वीच्या शासनाच्या मानाने पुष्कळच सुनियंत्रित व कार्यक्षम होती. त्यामुळे त्यांच्या राजवटीतही शेतकऱ्यांवरील साऱ्याचा भार हलका झाला नाही.

मध्ययुगातील राज्यकर्ते साऱ्याची आकारणी करताना खेडे हाच घटक धरत असत; आणि हरएक खेड्यातील एकूण सारावसुलीचे काम पाटील-कुलकर्ण्यांच्याकडे असे. इंग्रजी अंमलातील रयतवारी पद्धतीत जमिनीच्या खाजगी मालकीचे तत्त्व मान्यता पावले. त्यामुळे स्वतःच्या शेतावरील सारा भरण्याची प्रत्यक्ष जबाबदारी पाटलाऐवजी व्यक्तिशः प्रत्येक शेतकऱ्यावर येऊन पडली. त्याबरोबरच जमीन ही खरेदीविक्रीची वस्तू बनली. महसूल ठराविक मुदतीत भरला गेला नाही, तर जमिनीचा लिलाव करून तो वसूल केला जाईल अशी शेतकऱ्याला शासनाकडून ताकीद मिळू लागली. महसुलाच्या सामाईक जबाबदारीचे तत्त्व संपुष्टात आल्यावर ग्रामसंस्थेला उतरती कळा लागली; व शेतकरी एकाकी पडला. भांडवलशाहीतील खाजगी मालकीचे तत्त्व कृषिक्षेत्रात लागू करण्यात आल्यानंतर खेड्यातील अर्थ-व्यवहारात फार मोठा बदल घडून आला; आणि त्यामधूनच शेतीच्या ऱ्हासाला आणि शेतकऱ्यांच्या अवनतीला प्रारंभ झाला.

## दळणवळणाची नवीन साधने

आंग्लपूर्वकाळात नागरी हस्तव्यवसायांच्या बाबतीत भारत जगातील अन्य कोणत्याही राष्ट्राच्या तुलनेने मागे नव्हता. अठराव्या शतकाच्या अखेरीस इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती झाली. मोठ्या प्रमाणावर वस्तूंचे उत्पादन होऊ लागले. शास्त्रीय शोधामुळे घडून आलेला तंत्रविद्येचा विकास आणि उत्पादनपद्धतीतील श्रमविभाग यांमधून वेगवेगळ्या वस्तूंचा उत्पादनखर्च कमी कमी होत गेला. भारतातील कारागीर अत्यंत सुबक व चित्तवेधक वस्तू निर्माण करण्यात वाकबगार होते; तरी त्यांचे

उत्पादनतंत्र मागासलेले होते. त्यामुळे त्यांनी निर्माण केलेल्या वस्तूंचा उत्पादनखर्च अर्थातच जास्त होता. इंग्लंडमधील प्रगत उत्पादनतंत्राच्या साह्याने तयार झालेल्या मालाशी त्यांची स्पर्धा सुरू झाल्यावर साहजिकच देशी मालाची मागणी उत्तरोत्तर घटत गेली. मात्र दळणवळणाच्या आधुनिक साधनांचा सर्वत्र प्रसार होईपर्यंत परकीय मालाची ही स्पर्धा मोठमोठ्या शहरांपुरतीच मर्यादित राहिली.

भारतातील रेल्वेबांधणीला १८५० नंतर सुरुवात झाली; सन १८५३ मध्ये मुंबई ते ठाणे या मार्गावर पहिली आगगाडी धावू लागली. पुढील पंधरा वर्षांत जवळजवळ पाच हजार मैलांचा रेल्वेमार्ग बांधून तयार झाला. रेल्वेच्या जोडीला रस्तेबांधणीचे काम जोरात सुरू झाले; लॉर्ड डलहौसी यांनी सार्वजनिक बांधकाम खाते स्थापन करून रस्ते, कालवे, सरकारी इमारती व लष्करासाठी निवासस्थाने बांधण्याचे काम त्याच्याकडे सोपवले. या बांधकाम विभागाने पुणे जिल्ह्यात १८६८–६९ साली बांधकामावर एकतीस लाख रुपये खर्च केल्याची नोंद आहे.[1] मोठ्या प्रमाणावर सार्वजनिक बांधकाम होऊ लागल्यावर पोटासाठी मजुरी करणाऱ्या अकुशल कामगारांचा एक वर्ग अस्तित्वात आला. या वर्गात शूद्र व अतिशूद्र समाजांपैकी लहान शेतकऱ्यांच्या कुटुंबातील लोकांचीच भरती होत असे.

रेल्वे व महामार्ग यांसारखी दळणवळणाची साधने उपलब्ध झाल्यामुळे परदेशातून आयात झालेला पक्का माल येथे सर्वदूर पसरू लागला. यामुळे छोट्याछोट्या शहरांतील परंपरागत हस्तव्यवसाय नष्ट झाले. मराठेशाहीत खेड्यांतील तरुणांना लष्करात शिलेदार व बारगीर म्हणून नोकऱ्या मिळत होत्या. पेशवाईत परप्रांतांतील मोहिमा सुरू झाल्यावर लुटीच्या व खंडणीच्या रूपाने संपत्तीचा ओघ महाराष्ट्राकडे येत राहिला. या संपत्तीपैकी मोठा भाग सुभेदार – जहागिरदारांच्या पदरात पडत असे. त्यांच्यासाठी चैनीच्या वस्तू तयार करणे आणि त्यांना नानाविध सुविधा प्राप्त करून देणे याकरिता त्या वेळी कारागिरांची व सेवकांची गरज लागत होती. शिवाय पागा, तोफखाने, लष्करासाठी शस्त्रे व इतर वस्तू निर्माण करणारे कारखाने यांमधूनही कितीतरी लोकांना रोजगार मिळत होता. इंग्रजांचे राज्य येथे स्थापन झाल्यावर अशा अनेकविध व्यवसायांत गुंतलेल्या लोकांवर घरी बसण्याची पाळी आली. शासनयंत्रणेला व लष्कराला लागणाऱ्या कागदपेन्सिलीपासून तोफा-बंदुकांपर्यंत यच्चयावत वस्तू इंग्लंडमधून आणण्याचे सरकारचे धोरण होते. त्यामुळे जुने उद्योगधंदे लयाला गेले. त्यांच्या जागी नवे उद्योग उभे राहिले नाहीत. इंग्रजांच्या राजवटीत जो उच्चवर्णीय सुशिक्षित वर्ग प्रशासन, शिक्षण, साहित्य, समाजकारण इत्यादी क्षेत्रांत पुढे येत होता, त्याला हरएक बाबतीत इंग्रजांचे अनुकरण करण्यास धन्यता वाटत होती. त्यामुळे ते देखील देशी मालाऐवजी विलायती वस्तू वापरू

लागले. अशा प्रकारे सर्व बाजूंनी मागणी कमीकमी होत गेल्याने सन १८७० पर्यंत येथील शहरी हस्तव्यवसायांचे समूळ उच्चाटन झाले. त्यामुळे बेकार झालेले शेकडो कामगार परत खेड्यात गेले. शेतीवरील लोकसंख्येचा भार वाढला. शिवाय एकूण लोकसंख्या वाढत राहिल्याने शेतजमिनीचे 'भाऊहिस्से' होऊन प्रत्येक शेतकऱ्या-जवळील लागवडयोग्य जमिनीचे क्षेत्र अधिकाधिक आकुंचित होत गेले. अपुरे क्षेत्र आणि लोकसंख्येचा प्रचंड भार यांमुळे येथील शेतीव्यवसायाचे मागासलेपण कायमच राहिले.

दळणवळणाची नवीनवी साधने अस्तित्वात आल्यामुळे शेतीच्या व्यापारीकरणाला प्रारंभ झाला. केवळ कुटुंबपोषणासाठीच नव्हे तर रोकड पैसा मिळवण्यासाठी उत्पादन होऊ लागले. मुंबईच्या धर्तीवर औद्योगिक शहरांची वाढ होत गेल्यावर त्या त्या शहरांतून अन्नधान्याची मागणी येऊ लागली. तेव्हा बाजारपेठेसाठी धान्य पिकविण्यास शेतकऱ्यांना उत्तेजन मिळाले. भारतातील शेतीव्यवसायाच्या दृष्टीने या काळातील अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे अमेरिकेमधील यादवी युद्ध (सन १८६१-६५) ही होय. ह्या युद्धापूर्वी अमेरिकेत उद्योगधंद्यांची वाढ बेताचीच झाली असल्याने दक्षिणेकडील घटकराज्ये मँचेस्टर येथील कापडगिरण्यांसाठी कापसाची निर्यात करीत असत. युद्धाला तोंड लागल्यावर ही निर्यात बंद झाली; आणि इंग्लंडच्या बाजारपेठेत कापसाचा अतिशय तुटवडा भासू लागला. अनेक कापड-गिरण्या बंद कराव्या लागल्या. जागतिक बाजारपेठेत कापसाच्या किंमतींनी उच्चांक गाठला. अशा परिस्थितीत निर्यातीसाठी कापसाचे उत्पादन करण्यास इंग्रज राज्य-कर्त्यांनी येथील शेतकऱ्यांना प्रोत्साहन दिले. या युद्धाच्या निमित्ताने भारतातील शेतकऱ्यांचा जागतिक बाजारपेठेत प्रथमच प्रवेश झाला. शेतमालाचे भाव जागतिक बाजारपेठेतील मागणीपुरवठ्यावरून ठरू लागले. शेतकऱ्यांच्या जीवनसरणीवर त्यांच्या दृष्टिपथात न येणाऱ्या व त्यांच्या नियंत्रणाबाहेर असणाऱ्या शक्तींचा अंमल सुरू झाला.

## सावकारशाहीचा उदय

जमिनीची खाजगी मालकी, व्यवहारात पैशाचा वापर, दळणवळणाच्या साधनांचा विकास आणि बाजारपेठांचा विस्तार यांमधून खेड्यांमध्ये एका नव्या वरिष्ठ वर्गाचा उदय झाला. स्वयंपूर्ण ग्रामव्यवस्थेत व्यापाराला फारसा वाव नव्हता. गावात न मिळणाऱ्या काही नित्योपयोगी वस्तू लमाणांच्या मार्फत तेथे उपलब्ध होत असत. परंतु रेल्वेमार्गाजवळील खेड्यांमधून नगदी पिकांचे उत्पादन होऊ लागल्यावर माल गोळा करणे, त्याची प्रतवारी लावणे, त्याचा साठा करणे, आणि तो शहरात नेऊन

विकणे ही कामे करणारा एक नवा आधुनिक वळणाचा व्यापारी वर्ग निर्माण झाला. पावसाची अवकृपा झाली, आणि उत्पादनात घट झाली की, सारा भरण्यासाठी किंवा निर्वाहासाठी देखील शेतकऱ्याला पैशाची गरज पडत असे. अशा वेळी सावकाराकडे धाव घेण्याखेरीज त्याला गत्यंतर नसे. जमिनीची रीतसर खरेदीविक्री होऊ लागल्याने सावकाराकडील शेतकऱ्याची पत वाढली होती. जमिनीचे गहाणखत करून घेऊन त्याला कर्ज देणे सावकाराला सोयीचे होते. कराराची अंमलबजावणी राजीखुषीने न झाल्यास शासनाच्या मार्फत ती करवून घेता येत असे. व्याजाचे दर भरमसाट असल्याने सावकारीचा धंदा किफायतशीर होता अमेरिकेतील यादवी युद्धाच्या काळात इंग्लंडला कापूस पुरवून येथील व्यापाऱ्यांनी भरपूर पैसा मिळविला होता. उद्योगधंद्यात भांडवल-गुंतवणुकीला पुरेसा वाव नसल्याने हा पैसा सावकारीत गुंतवण्यात आला. "सावकारांच्या या वर्गात खेड्यातील मारवाडी व गुजर व्यापारी मोठ्या प्रमाणावर आहेत. लिंगायत व वैश्यवाणी जातींचे काही लोकही त्यांच्यामध्ये दिसून येतात. हे लोक प्रॉमिसरी नोट किंवा गहाणखत लिहून घेऊन बियाणे व खावटी यांसाठी धान्य किंवा पैसे पुरवतात. सावकारांचा दुसरा वर्ग मोठ्या शहरांतील व्यापारी व पेढीवाले यांचा आहे. त्यांच्यामध्ये उपरिनिर्दिष्ट जातीप्रमाणे ब्राह्मण, विशेषतः देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण अनेक आहेत. कुळकर्ण्यांपैकी जे सावकारीचा धंदा करतात, त्यांचा शहरांतील या ब्राह्मण पेढीवाल्यांशी घनिष्ठ संबंध असतो. याचे एक उदाहरण म्हणजे घोसपुरी या खेड्यातील कुलकर्ण्यांचे दुर्दैवी कुटुंब होय. या ब्राह्मण सावकारांची वकील व सरकारी अधिकारी यांच्याशीही नातीगोती असतात. ही मंडळी खालच्या जातींतील सावकारांच्या तुलनेने धान्याच्या रूपाने कर्ज कमी देतात. मात्र परप्रांतीय व्यापाऱ्यांच्या मानाने जमीन बळकावण्याकडे यांचा अधिक कल असतो. सावकारांचा तिसरा वर्ग हा स्वतः कर्जमुक्त असणाऱ्या शेतकऱ्यांचा आहे. ते आपल्या शेजाऱ्यांना धान्य किंवा पैशाच्या रूपात लहान कर्जे देतात."[२] अशा शब्दांत नगर जिल्ह्याचे कलेक्टर सिंक्लेअर यांनी या सावकारांचे वर्णन केले आहे. "होईना भूदेव जती मारवाडी ॥ मानवा न पीडी । सर्पवत"[३] असे म्हणून जोतीरावांनीही गरिबांची नाहक पिळवणूक करणाऱ्या 'सोवळ्या' व 'अहिंसक' अशा ब्राह्मण व मारवाडी सावकारांचा अधिक्षेप केला आहे.

### शेतकऱ्यांचे दंगे

अमेरिकेतील यादवी युद्धाच्या काळात शेतकऱ्यांकडील कर्जाची रक्कम वाढत गेली. पण शेतमालाला त्या वेळी चांगला भाव मिळत असल्याने कर्जाची परतफेड करणे त्याला सहज शक्य होते. युरोपात रेल्वेबांधणीला सुरुवात झाल्यापासून पुढे

जवळ जवळ पंचवीस-तीस वर्षे जागतिक बाजारपेठेत तेजीचे वातावरण होते. सन १८७० नंतर पंचवीस वर्षे मंदीचा काळ आला होता. यादवी युद्ध संपून तह झाल्यावर युनायटेड स्टेट्समधील शेतीचे उत्पादन झपाट्याने वाढू लागले. शिडांवर चालणाऱ्या गलबतांऐवजी यंत्रसज्ज आगबोटी आता वाहतुकीसाठी वापरात आल्या होत्या. त्यामुळे अमेरिकेतून युरोपात धान्य व कच्चा माल मोठ्या प्रमाणावर जाऊ लागला होता. मागणीपेक्षा पुरवठा खूपच जास्त झाल्याने शेतमालाच्या किंमती एकदम घसरल्या. भारतातील बाजारपेठ आंतरराष्ट्रीय बाजारपेठेशी जोडली गेल्या-मुळे युरोपातील मंदीचा भारतातील शेतमालाच्या किंमतीवर परिणाम होणे अटळ होते. इंदापूरच्या बाजारात १८७१-७२ साली ज्वारीचा भाव रुपयाला २२ शेर व बाजरीचा रुपयाला २० शेर होता, तर १८७४-७५ साली ज्वारीचा भाव रुपयाला ४५ शेर व बाजरीचा ३५ शेर इतका खाली आला.[४] शेतकऱ्याच्या रोकड उत्पन्नात घट झाली. रेल्वेबांधणीचे काम थांबल्याने शेतकऱ्यांची फावल्या वेळेतील रोजगारी बंद झाली. तीस वर्षांनंतर १८६६ मध्ये नवी जमाबंदी झाली, त्या वेळी शेतमालाच्या किंमती वरच्या पातळीवर असल्याने पुढील तीस वर्षांसाठी साऱ्याचे दर वाढवण्यात आले होते. त्यानंतर शेतमालाचे भाव खाली आले. तेव्हा साऱ्याचा बोजा शेत-कऱ्यांना असह्य होऊ लागला. कर्जाची परतफेड करणे त्यांना जमेना. सावकारांनी कर्जवसुलीसाठी शेतकऱ्यांविरुद्ध भराभर न्यायालयात दावे लावले. कोर्टाचे कामकाज तालुक्याच्या ठिकाणी चाले. वारंवार तारखा लागत. शेतीची कामे सोडून त्या त्या वेळी हजर राहणे शेतकऱ्याला अडचणीचे होई. न्यायालयातील शिरस्तेदार, कारकून, वकील, न्यायाधीश हे सर्व उच्चवर्णीय असल्याने त्यांचा स्वाभाविक कल सावकारा-कडे असला तर नवल नाही. शेतकरी अशिक्षित व परिस्थितीने नडलेला; शिवाय कराराच्या मूलतत्त्वांची त्याला बिलकुल माहिती नव्हती. सावकारापुढे ब्र काढण्याची त्याची हिंमत नसे. त्याने समोर ठेवलेल्या कागदावर तो निमूटपणे अंगठा उठवी. या सर्व व्यवहारात अखेर त्याला आपली जमीन गमवावी लागे.

मंदीच्या काळात असे हस्तांतर मोठ्या प्रमाणावर घडू लागले. त्यामुळे चिडलेल्या शेतकऱ्यांनी १८७५-७६ साली पुणे व अहमदनगर जिल्ह्यांत सावकारांच्या घरांवर हल्ले केले व सावकारांच्या ताब्यातील कागदपत्र जाळून टाकले.[५] तेव्हा शेत-कऱ्यांच्या या दंग्याची कारणे शोधून काढून त्याचे निराकरण करण्याबाबत उपाय सुचवण्यासाठी शासनाने एका आयोगाची नेमणूक केली. या आयोगाच्या शिफारशी विचारात घेऊन शासनाने सन १८७९ मध्ये प्रथमतःच सावकारीवर नियंत्रण घालणारा कायदा मंजूर केला. परंतु शेतकऱ्यांची लुबाडणूक थांबवण्याच्या दृष्टीने या कायद्याचा म्हणण्यासारखा उपयोग झाला नाही.

## दुष्काळ

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रात वारंवार दुष्काळ पडल्याचे दिसून येते. सन १८७७–७८ मध्ये मुंबई प्रांताच्या दक्षिण भागात पडलेला दुष्काळ तर फारच भयंकर होता. या दुष्काळात नेहमीच्या सरासरी मृत्युसंख्येहून सुमारे सव्वा पाच लाखाहून जास्त माणसे मरण पावली असावीत असा दुष्काळाच्या कारणांची चौकशी करण्याकरिता शासनाने नेमलेल्या आयोगाचा अंदाज होता.[६] दळण-वळणाच्या साधनांची सोय झाल्यामुळे दुष्काळ पडला, तरी धान्याची फार टंचाई भासत नसे. शेतकऱ्याजवळील क्रयशक्तीचा अभाव हीच या बाबतीत मोठी अडचण होती. लोकांना रोजगार पुरवण्यासाठी शासनाने दुष्काळी कामे काढली. परंतु ती पुरी पडली नाहीत. गुरांना चारण्यासाठी घाटावरील जंगले खुली करण्यात आली. तरीही या दुष्काळात चाऱ्याअभावी हजारो गुरे तडफडून मेली; आणि शेतीच्या प्रगतीला खीळ बसली.

## शेतकऱ्याचा असूड

महाराष्ट्रातील या आर्थिक घडामोडींच्या पार्श्वभूमीवर जोतीरावांनी 'शेतकऱ्याचा असूड' हा आपला ग्रंथ लिहिला. शूद्रातिशूद्रांचे ते पाठीराखे होते हे तर खरेच. परंतु हे लोकही वेगवेगळया थरांत विभागलेले आहेत याची त्यांना कल्पना होती. म्हणून एका बाजूला राजेरजवाडे व संस्थानिक आणि दुसऱ्या बाजूला गावकुसाबाहेर बहिष्कृत अवस्थेत खितपत पडलेल्या अस्पृश्य जाती असे दोन घटक सर्वसामान्य शेतकऱ्यांपासून वेगळे काढून त्यांनी या ग्रंथातील आपल्या विवेचनामधून त्यांना वगळले आहे. कारण त्यांच्या मते हे दोन्हीही घटक दुर्दैवाने शूद्र शेतकऱ्यापासून दुरावले होते. तेव्हा शेतीच्या प्रगतीच्या दृष्टीने ज्यांचे प्रश्न विशेष महत्त्वाचे होते, अशा मध्यम व कनिष्ठ प्रतीच्या शेतकऱ्यांच्या दीनवाण्या स्थितीचे त्यांनी सांगोपांग परिशीलन केले आहे. शेतकऱ्यांच्या या दुरवस्थेचे एक प्रमुख कारण म्हणून त्यांनी प्रारंभीच शेतीवरील लोकसंख्येच्या वाढत्या भाराचा उल्लेख केला आहे.

" एकंदर सर्व हिंदुस्थानात पूर्वी काही परदेशस्थ व यवनी बादशाहा व कित्येक स्वदेशीय राजेरजवाडे या सर्वांजवळ शूद्र शेतकऱ्यांपैकी लक्षावधी सरदार, मानकरी, शिलेदार, बारगीर, पायदळ, गोलंदाज, माहूत, उंटवाले व अतिशूद्र शेतकऱ्यांपैकी मोतद्दार चाकरीस असल्यामुळे लक्षावधी शूद्रादी अतिशूद्र शेतकरी लोकांचे कुटुंबांस शेतसारा देण्याची फारशी अडचण पडत नसे. कारण बहुतेक शेतकऱ्यांच्या कुटुंबांतील निदान एखाद्या मनुष्यास तरी लहानमोठी सरकारी चाकरी असाव-

याचीच. परंतु हल्ली सदरचे वादशहा, राजेरजवाडे वगैरे लंपास गेल्यामुळे सुमारे पंचवीस लक्षांचे वर शूद्रादी अतिशूद्र शेतकरी वगैरे लोक बेकार झाल्यामुळे त्या सर्वांचा बोजा शेतकी करणारांवर पडला आहे."[७] पूर्वीच्या शेतकऱ्यांजवळ अगदी थोडी शेतजमीन असे, ते जंगलातील झाडांची फळे खाऊन व पाने, फुले, गवत व लाकूडफाटा विकून गुजराण करीत असत. परंतु "आमचे मायबाप सरकारचे कारस्थानी युरोपियन कामगारांनी आपली विलायती अष्टपैलू अक्कल सर्व खर्ची घालून भलेमोठे टोलेजंग जंगलखाते नवीनच उपस्थित करून, त्यामध्ये एकंदर सर्व पर्वत, डोंगरटेकड्या, दरीखोरी व त्याचे भरीस पडित जमिनी व गायराने घालून फारेष्ट खाते शिखरास नेल्यामुळे दीनदुबळया पंगू शेतकऱ्याचे शेरडाकरडांस या पृथ्वीचे पाठीवर रानचा वारासुद्धा खाण्यापुरती जागा उरली नाही."[८] पूर्वी खेड्यातील लोक साळी, कोष्टी, लोहार, सुतार वगैरे कसबी लोकांच्या कारखान्यात त्यांच्या हाताखाली किरकोळ कामे करून कशीबशी पोटाची खळगी भरत असत. पण आता इंग्लंडातील कारागीर हरतऱ्हेचे सामान यंत्रद्वारे तयार करून येथे पाठवतात. हा माल देशी मालापेक्षा स्वस्त असल्याने त्याची मागणी सतत वाढत आहे. त्यामुळे साहजिकच या देशातील कारागिरांचे वंशपरंपरागत व्यवसाय साफ बुडाले आहेत. असे स्वतःच बेकार झालेले कारागीर आपल्या गावातील गरजू लोकांना कुठून आणि कशी मदत करणार? शिवाय इंग्रजांच्या अमदानीत लढाया व शिकारी वगैरे सर्व काही बंद झाले. लोकसंख्या उत्तरोत्तर वाढत गेली. शेतकऱ्यांच्या शेतांचे भाऊहिस्से वाढत गेल्याने प्रत्येकापाशी राहिलेली जमीन बेताचीच होती. पाळीपाळीने काही वर्षे शेते पडीत टाकण्यापुरती भरपूर जमीन कुणापाशी उरली नव्हती. त्यामुळे शेतास विसावा न मिळाल्याने ती सर्व एकदम नापीक झाली. शेतकऱ्याचे उत्पन्न जरी कमी झाले, तरी सरकारने ठरवलेले साऱ्याचे दर मात्र कायमच राहात. शिवाय "अज्ञानी शेतकऱ्यांच्या शेतांची दर तीस वर्षांनी पैमाष करिताना, आमचे धर्मशील सरकारचे डोळे झाकून प्रार्थना करणारे युरोपियन कामगार, शेतकऱ्यांचे बोडक्यावर थोडीतरी पट्टी वाढविल्याशिवाय शेवटी 'आमेन'ची आरती म्हणून आपल्या कंबरा सोडीत नाहीत."[९] शेतीवरील ह्या असह्य भारामुळे शेतकऱ्याची उपासमार होऊन तो दारिद्र्याच्या गर्तेत अधिकाधिक खोल रुतत चालला आहे, असा जोतीरावांच्या या एकंदर विवेचनाचा मथितार्थ आहे.

## शोषणाची मीमांसा

महात्मा फुले हे बहुजनसमाजात सदोदित वावरत होते. खेड्यातील शेतकऱ्यांशी त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. कष्टकरी समाजाच्या सुखदुःखाशी ते तादात्म्य पावले

होते. ग्रामीण अर्थव्यवहारातील निरनिराळ्या वर्गांच्या परस्परसंबंधांचे त्यांनी बारकाईने निरीक्षण केले होते. शेतकऱ्यांकडून सावकारांकडे झपाट्याने होत असलेले जमिनीचे हस्तांतर बघून ते अस्वस्थ होत. शेतकऱ्यांचे हे शोषण कसे थांबवता येईल या प्रश्नांचा विचार त्यांच्या मनात अहोरात्र चालू होता. श्रमप्रतिष्ठा हे एक श्रेष्ठ मूल्य म्हणून त्यांनी स्वीकारले होते. श्रमिकांचे शोषण ही आपल्या सामाजिक जीवनातील एक विकृती आहे असे त्यांचे मत होते. म्हणून या शोषणाकडे शासनाचे लक्ष वेधून त्याची तीव्रता कमी करण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

जोतीरावांचे विचार समजून घेताना प्रथम महाराष्ट्रातील त्या वेळची विशिष्ट परिस्थिती ध्यानात घेतली पाहिजे. पेशवाईत महाराष्ट्रातील एकंदर सामाजिक जीवनावर ब्राह्मणांचेच वर्चस्व होते. धार्मिक व सांस्कृतिक नेतृत्वाची मक्तेदारी पूर्वपरंपरेने त्यांच्याकडे होती. शासनयंत्रणेतही त्यांचेच प्राबल्य होते. उत्तर पेशवाईत तर बऱ्याच मोठ्या प्रमाणावर ब्राह्मणांच्या हातात सत्तेचे केंद्रीकरण झाले होते. इंग्रजांचे राज्य इथे आले; आणि आधुनिक शिक्षणाच्या नव्या सोयी सर्वांना प्रथमच तत्त्वतः उपलब्ध झाल्या. परंतु फक्त उच्चवर्णियांनाच विद्याध्ययनाची प्रदीर्घ परंपरा असल्याने त्यांनी या संधीचा तत्परतेने फायदा घेतला. नव्या शासनयंत्रणेतील मोक्याच्या जागा युरोपियनांच्या खालोखाल त्यांनी हस्तगत केल्या. डॉक्टरकी, वकिली, अभियांत्रिकी, पत्रकारिता इत्यादी आधुनिक व्यवसायांतही तेच आघाडीवर राहिले. ग्रामीण भागात ब्रिटिशपूर्वकाळात देशमुख व पाटील या वतनदारांची हुकमत चालू होती. ब्रिटिश राजवटीत नवी कायदेपद्धती प्रचारात आली. गव्हर्नरापासून पाटील-कुलकर्ण्यांपर्यंत सर्व शासनव्यवहारात एकसूत्रीपणा आला; सुनियंत्रितता आली. लेखी कराराला युगतत्त्वाचे पावित्र्य लाभले. रूढीचे, पूर्वापार वहिवाटीचे प्रस्थ कमी होऊन कागदपत्रांची प्रतिष्ठा वाढली. त्याबरोबर अशिक्षित पाटील मागे पडून कलमबहाद्दर कुलकर्ण्यांचा जमाना सुरू झाला. सरकारी अंमलदार, वकील, न्यायाधीश, फौजदार, सावकार यांच्यात नात्यागोत्याचे संबंध असत. ग्रामसंस्था लुप्त झाली; आणि पाश्चात्त्य वळणाची नवी शहरी संस्कृती उदयास आली. त्यामुळे पांढरपेशे उच्चवर्णीय आणि कष्टकरी शूद्रातिशूद्र यांच्यात एक प्रकारचा दुरावा निर्माण झाला होता. गरीब शेतकऱ्यांबद्दल त्यांना यत्किंचितही सहानुभूती नव्हती. त्यामुळे त्यांची कुठेही दाद लागत नसे. चहू बाजूंनी तो कसा नागवला जात होता याचे जोतीरावांनी या ग्रंथात रोखठोक भाषेत आणि अधूनमधून उपहासात्मक पद्धतीने वर्णन केले आहे. खेड्यांतील भटभिक्षुक चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून फाल्गुन महिन्याच्या अखेरपर्यंत आणि गर्भधारणेपासून श्राद्धविधीपर्यंत त्यांना कसे बेदरकारपणे लुबाडतात ते त्यांनी येथे दाखवून दिले आहे. त्याबरोबरच द्रव्यलोभी, हृदयशून्य

सावकार आणि पक्षपाती लाचखाऊ अंमलदार यांनी केलेल्या शेतकऱ्यांच्या शोषणाचे जे चित्र म. फुले यांनी या ग्रंथात रेखाटले आहे, त्याला तत्कालीन मराठी वाङ्मयात तोड नाही.

शेतकऱ्यांमध्ये काही क्षुल्लक कारणावरून थोडी कुरबूर सुरू आली की, लगेच कळीचे नारद कुलकर्णी त्यांच्यात कलागती लावून देतात. मामलेदाराकडे दावा घालण्यास त्यांना प्रवृत्त करतात; आणि तक्रारीचा निकाल तुमच्या बाजूने होईल अशी दोन्ही पक्षांना आशा लावून त्यांच्याकडून पैसे उकळतात. मामलेदार कचेरीतील ब्राह्मण कामगार निरक्षर वादीप्रतिवादींच्या जबान्या घेताना ज्या पक्षकाराकडून त्यांची मूठ गार झाली असेल, त्याला काही सूचक प्रश्न विचारून त्याला अनुकूल अशा जबान्या तयार करतात. कित्येक ब्राह्मण कारकून जबान्या लिहिताना त्यातील काही मुद्द्याची कलमे अजिबात गाळून टाकतात; तर कित्येक बिलंदर लेखनिक या जबान्या घरी नेऊन त्यात मन मानेल तसा बदल करून परत जागच्या जागी आणून ठेवतात. त्यामुळे एखादा उच्चवर्णीय अंमलदार जरी न्यायप्रिय व निःपक्षपाती असला, तरी त्याच्या हातूनही गैरइन्साफ होतो. पुढे खिसे चापसणाऱ्या बगळेवकिलांनी भरीस घातल्यावरून इंग्रज कलेक्टरकडे ते अपील करतात. तेथेही ज्या पक्षकाराकडून शिरस्तेदाराला भरपूर लाच मिळते, त्याच्याच बाजूने खटल्याचा निकाल लागतो.

एखाद्या तिरसट कलेक्टरापुढे शिरस्तेदाराची मात्रा चालत नाही. अशा वेळी तो ती प्रकरणे जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणी न ठेवता त्या बिचाऱ्यांना गावोगाव हिंडवतो. अखेरीस दोन्ही पक्षांपैकी जास्त खर्च करणाऱ्या पक्षास जेव्हा जय मिळतो तेव्हा एकंदर गावकरी लोकांत चुरस उत्पन्न होऊन दोन तट पडतात. त्यांच्यात सतत कलह होत राहतात; आणि संधिसाधू कुलकर्णी त्यांना प्रोत्साहन देतात. त्यातून मारामारी झाली की, गावातील लोकांवर फौजदारी खटले होतात. या खटल्याच्या कामात ज्यांच्याकडून कुलकर्ण्याचा हात ओला झाला असेल, त्यांच्या बाजूने जबान्या मिळविण्याची कुलकर्णी कोशीस करतात. त्यांच्या सूचनांचा अव्हेर करून जे शेतकरी उलट साक्ष देण्यास पुढे येतात, त्यांची ओळखीपाळखीचे अधिकारी व वकील यांच्याकडून कोर्टात भंबेरी उडविली जाते. खटल्याचा निकाल लागून दंड झाला, तर ती रक्कम भरण्यासाठी शेतकऱ्याला सावकाराचे घर धुंडावे लागते. पण " आमच्या सरकारच्या पक्षपाती शेतकऱ्याचे कायद्यामुळे शेतकऱ्यास कोणी अब्रूवाले सावकार आपल्या दाराशी उभेसुद्धा करीत नाहीत. कारण आपले पदरचे पैसे शेतकऱ्यास कर्जाऊ देऊन, त्यानंतर निवाडे करून वेळेवेळी खिसे चापसणाऱ्या आडमूठ शूद्र बेलिफांच्या समजुती काढून, सामाने रुजू करून

आणलेल्या अज्ञानी शेतकऱ्यासमक्ष भर कोडतात सावकारास फजिती करून घ्यावी लागते."[१०]

त्या काळी न्यायाधीश बहुधा उच्चवर्णीयच असत. ते आपल्या वरिष्ठ जातीच्या तोऱ्यात इतर सर्व जातींतील लोकांबरोबर अरेतुरेशिवाय भाषणच करीत नसत. त्यांचे वय व प्रतिष्ठा लक्षात न घेता ते वेळाशक त्यांची रेवडी रेवडी करून सोडत. मारवाडी सावकारांनाही त्यांच्याकडून अपमानास्पद वागणूक मिळायची. त्यामुळे अनेक सभ्य व सत्प्रवृत्त सावकारांनी आपला धंदा बंद केला. परंतु कित्येक ब्राह्मण व मारवाडी सावकारांनी अशा अपमानाचा विधिनिषेध न बाळगता आपला व्यवसाय चालू ठेवला होता. मात्र कर्ज देताना कर्जरोखे लिहून घेऊन व व्याजमनुती कापून घेऊन बाकीची रक्कम ते नडलेल्या शेतकऱ्याच्या हवाली करीत असत. ज्या शेतकऱ्यांची तेवढी पत नसे, त्यांच्याकडून ते सरळ जमिनीचे खरेदीखत लिहून घेत. तसे लिहून घेताना "तुम्ही आमचे रुपयांची फेड केल्याबरोबर आम्ही तुमची शेते परत खरेदी करून तुमच्या ताब्यात देऊ" असे शपथपूर्वक आश्वासनही देत. परंतु "या सोवळ्या व अहिंसक सावकारांपासून कुटुंबवत्सल अज्ञानी भोळ्या शेतकऱ्यांची शेते क्वचितच परत मिळतात."[११] हे कटू सत्य जोतीरावांनी नमूद करून ठेवले आहे. गहाणखत लिहून घेतेवेळी खोटे आकडे टाकून शेतकऱ्यांची फसवणूक करताना त्याबाबत या सावकारांना यत्किंचितही खंत वाटत नसे. व्याजाचे अवास्तव दर आणि हिशोबातील खोटेपणा यातून शेतकऱ्यांची किती बेसुमार लुबाडणूक होते असे ते 'शेतकऱ्याचा असूड' या ग्रंथातील पुढील परिच्छेदावरून स्पष्ट होईल.

शेतकऱ्याने "स्टांप आणल्यानंतर कुलकर्णी वगैरे लोकांकडून त्याजमध्ये नाना प्रकारच्या अटी घालून लिहून घ्याव्या. आणि त्याजवर त्याची व त्याचे भाऊबंदाची किंवा मुलांची सहीसाक्ष घेऊन त्याचे हातावर लिहणावळीचा वगैरे खर्च कमी करून दहा-बारा रुपयांबद्दल नऊ-दहा रुपये ठेवावे. तो कागद लिहून त्यास काही दिवस लोटल्यानंतर त्याचे व्याजमुद्दल जरी त्यास मिळून चुकले, तरी त्या व्याजाचे व्याज आणि त्याचे पडव्याज जुळून त्याच्या मुलाच्या लग्नाकरिता थोडेसे नवीन पैसे देऊन त्याजबद्दल नवीन कागद लिहून घ्यावा. पुढे काही दिवसांनी त्याचे व्याज जुळून पुनः त्याचा नवीन कागद घ्यावा. येणेप्रमाणे क्रम चालून त्या गरीब बिचाऱ्यांच्या अंगावर तीन-चार वर्षांत सुमारे दोनशे-अडीचशेची रक्कम फुगली म्हणजे त्याजबद्दल सरकारात फिर्याद टाकून त्याजवर खर्च सुद्धा तीनशे अथवा सव्वा तीनशे रुपयांचा हुकूमनामा करून ऐन धान्य वगैरे काढण्याची वेळ आली की, त्याच्या शेतीवर जप्ती आणून बसवावी".[१२]

गव्हर्नर जनरल यांच्या कौन्सिलमध्ये २० जून १८७८ रोजी मुंबई इलाख्यातील

शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणासंबंधी चर्चा चालू असताना नामदार कॉकरेल यांनी आपल्या भाषणात प्रत्यक्ष घडलेली एक गोष्ट उदाहरणादाखल सांगितली होती. एका शेतकऱ्याने दहा रुपये कर्जाऊ घेतले होते. त्यानंतर पुढच्या दहा वर्षांत कर्जफेड म्हणून त्याने सावकाराला एकशेदहा रुपये दिले. तरी देखील त्याच्या नावावर आणखी दोनशेवीस रुपयांची बाकी निघाली. याचा अर्थ या एकंदर व्यवहारात व्याजाची रक्कम अवास्तव फुगत जाऊन या शेतकऱ्याला मूळ रकमेच्या तेहतीसपट रुपये भरावे लागणार होते. सरकारी अहवालात नमूद केलेली ही गोष्ट लक्षात घेतली, तर जोतीरावांच्या प्रतिपादनात अतिशयोक्ती आहे असे कुणालाही म्हणता येणार नाही.[१३]

जोतीरावांच्या या ग्रंथलेखनाला जवळपास शंभर वर्षे होत आली. खेड्यांतील सामाजिक व आर्थिक जीवनाची ज्यांना प्रत्यक्ष ओळख आहे, त्यांना त्यांच्या प्रतिपादनातील सत्यतेची आजही प्रचीती आल्याखेरीज राहणार नाही. गेल्या काही दशकांत खेड्यांतील निरनिराळ्या जातींच्या अर्थसंबंधात खूपच बदल घडून आला आहे. बहुजनसमाजातील वरिष्ठ जातींमधून एक सधन शेतकरी व कारखानदार यांचा ऐपतदार वर्ग अस्तित्वात आला आहे. तरी देखील खेड्यापाड्यांतील लहानसहान गरीब शेतकऱ्यांची दैन्यावस्था अद्याप संपलेली नाही. भूमिहीन शेतमजुरांच्या संख्येत तर उत्तरोत्तर भरच पडत आहे.

खेड्यांतील सावकार आणि शासनयंत्रणेतील लहानमोठे अधिकारी यांच्या परस्परसंबंधांचे जोतीरावांनी रेखाटलेले चित्र कसे प्रत्यक्ष वस्तुस्थितीला धरून आहे ते स्वातंत्र्योत्तर काळातील शासकीय अहवालांवरून स्पष्ट होते. शासनाने स्वतः जमीन कसणाऱ्या गरीब शेतकऱ्यांच्या कल्याणासाठी मंजूर केलेले कायदे या युतीमुळे केवळ कागदोपत्री राहिले आहेत. आजच्या काळातील ही परिस्थिती ध्यानात घेतली म्हणजे जोतीरावांची अंतर्भेदी दृष्टी आणि शोषित वर्गासंबंधीची त्यांची कळकळ याबद्दल विस्मय वाटल्याखेरीज राहात नाही.

## राजनिष्ठा आणि शेतकऱ्यांचा कैवार

इंग्रजांच्या न्यायबुद्धीवर म. फुले यांचा विश्वास होता. त्यांच्याविषयी त्यांच्या मनात कृतज्ञतेची भावना होती. तरी देखील जेव्हा जेव्हा सरकारचे धोरण व निर्णय हे शेतकऱ्यांच्या हितास विघातक आहेत असे त्यांना आढळून आले, तेव्हा तेव्हा त्यांनी सरकारचा आणि शासकीय अधिकाऱ्यांचा निःसंदिग्धपणे निषेध केला आहे. शेतकऱ्यांकडून वेगवेगळ्या कराच्या रूपाने शासन भरपूर द्रव्य वसूल करते; पण त्या मानाने खेड्यांतील लोकांना कोणत्याही प्रकारच्या सुविधा पुरवत नाही अशी

त्यांची तक्रार होती. दिवसरात्र खपून उत्पन्न केलेला माल कराचे हप्ते अदा करण्याकरिता शेतकऱ्याला बाजारात नेऊन विकावा लागतो वाटेत नगरपालिका त्यावर जकात आकारतात. हे तर काय पण त्यांच्या कोंड्यामांड्याच्या भाकरीबरोबर त्याला तोंडी लावण्यासाठी रोजच्या रोज लागणाऱ्या मिठावरही शासनाने भली मोठी जकात बसवली आहे. शेतकऱ्यांवरील या दुःसह करभाराचे वर्णन करताना फुले यांच्या लेखणीला विलक्षण धार चढते. वास्तविक पाहता "शेतकऱ्यांनी लागवडीकडे केलेला खर्चसुद्धा उभा राहणेची मारामार पडते. तेव्हा ते मारवाड्यापासून कर्ज काढून पट्टी देतात व याविषयी बारीक चौकशी करण्याकरिता नेमलेल्या ऐषआरामात गुंग असणाऱ्या व संध्यासोवळे यामध्ये निमग्न असणाऱ्या भट सरकारी कामगारांस फुरसत तरी सापडते काय ? त्यातून इकडील कित्येक मोठ्या आडनावाच्या सभांतील सरकारी चोंबड्या नेटिव्ह चाकरांनी 'शेतकरी लोक लग्नकार्य निमित्त्याने बेलगामी खर्च करितात, म्हणून ते कर्जबाजारी झाले आहेत.' अशी लटकीच पदरची कंडी उठविल्यावरून, महासमुद्राचे पलीकडील आमच्या महाज्ञानी चार चार घोड्यांच्या चारटात बसून फिरणाऱ्या मेंढपाळ स्टेट सेक्रेटरीस शेतकऱ्यांचे पोकळ ऐश्वर्य जेव्हा पाहवेना, तेव्हा त्यांनी तेथील कसबी लोकांनी तयार केलेल्या विलायती जिनसांवर अजीबात जकात काढून टाकली. येथे त्यांनी आपल्या शहाणपणाची कमाल केली!"[१४] येथे जोतीरावांनी सार्वजनिक सभेचे पुढारी आणि इंग्लंडच्या मंत्रिमंडळातील भारतमंत्री यांच्यावर कडाडून हल्ला चढवला आहे.

इंग्रजी राजवटीच्या प्रारंभापासून जमीन महसुलाप्रमाणेच आयात मालावरील जकात ही सरकारच्या उत्पन्नातील जमेची एक महत्त्वाची बाब होती. इंग्लंडातील शासनही त्या काळी उत्पन्नाच्या दृष्टीने आयात मालावर जकात बसवीत असे. मँचेस्टर येथील आधुनिक कापडधंद्याचा विकास झाल्यावर आपल्या मालाला परदेशातील बाजारपेठा मिळविण्यासाठी तेथील कारखानदारांची धडपड सुरू झाली. त्यांच्या दडपणाखाली एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर तेथील शासनाने आंतरराष्ट्रीय बाजारपेठेत खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचा पुरस्कार केला. १८५३ सालानंतर भारतातही कापडधंद्याचा हळूहळू विकास होऊ लागला. तेव्हा भारतात आयात होणाऱ्या कापडावरील जकातीमुळे भारतातील कापडधंद्याला संरक्षण मिळून इंग्लडमधील कापडउद्योगावर अन्याय होत आहे अशी तेथील कारखानदारांनी हाकाटी सुरू केली. परंतु उदारमतवादी पक्ष अधिकारारूढ असताना भारत सरकारच्या सांगण्यावरून ही जकात चालू ठेवण्यात आली होती. इंग्लंडमध्ये नव्या निवडणुका होऊन कॉन्झर्वेटिव्ह पक्ष अधिकारावर आला; आणि लिटन यांची व्हाइसरॉय म्हणून नेमणूक करण्यात आली. त्यांनी भारतात आल्यावर येथील लोकमताला न जुमानता

ही जकात रद्द केली. या नव्या निर्णयामुळे भारतातील कापडव्यवसायाचे तर नुकसान झालेच; पण सरकारी उत्पन्नही घटले.

शेतकऱ्यांना भरपूर पाणी मिळावे म्हणून लक्षावधी रुपये खर्च करून सरकारने जागोजाग कालवे बांधले आहेत. परंतु यामागचा हेतू इंग्लंडमधील सावकारांना 'महामूर' व्याज मिळावे; आणि इंग्रज इंजिनियरांना मोठमोठे पगार देता यावेत हाच आहे. या कालव्यातील पाण्यापायी सरकार शेतकऱ्यांपासून मन मानेल तसा पैसा घेत असले, तरी त्यांच्या शेतांना वेळच्या वेळी पाणी मिळण्याची सोय त्याजकडून होत नाही. म्युनिसिपालिट्या जकात म्हणून शेतकऱ्यांकडून हजारो रुपये जमा करतात. परंतु या पैशाचा विनियोग शहरवासियांकरिता मोठमोठे रस्ते, त्यांवरच्या खांबाखांबावर कंदिलाची रोषणाई, पाण्याच्या तोट्या, चिरेबंदी गटारे, कचऱ्याच्या गाड्या यांसारख्या सुखसोयी प्राप्त करून देण्यासाठी होतो. त्यांमधून खेडेगावातील लोकांना काहीसुद्धा सुविधा मिळत नाहीत. त्यांच्या ओढगस्त स्थितीत यत्किंचितही बदल होत नाही. उत्पादनखर्च, शेतसारा व लोकल फंड वारून शेतकऱ्यांना जिवापाड कष्ट करूनही दरमहा दरमाणशी तीन तीन रुपयेही उरत नाहीत. उलट साधारण युरोपियन व हिंदी अधिकाऱ्यांना दरमहा पंधरा रुपये नुसत्या किरकोळ खर्चास किंवा दारूपाण्यास पुरत नाहीत. चहूबाजूंनी होणाऱ्या शेतकऱ्यांच्या या शोषणात आर्थिक विषमतेचे मूळ आहे, अशी जोतीरावांची धारणा होती.

महात्मा फुले यांच्या काळात इंग्लंडमधील आर्थिक विचारावर अभिजात अर्थशास्त्राचा पगडा होता. त्याचप्रमाणे राज्यकर्त्यांनी अर्थकारणात शासकीय अलिप्ततेच्या धोरणाचा पुरस्कार केला होता. भारतातील राष्ट्रवादी अर्थशास्त्रज्ञांनी भारत हे एक एकसंध राष्ट्र मानून इंग्लंडला हितावह होणारे आर्थिक धोरण भारतास कसे हानिकारक आहे ते दाखवून दिले. परंतु भारतीय समाजाच्या वेगवेगळ्या घटकांवर या शासकीय धोरणाचे काय परिणाम होतात त्याचे विश्लेषण मात्र त्यांनी केले नाही. त्यांनी फक्त अलिप्ततेच्या धोरणाऐवजी संरक्षणाच्या तत्त्वाचा आग्रह धरला होता. गेल्या अर्धशतकात केवळ संरक्षणावर भर देणाऱ्या शासनाकडून कल्याणकारी राज्याच्या दिशेने अर्थशास्त्राची प्रगती झाली आहे. प्रत्येकाच्या ऐपतीप्रमाणे त्याच्यावर कर बसवावा, आणि राष्ट्राचे उत्पन्न वाढवणे आणि निरनिराळ्या वर्गांच्या उत्पन्नातील विषमता कमी करणे ही दोन उद्दिष्टे साध्य करण्यासाठी उपाययोजना करावी हे कल्याणकारी राज्याच्या वित्तीय धोरणाचे महत्त्वाचे तत्त्व म्हणून आता मान्यता पावले आहे. जोतीरावांचा अर्थशास्त्राचा खास व्यासंग नव्हता. पण शेतकऱ्यांच्या हितसंबंधांशी ते तादात्म्य पावले होते. या दृष्टीने त्यांनी त्या काळात ज्या मूल्यांची तरफदारी केली, ती अलीकडील अर्थशास्त्रीय विचाराशी मिळतीजुळती

आहेत. देशातील निरनिराळ्या गटांच्या हितसंबंधांतील मूलभूत विरोध महाराष्ट्रात त्यांनाच प्रथम उमगला; आणि म्हणून प्रस्थापित समाजव्यवस्थेला विरोध करून शूद्रातिशूद्रांच्या न्याय्य हक्कांचा त्यांनी हिरिरीने पाठपुरावा केला.

## शेतीसुधारणेच्या उपायांचे दिग्दर्शन

शेतकऱ्यांची स्थिती सुधारण्याच्या दृष्टीने त्यांनी 'शेतकऱ्याचा असूड'या आपल्या ग्रंथात काही सूचना केल्या आहेत. त्यात पाणी-पुरवठ्याला साहजिकच त्यांनी अग्रक्रम दिला आहे. डोंगरावरील पानाफुलांचे, कृमिकीटकांचे व मांसाहाडांचे सत्त्व पावसाने पुराच्या पाण्याबरोबर वाहून जाऊ नये म्हणून लष्कर व पोलिस खात्यांतील शिपायांकडून सरकारने जागोजाग तालीवजा बंधारे बांधून घ्यावेत, लहानमोठी धरणे बांधावीत, प्रत्येक गावातील शेतांच्या पाणाड्याकडून पाहण्या करून जेथे पाण्याचे झरे सापडतील, ह्या सर्व जागांच्या खुणा त्या त्या गावच्या नकाशावर नमूद करून केवळ सरकारच्या मदतीशिवाय पाण्याचा मार्ग दाखवणाऱ्या पाणाड्या-सह विहिरी खोदणाऱ्या शेतकऱ्यांना बक्षिसे देण्याचा उपक्रम सरकारने सुरू करावा; नदीनाले व तलाव यांतील साचलेला गाळ पूर्वीप्रमाणे शेतकऱ्यांना फुकट नेऊ द्यावा; ज्या गावाची गायराने जंगलखात्याने आपल्या ताब्यात घेतली असतील, त्यांस ती परत करावीत अशा जोतीरावांच्या शिफारशी होत्या.

पाणीपुरवठ्याप्रमाणे जनावरांच्या पैदाशीचा प्रश्नही त्यांनी विचारात घेतला आहे. गोरक्षणाची आवश्यकता त्यांनी प्रतिपादिली आहे. पण त्यांची दृष्टी धार्मिक नसून सामाजिक उपयुक्ततेची आहे. सन १८७७–७८ च्या दुष्काळात महाराष्ट्रात मोठ्या प्रमाणावर गुरांची हानी झाली होती. म्हणून येथील शेतकऱ्यांना नव्या तंत्रविद्येचे ज्ञान देऊन यंत्रद्वारे शेतीचे काम करण्यापुरती समज येईपर्यंत गोहत्येला कायद्याने बंदी करावी. इंग्रज व मुसलमान यांनी या गाई बैलांऐवजी शेळ्या-बकरी मारून खावीत किंवा वाटल्यास परमुलुखातील गाया-बैल खरेदी करून येथे आणून त्यांचे मांस खावे. शेळ्यामेंढ्यांच्या लेंड्यामुतापासून होणाऱ्या खताचा पुरवठा व्हावा म्हणून शासनाने इतर देशांतील नाना प्रकारच्या उत्तमोत्तम शेळ्यामेंढरांची बेणी खरेदी करून या देशात आणून त्याची अवलाद उत्पन्न करावी, म्हणजे शेतकऱ्यास त्याचा फायदा होईल.

पीकसंरक्षणासाठी शेतकऱ्यांना बंदुका जवळ बाळगण्यास सरकार परवानगी देत नाही. तेव्हा रानडुकरे वगैरे जनावरांना मारावयाची जबाबदारी सरकारने पोलिस खात्यावर टाकावी; आणि जनावरांच्यामुळे शेतीचे नुकसान झाल्यास ते सर्व पोलिस खात्यातील वरिष्ठ अंमलदारांच्या पगारातून कापून घेऊन त्याची भरपाई करावी

किंवा सरकारी तिजोरीतून ते देण्यात यावे. त्याचप्रमाणे शासनाने साल-दरसाल प्रदर्शने भरवावी. शेतकामाच्या परीक्षा घेऊन त्यात जे विशेष नैपुण्य दाखवतील, त्यांना त्यांच्या गुणवत्तेनुसार बक्षिसे व पदव्या द्याव्यात. शेतकऱ्यांच्या मुलांनी शेती व तदनुषंगिक व्यवसाय यांत लक्ष घातल्यावर त्यांत त्यांची कल्पकता व कार्यक्षमता दिसून आल्यास त्यांना सरकारी खर्चाने विलायतेतील शेती-शाळा पाहण्याकरिता पाठवावे. अशा तऱ्हेच्या अनेक उपयुक्त सूचना त्यांनी केल्या आहेत.

दख्खनमधील दंग्यानंतर शेतकऱ्यांना कर्जपुरवठा करण्यासाठी सावकाराला पर्याय म्हणून स्वतंत्र शेतकी बँका काढण्याची कल्पना पुढे आली होती, तिला लोकहितदक्ष इंग्रज अधिकारी वेडरबर्न यांनी पाठिंबा दिला होता. परंतु शेतीचा धंदा जोपर्यंत चांगला किफायतशीर होत नाही, तोपर्यंत या बँका यशस्वी होणार नाहीत, असे जोतीरावांचे मत होते. शेतीचा धंदा फायदेशीर व्हावयाचा असेल, तर प्रथम त्याच्यावरील करांचा बोजा कमी केला पाहिजे. त्याकरिता विलायतेतील सावकारांना दिले जाणारे प्रचंड व्याज आणि लष्कर, पोलिस, न्याय, महसूल, शिक्षण इत्यादी विभागांतील अधिकाऱ्यांना शंभर रुपयांच्यावर मिळणारा पगार व पेन्शने कमी करून शासनाच्या अवाढव्य खर्चाला एकदम कात्री लावण्याचा मार्ग त्यांनी सुचवला आहे.

महात्मा फुले हे शेतकऱ्यांची गाऱ्हाणी परखडपणे वेशीवर टांगणारे महाराष्ट्रातील पहिले समाजचिंतक होत. त्यांनी आपले विचार शास्त्रीय पद्धतीने पारिभाषिक संज्ञांचा वापर करून मांडलेले नाहीत. त्यांच्या विवेचनपद्धतीत एकसुरीपणा आहे; ओबडधोबडपणा आहे. तरी देखील येथील जातीय व वर्गीय संबंधांतून होणाऱ्या शेतकऱ्यांच्या अनिर्बंध शोषणाचे त्यांनाच प्रथम आकलन झाले होते. इंग्रजांची राज्यपद्धती समान नागरिकत्व आणि प्रत्येक व्यक्तीचे हक्क व जबाबदारी या दोन तत्त्वांवर आधारलेली होती. आधुनिक शिक्षणामधून बहुजनसमाजातील नव्या पिढीला आपल्या धार्मिक व सामाजिक हक्कांची जाणीव होऊ लागली होती. व्यक्तीची प्रतिष्ठा, संधिसमानता आणि व्यवसायस्वातंत्र्य या त्रिपुटीचा सर्वत्र उदोउदो होत होता. त्यामुळे स्वाभाविकपणेच जन्मसिद्ध उच्चनीचभावाचे तत्त्व हळूहळू मागे पडत होते. हे सर्व इंग्रजांच्या आधुनिक राज्यपद्धतीचे फलित होते. म्हणून जोतीरावांनी इंग्रजी राजवटीची वारंवार प्रशंसा केली आहे. परमेश्वरावर त्यांची दृढ श्रद्धा असली, तरी पुरोहितशाहीला त्यांचा विरोध होता. धार्मिक क्षेत्रातील मध्यस्थांच्या हानिकारकतेचे हे तत्त्व त्यांनी इतर क्षेत्रांनाही लागू केले. इंग्रज राज्यकर्ते हे मुळात न्यायप्रवण व निःपक्षपाती आहेत. त्यांना सर्व थरांतील प्रजाजनांच्या कल्याणाबद्दल आस्था आहे. पण गोरे अंमलदार आळशी व ऐष-

आरामी आणि उच्चवर्णीय अधिकारी कावेबाज व स्वार्थी असल्यामुळे शेतकऱ्यांची ससेहोलपट होत आहे अशी त्यांची भावना होती. म्हणून गोऱ्या व काळ्या शासकीय अंमलदारांच्या बेजबाबदारपणावर व कर्तव्यभ्रष्टतेवर त्यांनी सातत्याने ताशेरे झाडले आहेत.

इंग्रजांच्या साम्राज्यवादाचा खराखुरा आशय जोतीरावांना उमगला नाही. कारण येथील जनतेची त्यांनी चालवलेली पिळवणूक अप्रत्यक्ष व संस्थात्मक होती. भारतातील बहुसंख्य गरीब शेतकऱ्यांच्या हिताचा विचार करून आपण आपली धोरणे आखत आहोत असा त्यांचा दावा होता. जोतीरावांचा सुरुवातीपासून ज्यांच्याशी व्यक्तिशः संबंध आला, ते अधिकारी व धर्मोपदेशक, उद्योगी, शिक्षणप्रेमी आणि येथील लोकांबद्दल सहानुभूती बाळगणारे होते. भारतात अर्थशास्त्राच्या अभ्यासाचा नुकताच प्रारंभ झाला होता. राष्ट्रवादी नेत्यांना व विचारवंतानाही इंग्लंड व भारत यांच्यातील हितविरोधाचा स्पष्टपणे व समग्रतेने बोध झालेला नव्हता. साम्राज्य–शाहीचे काळेकुट्ट अंतरंग अजून त्यांच्या दृष्टिपथात आले नव्हते. निरनिराळ्या कारणांनी त्या वेळचे बहुतेक सर्व नेते व विचारवंत आपली राजनिष्ठा वारंवार आवर्जून प्रगट करीत होते. खेड्यांतील शूद्रातिशूद्रांचा दैनंदिन व्यवहारात उच्चवर्णीय सरकारी नोकरांशीच संबंध येत होता. तेव्हा जोतीरावांनी साम्राज्यशाहीच्या विघातक स्वरूपाकडे दुर्लक्ष करून शेतकऱ्यांच्या दुर्दशेबद्दल ब्राह्मणांना जबाबदार धरले, यात अस्वाभाविक असे काही नाही. त्यांनी शेतकऱ्यांचे प्रश्न समरसतेने समजून घेतले. त्यांची सर्वांगीण चिकित्सा केली; आणि या कष्टकरी वर्गाची कैफियत गव्हर्नर जनरल आणि इतर वरिष्ठ अधिकारी यांच्याकडे सडेतोडपणे सादर करण्यात जी तत्परता व जे धैर्य दाखविले त्यांतच त्यांच्या लोकाभिमुखतेचे रहस्य साठवलेले आहे.

## संदर्भ व टीपा

१. The Industrial Evolution of India, p. 21.

२. Report of the Deccan Riots Commission, p. 12–13

३. समग्र वाङ्मय, पृ. ४५१

४. Report of the Deccan Riots Commission, p. -6

५. "The Marwari and Gujar sowkars were almost exclusively the victims of the riots, and in villages where sowkars of the Brahmin and other castes shared the moneylending business with Marwaris it was usual to find that the latter only were molested. There were however exceptions, where

the leading or only sowkars were of the Brahmin caste, as in the case of the village of Ghospuri." Report of the Deccan Riots Commission, p. 3

६. Report of the Indian Famine Commission, Vol. I, p. 28

७. समग्र वाङ्मय, पृ. २०३

८. समग्र वाङ्मय, पृ. २०४

९. समग्र वाङ्मय, पृ. २०६

१०. समग्र वाङ्मय, पृ. २०९

११. समग्र वाङ्मय, पृ. २११

१२. समग्र वाङ्मय, पृ. ३२०

१३. "A ryot had borrowed rupees 10, and at the end of ten years from the date of the loan, his account with his creditor stood thus : he had paid rupees 110 and still owed rupees 220. So that in the short space of ten years, through the process of repeated renewal of bonds in which compound interest at high rates was added to the principal, his debt had been made to mount up to thirty-three times the sum actually borrowed by him."—Agricultural Indebtedness in India, p 129

१४. समग्र वाङ्मय, २३०

९

# शिक्षणाशिवाय तरणोपाय नाही

'ज्ञान ही एक शक्ती आहे', 'शिक्षण हे सर्वांगीण सुधारणेचे प्रवेशद्वार आहे' या सूत्रवचनांवर एकोणिसाव्या शतकातील समाजचिंतकांचा दृढ विश्वास होता. सुधारणेसंबंधीच्या त्यांच्या कल्पना जरी वेगवेगळ्या असल्या, तरी विद्येच्या प्रभावाबाबत त्या सर्वांची एकवाक्यता होती. पाश्चात्त्य देशांतील लोकांनी आधुनिक युगात जी आश्चर्यकारक प्रगती करून घेतली आहे, त्याचे मूळ त्यांच्या ज्ञानोपासनेत आहे. तेव्हा येथे शिक्षणाचा सर्वत्र प्रसार झाल्याखेरीज लोकांत नव्या जाणिवा निर्माण होणार नाहीत; समाजाचे पाऊल पुढे पडणार नाही, याबद्दल त्या काळात कुणालाच संदेह नव्हता. जोतीरावांनीही आपल्या लेखनात आणि सत्यशोधक समाजाच्या चळवळीत शिक्षणप्रसाराच्या कार्याला अग्रस्थान दिले होते. शूद्र व अतिशूद्र समाजातील लोकांना शिक्षणाची संधी कशी उपलब्ध करून देता येईल, हाच विचार त्यांच्या मनात रात्रंदिवस घोळत होता. ग्रामीण जनतेकडे त्यांचे विशेष लक्ष होते; आणि शेतकरी हा या ग्रामीण जीवनाचा केंद्रबिंदू होता. शेतकऱ्यांचे वाढते दारिद्र्य, धर्मभोळेपणा, प्रतिकूल परिस्थितीचे आघात अगतिकतेने सोसत राहण्याची वृत्ती, ब्राह्मणांच्या वर्णवर्चस्वाला मान्यता यांमुळे ते सर्व बाजूंनी नाडले जात आहेत. सुशिक्षित वर्गात भटभिक्षुकांचे माहात्म्य हळूहळू कमी होत आहे, पण खेड्यापाड्यांतील अशिक्षित समाजात ते अजूनही कायम राहिले आहे. त्यांना लिहितावाचता येत नाही; हिशेब कळत नाही; कायद्याची माहिती नाही. ब्रिटिशांच्या अमदानीत तर लेखी करारमदारांना कितीतरी जास्त प्रामाण्य लाभले आहे. त्यामुळे सरकारी अंमलदार व सावकार यांना गरीब बिचाऱ्या निरक्षर शेतकऱ्यांची फसवणूक करणे सहज शक्य होते. शिवाय वकील, न्यायाधीश, कारकून, बेलीफ, हे सर्व एकाच जातीचे.

तेव्हा कितीही जुलूम झाला, कसेही लुबाडले गेले तरी त्यांचा प्रतिकार करण्याची शेतकऱ्यांना हिंमत होत नाही. या नव्या राजवटीतही शेतकऱ्यांची ही हलाखी व दुर्बलता जशीच्या तशीच टिकून राहिली आहे. याचे एक प्रमुख कारण म्हणजे त्यांचे अज्ञान, अशिक्षितपणा हेच होय. ह्या त्यांच्या पिढ्यान्‌पिढ्यांच्या निःसत्त्व व प्रेरणाशून्य जीवनाच्या ठराविक चाकोरीतून त्यांना बाहेर काढायचे असेल; धार्मिक, सामाजिक व आर्थिक गुलामगिरीतून त्यांची मुक्तता करायची असेल; तर शिक्षणाखेरीज दुसरा मार्ग नाही, हे जोतीरावांनी राज्यकर्त्यांना व बहुजनसमाजातील नवशिक्षितांना पुन्हा पुन्हा निक्षून सांगितले आहे.

## सरकारचे शिक्षणविषयक धोरण

इंग्रज सरकारचे शिक्षणविषयक धोरण जोतीरावांना मुळीच पसंत नव्हते. हे धोरण केवळ व्यवहारवादी, अन्यायकारक व अदूरदर्शीपणाचे आहे अशी त्यांची खात्री होऊन चुकली होती. सरकार उच्चवर्णीयांच्या शिक्षणावर पुष्कळ पैसा खर्च करते; आणि खेड्यांतील कष्टकरी जनतेच्या शिक्षणाचा प्रश्न मात्र पुरेशा गांभीर्याने विचारात घेत नाही असा त्यांचा मुख्य आक्षेप होता. वरिष्ठ जातींतील लोकांना शिक्षणाची परंपरा आहे. त्यांची सांपत्तिक स्थिती बव्हंशी समाधानकारक आहे. त्यामुळे आपल्या मुलाबाळांच्या शिक्षणाची काळजी घेण्यास ते स्वतः समर्थ आहेत. परंतु शूद्रातिशूद्रांची स्थिती तशी नाही. आतापर्यंत त्यांना विद्याध्ययनाची बंदी होती. तेव्हा शिकणे हे आपले कामच नव्हे असा त्यांचा ग्रह होऊन बसला होता. साहजिकच विद्येची महती त्यांना उमगली नाही. शिवाय गरिबीमुळे त्यांना आपल्या मुलांना लहानपणीच कामाला लावावे लागते. म्हणून मुलांना नियमितपणे शाळेत धाडणे त्यांना शक्य होत नाही. लहानपणी लग्न झाल्याने मुलींच्या शिक्षणात खंड पडतो. खेड्यांतील सरकारी शाळांचे प्रमाण अगदीच कमी आहे. नऊदशांश गावांत शाळाच नाहीत. सरकारी खजिन्यात जमा होणारा पैसा बराचसा शेतकरी–कारागिरांच्या श्रमातून पैदा झालेला असतो. त्यांपैकी काही भाग शिक्षणप्रसारासाठी खर्च करणे रास्त असले, तरी त्याचा फायदा कष्टकरी समाजाच्या पदरात न पडता, उच्चवर्णीयांनाच मोठ्या प्रमाणात त्याचा लाभ व्हावा हे सामाजिक न्याय आणि समान नागरिकत्व या तत्त्वाशी अगदी विसंगत आहे. असे असूनही राज्यकर्त्यांनी जे हे शिक्षणविषयक धोरण स्वीकारले आहे, त्यामागे त्यांचा एक विशिष्ट दृष्टिकोण आहे. येथील धार्मिक, सामाजिक व सांस्कृतिक जीवनाचे प्रवाह एकमेकांत मिसळलेले आहेत; आणि त्यांचे नेतृत्व ब्राह्मण व तत्सम वरिष्ठ जातींकडे आहे. सर्वसामान्य लोकांत अजूनही त्यांचे वजन आहे; आणि त्यांचा शब्द सामान्यतः प्रमाण मानला

जातो. आपल्या राज्याला बळकटी यावी व आपला कारभार सुरक्षित चालावा या उद्देशाने इंग्रज राज्यकर्त्यांनी या वरिष्ठ जातीतील लोकांना आधुनिक शिक्षण देऊन आपल्या शासनयंत्रणेत सामील करून घेण्याचे ठरविले. शिक्षणामुळे त्यांच्या जीवनाची नैतिक पातळी उंचावेल, कनिष्ठ थरांतील आपल्या समाजबांधवांशी ते समरस होतील; त्यांच्या उन्नतीसाठी प्रयत्नशील राहतील आणि मग साहजिकच त्यांनी आत्मसात केलेले ज्ञान झिरपत झिरपत तळच्या लोकांपर्यंत जाऊन पोहोचेल अशी इंग्रज राज्यकर्त्यांची अपेक्षा होती. परंतु अखेर हा आशावाद खोटा ठरला. चार बुके शिकून सहजासहजी नोकरी पटकावयाचा तो काळ होता. त्यामुळे बहुसंख्य नवशिक्षित सरकारी नोकरीच्या पाशात गुंतून पडले होते; स्वार्थसाधनात गढून गेले होते. काही निष्ठावंत सुधारक लोकांना आधुनिक विचाराची ओळख करून देण्यासाठी धडपडत होते. परंतु त्यांचे मतप्रतिपादन हे अरण्यरुदनच ठरले. अगदी थोडे अपवाद सोडले तर, बाकीच्या उच्चवर्णीयांत सामाजिक जाणिवेचा अभावच होता. “आजपावेतो लक्षावधी रुपये विद्याखात्याकडे जरी खर्ची पडले, तथापि त्यांपासून शूद्रांच्या समाजाच्या मानाप्रमाणे त्यांच्यात विद्वान लोकांचा भरणा वाढला नाही; इतकेच नव्हे, महार, मांग आणि चांभार यापैकी कोणी एक-एक शिकलेला कामगार आढळत नाही. मग तेथे एम्.ए. अथवा बी.ए. औषधास मिळण्याची मारामार.”[१] ही वस्तुस्थिती सरकारच्या निदर्शनास आणून देऊन जोतीरावांनी अत्यंत कळकळीने शिक्षणविषयक धोरणाची फेररचना करण्याची मागणी केली आहे. उच्चवर्णीयांच्या स्वयंकेंद्रित वृत्तीमुळे ते शूद्रातिशूद्रांपासून खूपच दुरावले आहेत. तेव्हा यापुढे त्यांच्यावर विसंबून न राहता सरकारने स्वतःच शूद्रातिशूद्रांच्या शिक्षणावर आपले सारे लक्ष केंद्रित केले पाहिजे. हरप्रयत्ने करून शूद्र व अतिशूद्र समाजात विद्येची गोडी निर्माण केली पाहिजे. खेड्यांतील मुलांच्या भावी जीवनाला उपयुक्त होईल अशा तऱ्हेचे शिक्षण त्यांना दिले गेले पाहिजे यावर जोतीरावांचा खरा कटाक्ष होता.

## शिक्षण कशासाठी ?

कष्टकरी समाजातील सर्व लोकांना बंधमुक्त करून त्यांना आपले नैसर्गिक मानवी अधिकार निःशंकपणे उपभोगण्यास समर्थ बनवणे हे जोतीरावांच्या सत्यशोधक चळवळीचे मुख्य उद्दिष्ट होते. त्याचे एक महत्त्वाचे साधन म्हणून शिक्षणप्रसाराच्या कार्यात त्यांनी लक्ष घातले होते. त्या दृष्टीनेच त्यांनी साक्षरता व सुशिक्षितपणा यांतील फरक आपल्या अनुयायांच्या निदर्शनास आणून दिला. त्या काळी शिक्षण कशासाठी ? तर नोकरीसाठी अशी लोकांची ठाम समजूत होती. आपला मुलगा शिकला, तर त्याला चांगली नोकरी लागेल या आशेने बरेचसे लोक मुलांना शाळेत

धाडीत असत. परंतु उत्तरोत्तर सुशिक्षितांची संख्या वाढत जाणार. त्या सर्वांना नोकरीच्या क्षेत्रात वाव मिळणे शक्य नाही हे जोतीरावांनी ओळखले होते. तेव्हा नोकरीच्या मागे न लागता स्वतंत्रपणे एखादा व्यवसाय करून योगक्षेम चालवण्याची हिंमत व पात्रता सुशिक्षितांच्या अंगी आली पाहिजे. म्हणून व्यवहारज्ञान व व्यावसायिक कौशल्य यांचा आपल्या शिक्षणक्रमात अंतर्भाव झाला पाहिजे. पण एवढ्याने शिक्षणाचे कार्य संपत नाही. कोरड्या ज्ञानसाधनेत जीवितसाफल्य नाही. ज्ञानाला सत्त्वसंपन्नतेची जोड हवी असा जोतीरावांचा शिक्षणविषयक दृष्टिकोण होता. पण भोवताली त्यांना प्रामुख्याने काय दिसत होते ? उच्चवर्णियांतील अनेक व्यासंगी विद्यावंत व्यसनाधीन झालेले होते. कितीतरी सुशिक्षित सरकारी अंमलदार वेलाशक लाच खात होते. अर्थातच बुद्धिविकास म्हणजे संपूर्ण विकास नव्हे हे लोकांच्या गळी उतरवण्याची त्यांना आवश्यकता वाटली. म्हणून त्यांनी "शुद्र मुलीमुलां शाळेंत घालावें। सुशील करावें सर्व कामीं", "भटावत तुम्ही शिक्षक बनावें। त्यांना हटवावें सत्यामध्यें"[२] अशी शूद्रातिशूद्रांना शिकवण दिली. त्यांच्या शिक्षणविषयक प्रतिपादनात त्यांनी सत्यनिष्ठा, शीलसंवर्धन, नीतिमत्ता, सौजन्य, प्रगतिपर विचार व व्यवहारज्ञान इत्यादी गोष्टींवर खास भर दिला आहे. प्रत्येक विद्यार्थ्याला त्याच्या शिक्षणामधून प्रगतिपर विचारांचे बाळकडू मिळाले पाहिजे; त्याच्या मनावर नैतिकतेचे संस्कार झाले पाहिजेत, अशा प्रकारची शिक्षणपद्धती त्यांना अपेक्षित होती.

विद्याखात्यातील बहुसंख्य शिक्षक ब्राह्मण व तत्सम जातींचे होते. जोतीरावांना अभिप्रेत असलेले शिक्षण या शिक्षकांकडून शूद्रांना कदापि दिले जाणार नाही अशी त्यांनी आपल्या मनाशी पक्की खूणगाठ बांधली होती. आरंभीच्या काळात त्यांनी मुलींच्या व अस्पृश्यांच्या शाळा काढल्या होत्या. या काळात त्यांना काही ब्राह्मण शिक्षकांचे सहकार्य मिळाले होते. त्या वेळेच्या अनुभवातून त्यांचे हे मत बनले होते. अतिशूद्रांना अक्षरओळख करून देण्याची या उच्चवर्णीय शिक्षकांची तयारी होती. परंतु "त्यांना चांगले प्रतीची विद्या देऊन तिजपासून त्यांस आपले बरेवाईट समजण्याची शक्ती यावी."[३] याला त्यांची मान्यता नव्हती. खेड्यातील शाळेत काम करणारा शिक्षक बहुधा ज्याला बाहेर शहरांत थारा मिळत नव्हता असा असे. तो ज्या उच्चवर्णीय समाजात जन्मला व वाढला त्याचे आणि शूद्रातिशूद्रांचे हितसंबंध परस्परविरोधी होते. ज्या परंपरेने उच्चवर्णियांना जन्मसिद्ध विशेषाधिकार बहाल केले होते, तिने शूद्रातिशूद्रांना गुलामगिरीत शतकानुशतके डांबून ठेवले होते. या गुलामगिरीचे पाश तोडून टाकण्याची प्रेरणा आपल्या विद्यार्थ्यांना देणे म्हणजे आपल्या वर्णाच्या प्रतिष्ठेला सुरुंग लावण्यासारखे होते; आपल्या जातीच्या भिक्षुकांचा

वृत्तिच्छेद करण्यासारखे होते. तेव्हा उच्चवर्णीय शिक्षक आपल्या विद्यार्थ्यांच्या मनावर अशा प्रकारचे संस्कार करणे कसे शक्य होते ?

"खेड्यापाड्यांतील एकंदर सर्व शाळांनी भट ब्राह्मण शिक्षकांचा भरणा, ज्यांची किंमत चिखलमातीचा धंदा करणाऱ्या वेलदारकुंभारांपेक्षा कमी, ज्यांस शेतकऱ्यांच्य नांगरांच्या मुठी कोणीकडून धरावयाच्या, याविषयी बिलकुल माहिती नसून तोंडपाटिलकी मात्र करणारे आयदी शेतकऱ्यांचे जिवावर लालपडून आपल्या अंगी, आम्ही सर्व मानवप्राण्यांत श्रेष्ठ, म्हणून गर्वाचा ताठा मिरवणाऱ्या मगरूर शिक्षकांकडून त्यांच्या पूर्वजांनी सर्वोपरी नीच केलेल्या शेतकऱ्यांच्या मुलांस शिस्तवार वा सोईची विद्या देववेल तरी कशी ?"[४] "आर्य भटब्राह्मण आपल्या संस्कृत विद्यालयात शूद्र शेतकऱ्यांचे मुलांस घेत नाहीत. परंतु ते आपल्या प्राकृत मराठी शाळांत कामापुरती शूद्र शेतकऱ्यांची मुले घेतात ... त्यांस धुळाक्षर, अंकगणित, मोडी कागदवाचन, भाकडपुराणांसंबंधी प्राकृत श्लोक व भूपाळ्या शिकवून त्यांस कलगी अथवा तुऱ्याच्या पक्षाच्या लावण्या शिकून तत्संबंधी झगडे घालण्यापुरते विद्वान करून सोडितात. त्यास आपल्या घरची हिशोबाची टाचणे ठेवण्यापुरते देखील ज्ञान देत नाहीत. मग त्यांचा मामलेदार कचेऱ्यांत प्रवेश होऊन कारकुनीचे काम करणे कठीणच."[५] शिक्षण म्हणजे केवळ अक्षर-ओळख या संकुचित दृष्टिकोणाचा व जातिश्रेष्ठत्वाच्या भावनेचा हा परिणाम होय.

हिंदू समाजातील वेगवेगळ्या जातींचे लोक दूरचा प्रवास, सरकारी कामकाज, बाजारहाट इत्यादी कारणांनी अनेकदा एकत्र येत असले, तरी त्यांच्या सामाजिक अभिसरणाचे क्षेत्र सामान्यतः आपआपल्या जातीपुरतेच मर्यादित होते. कित्येक शतके विद्येला वंचित झालेल्या कष्टकरी समाजात शिक्षणाची गोडी निर्माण करणे हे काम तसे सोपे नव्हते. मुलांची जिज्ञासा जागृत करून त्यांना विद्येचे महत्त्व पटवून देणे आणि निरनिराळ्या विषयांची अद्ययावत माहिती देऊन त्यांना स्वतंत्रपणे विचार करण्याची सवय लावणे असे हे दुहेरी काम होते. त्यासाठी शिक्षकांच्या मनात विद्यार्थ्यांविषयी खोल सहानुभूती व खरीखुरी आपुलकी असण्याची आवश्यकता होती. जातिबद्ध हिंदू समाजव्यवस्थेत एका जातीच्या मनुष्याला दुसऱ्या जातीच्या माणसाशी जिव्हाळ्याचे नाते जोडणे सहसा शक्य होत नाही. तेव्हा त्या त्या जातीचे शिक्षकच शिक्षणप्रसाराचे कार्य अधिक सहजतेने व प्रभावीपणे करू शकतील. ही गोष्ट ध्यानात घेऊनच शिक्षकांच्या नेमणुका व्हाव्यात अशी जोतीरावांची मागणी होती. "जेव्हा त्या त्या जातीचे पंतोजी तयार होतील; तेव्हा ते आपआपल्या जातीचा अभिमान मनी धरून ते आपल्या जातीच्या मुलांस, हातात काठी घेऊन गुरांची वळती करू लागण्याच्या पूर्वी, इतकी शिकण्याची गोडी लावतील की, पुढे ती मुले

मोठी झाल्याबरोबर, ती आपल्यातील एका मुलास बारीबारीने माळावर गुरांच्या वळत्या करावयास ठेवून, बाकी सर्व मुले अखरावर सुरपारंब्या न खेळता गावात येऊन आपल्या पंतोजीजवळ शिकण्यास कधी कमी करणार नाहीत. "[६]

## शिक्षणप्रसारातील अडचणी

खेडेगावांत सरकारी शाळा आधी मुळातच कमी. त्यात धर्माच्या नावाखाली अतिशूद्रांच्या मुलांना प्रवेश मिळत नाही. शहरांतून कुठे कुठे त्यांच्यासाठी स्वतंत्र शाळा आहेत. परंतु खेड्यापाड्यांत त्यांचा अभावच आहे. त्यामुळे या लोकांना विद्यालयांचे दरवाजे बंद असल्यासारखेच आहेत. "आपल्या इंग्रज सरकारने सर्व जातींच्या मुलांस शाळेत घेण्याविषयी जरी मोकळीक दिली आहे, तरी अतिशूद्रांच्या जातींतील पंतोजी करण्याविषयी त्यांनी काही तजवीज केली नाही. यावरून आर्य धर्म अनुयायी भट-ब्राह्मण पंतोजीकडून अतिशूद्रांची मुले विद्वान होऊन मोठे कामगार कधीच होणार नाहीत, याविषयी आमच्या भोळसर सरकाराने विचार केला आहे काय ? "[७] सरकारने पंतोजी तयार करण्याकरिता एक स्वतंत्र निराळी शाळा काढली आहे. तिच्यातील अभ्यासक्रम पुरा करून प्रशिक्षित झालेल्या पंतोजींनी किती अतिशूद्रांची मुले शिकवून तयार केली आहेत ? अतिशूद्रांच्या मुलांना शाळेत घेतले तर देशात सर्वत्र धिंगाणा होईल अशी भीती पुष्कळदा व्यक्त केली जाते. पण ही भीती व्यर्थ आहे; पलटणीत भरती करताना सरकार जातीपातीचा विचार करीत नाही. अतिशूद्रांनाही तेथे मज्जाव नाही. त्यामुळे देशात गडबड गोंधळ होत नाही. संरक्षणाचा प्रश्न राज्यकर्त्यांना अत्यंत जिव्हाळ्याचा वाटतो. म्हणून वरिष्ठ युरोपियन अधिकारी त्यात जातीने लक्ष घालतात. उलट पंतोजी तयार करण्याचे काम एखाद्या उच्चवर्णीय 'गौत्यागोमाजीकडे' सोपवतात. मग साहजिकच शूद्रातिशूद्रांना समान संधी देण्याच्या बाबतीत त्याचा वर्णश्रेष्ठत्वाचा अभिमान हटकून आड येतो. राज्यकर्त्यांनी मनात आणले, तर सर्व सरकारी शाळांतून अतिशूद्रांच्या मुलांना घेतले पाहिजे असा नियम करून त्यांना तो सहज अंमलात आणता येईल. स्पृश्य समाज थोडा नाराज होईल. पण त्यातून काही फार मोठा स्फोट होणार नाही. अतिशूद्र काय किंवा खालच्या जातींतील इतर लोक काय सरकारचेच प्रजाजन आहेत. त्यांच्या शिक्षणाची सोय करणे हे शासनाचे कर्तव्य आहे असे राणीच्या जाहीरनाम्याची आठवण करून देऊन जोतीरावांनी सरकारला निर्भीडपणे बजावले आहे. सरकारला हवे असेल, तर "त्यांनी शूद्र शेतकऱ्यांची हाडे पिळून गोळा करीत आलेल्या रायल फंडातून सालदरसाल मोठमोठ्या रकमा खर्ची घालून ब्राह्मणांचे मुलांस विद्वान करण्याची वहिवाट कायम ठेवावी. त्याविरुद्ध तूर्त माझे काही म्हणणे नाही. परंतु

त्यांनी फक्त शेतकऱ्यांच्या मुलांस विद्या देण्याची थाप देऊन वसूल करीत आलेला एकंदर सर्व लोकल फंड तेवढा तरी निदान शेतकऱ्यांच्या मुलांस मात्र इमानेइतबारे विद्या देण्याच्या कामी खर्ची घालू लागल्यास मी इतके दिवस श्रम केल्याचे फळ मिळाले असे समजून मोठा आनंद मानीन. परंतु त्यांनी तसे जर नाही केले, तर ते देवाजी-जवळ जबाबदार होतील."[८]

जन्मसिद्ध अधिकारभेदावर आधारलेल्या जातिव्यवस्थेला जोतीरावांचा सक्त विरोध होता. तरी खेड्यापाड्यांतून शिक्षणप्रसाराचे कार्य सिद्धीस न्यावयाचे, तर तेथील लोकवस्ती विचारात घेऊन त्या त्या जातीचे शिक्षक नेमले पाहिजेत असा त्यांचा आग्रह होता. याखेरीज त्यांच्या डोळ्यांसमोर दुसरा पर्यायच नव्हता. राजर्षी शाहू महाराज यांच्या बाबतीतही नेमके हेच घडले. जातिभेदामुळे हिंदू समाजाची फार मोठी हानी झाली आहे असे त्यांचे मत होते. परंतु जेव्हा त्यांनी शिक्षणप्रसाराचे कार्य हाती घेतले, तेव्हा त्यांनी निरनिराळ्या जातींची वसतिगृहे काढली; आणि त्यांवर त्या त्या जातीचे अधीक्षक नेमले. सामाजिक वास्तवाला आपल्या मनाप्रमाणे आकार देत असता त्याच्या मर्यादा स्वीकारून कार्यसिद्धीसाठी वेळप्रसंग पाहून कशी तडजोड करावी लागते याची ही दोन उत्तम उदाहरणे आहेत.

सामाजिक कार्यात जोतीरावांची भिस्त प्रामुख्याने लोकशिक्षणावर होती. बहुजन-समाजातील सुशिक्षितांनी शेतकरी व कारागीर यांची मने वळवून त्यांना आपली मुले शाळेत घालण्यास तयार केले पाहिजे. मुलांना रोजच्या रोज शाळेत यावेसे वाटेल, अभ्यासात त्यांचे मन रमेल अशा दृष्टीने शिक्षकांनी सतत प्रयत्न केले पाहिजेत. पालक व विद्यार्थी यांना उत्तेजन देण्यासाठी सरकारने शिष्यवृत्त्या व बक्षिसे ठेवली पाहिजेत. अगदी गरीब स्थितीतील मुलांसाठी वसतिगृहे काढली पाहिजेत. परंतु इतके सर्व करूनही कार्यभाग साधेल असे खात्रीपूर्वक म्हणता येणार नाही. म्हणून युक्तिवाद व मनवळवणी यांच्या जोडीला सक्तीच्या मार्गाचाही अवलंब करावा लागेल. हंटर-शिक्षणआयोगाकडे जोतीरावांनी जे निवेदन सादर केले होते, त्यात त्यांनी वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत तरी मुलामुलींचे प्राथमिक शिक्षण सक्तीचे करण्यात यावे अशी सूचना केली होती. आपल्या लेखनात त्यांनी इतरत्रही सक्तीचे तत्त्व उचलून धरले आहे. "एकंदर सर्व खेड्यापाड्यांतील सरकारी मराठी व इंग्लिश शाळा बंद करून शेतकऱ्यांवर थोडीशी इमानेइतबारे मेहरनजर करून शेतकऱ्यांपैकीच शिक्षक तयार करण्याकरिता दरएक तालुक्याने लोकलफंडापैकी रकमा खर्ची घालून, शेतकऱ्यांच्या मुलांस अन्नवस्त्र, पुस्तके वगैरे पुरवून त्यांच्या मुलांकरिता बोर्डिंग शाळा कराव्यात व त्या शाळांमध्ये त्या मुलांपैकी शाळागुरू तयार केल्यानंतर फक्त त्यांच्या शाळांनी शूद्रशेतकऱ्यांनी आपली मुले अमुक वर्षांचे वयाची होईतोपोवतो

अभ्यास करण्याकरिता पाठवावीत, म्हणून कायदा केल्याशिवाय शेतकऱ्यांच्या मुलांस, थोडेसे का होईना, परंतु खरे ज्ञान झाल्यावाचून त्यांच्या मनावरील कृत्रिमी ब्राह्मणांनी उमटविलेला ठसा फिका पडावयाचा नाही. आणि तसे केल्याविना शेतकरी शुद्धीवर येणेच नाहीत."[९]

## शेतकऱ्यांच्या शिक्षणाचा प्रश्न

जोतीरावांच्या विचारप्रणालीत शेतकऱ्यांच्या प्रश्नांना किती महत्त्वाचे स्थान होते ते आतापर्यंत पुरेसे स्पष्ट झालेले आहे. त्या काळात येथे जी शिक्षणपद्धती प्रचलित होती, ती बहुतांशी शहरी वळणाची होती. शेतकऱ्यांच्या गरजा काय आहेत ? त्यांना कोणत्या प्रकारचे शिक्षण उपयुक्त होईल ? या गोष्टींची दखल या पद्धतीत घेतली गेली नव्हती. आपल्या देशातील बहुसंख्य लोक खेड्यांत राहतात. शेती हा येथील मुख्य व्यवसाय आहे. तेव्हा शेतकऱ्यांची परिस्थिती व प्रश्न यांना प्राधान्य देऊनच येथील शिक्षणाचा विचार झाला पाहिजे. म्हणून शिक्षणाचे प्रयोजन, अभ्यासक्रम, पाठ्यपुस्तके, परीक्षा, शाळातपासणी इत्यादी बाबींची व्यवस्थित छाननी करून एकंदर शिक्षणपद्धतीत आमूलाग्र बदल घडवून आणला पाहिजे असे जोतीरावांचे म्हणणे होते.

हिंदुस्थानातील शिक्षणविषयक प्रश्नांचा अभ्यास करून त्याबाबत शिफारशी करण्यासाठी ब्रिटिश सरकारने इ. स. १८८२ मध्ये सर विल्यम हंटर यांच्या नेतृत्वाखाली शिक्षण आयोगाची नियुक्ती केली होती. या आयोगाच्या सभासदांनी मोठमोठ्या शहरांना भेटी दिल्या; आणि हिंदू, मुसलमान, पारशी, खिस्ती या समाजांतील बड्या बड्या लोकांच्या मुलाखती घेतल्या. तसे पाहिले, तर हे लोक सामान्य जनतेपासून अगदीच दुरावलेले होते. त्यांच्याशी विचारविनिमय करून हंटरसाहेबांना शूद्रातिशूद्रांचे मनोगत कसे कळणार ? खेड्यांतील गरिबांच्या झोपड्यांत जाऊन त्यांनी त्यांच्या अडीअडचणी व व्यथावेदना का समजून घेतल्या नाहीत ? शिक्षण-आयोगाच्या कार्यपद्धतीवर जोतीरावांचा हा मुख्य आक्षेप होता. तरी देखील हंटर आयोगाकडे पाठविलेल्या आपल्या निवेदनात त्यांनी काही विधायक सूचना केल्या होत्या. खेड्यांतील कष्टकरी समाजाच्या दृष्टीने प्राथमिक शिक्षणाचा प्रश्न निकडीचा होता. साहजिकच त्यांनी आपल्या निवेदनात या प्रश्नाला अग्रस्थान दिले होते.

चांगले शिक्षक खेड्यात जायला तयार होत नाहीत. कारण त्यांचे वेतन अगदी कमी असते, तेव्हा प्रथमतः त्यांच्या वेतनात वाढ झाली पाहिजे. शिवाय आणखी काही स्थानिक कामे त्यांच्याकडे सोपवली, तर त्यांच्या उत्पन्नात भर पडेल; आणि गावातील लोकांशी त्यांचा सतत संपर्क राहील. शिक्षकांचे वेतन परीक्षेच्या निकालावर

अवलंबून ठेवणे श्रेयस्कर नाही. खेड्यातील मुलांच्या घरी विद्याध्ययनाला अनुकूल असे वातावरण नसते. त्यामुळे त्यांची शैक्षणिक प्रगती मंद गतीनेच होणार हे विसरून चालणार नाही. शिष्यवृत्त्यांच्या बाबतीतही ही परिस्थिती लक्षात घेऊनच धोरण आखले पाहिजे. परीक्षेतील गुणांची टक्केवारी पाहून शिष्यवृत्त्या द्यायचे ठरवले, तर ज्यांच्यात आधीच विद्येची ओढ व अभिरुची निर्माण झालेली आहे, त्यांना त्यामुळे अधिकाधिक प्रोत्साहन मिळत राहील. उलट ज्या थरांत शिक्षणाचा प्रसार होण्याची खरी आवश्यकता आहे, त्यांना या योजनेचा फायदा घेता येणार नाही. चढाओढीचे तत्त्व सैद्धान्तिक पातळीवर कितीही सोज्वळ दिसले, तरी त्याची प्रत्यक्ष वास्तवाशी नीट सांगड घातल्याखेरीज कष्टकरी समाजाच्या प्रगतीला त्याचा काही उपयोग होणार नाही. जे तत्त्व विकासाला प्रेरक आहे असे सांगितले जात होते, ते मागासलेल्या लोकांच्या प्रगतीला विघातक होत आहे याचा जोतीरावांना पुन्हा पुन्हा अनुभव येत होता. शिक्षण व सांपत्तिक सुस्थिती यामुळे सामाजिक जीवनात सर्वत्र उच्चवर्णीयच आघाडीवर होते. प्रशासनाचे क्षेत्र ही तर त्यांची मिरासच होऊन बसली होती. या वर्गाला कष्टकरी समाजाविषयी बिलकुल सहानुभूती नव्हती. परिणामी वरिष्ठ जातींची स्थिती उत्तरोत्तर सुधारत होती; आणि खालच्या थरांतील लोकांची आर्थिक स्थिती दिवसानुदिवस जास्तच खालावत होती. जोतीरावांच्या चाणाक्ष नजरेतून हे उद्वेगजनक दृश्य निसटले नाही.

इंग्लंडात त्या काळी खुल्या निकोप स्पर्धेचे तत्त्व मान्यता पावले होते. स्पर्धाप्रधान व्यवस्थेत सर्वांना आपआपला उत्कर्ष करून घेण्याची सारखीच मोकळीक असते, असे त्याचे समर्थन केले जात होते. विषमतेवर आधारलेल्या सामाजिक जीवनात स्वातंत्र्य आणि संधिसमानता या तत्त्वांचा प्रगत व प्रस्थापित घटकांनाच पुष्कळदा फायदा उठवता येतो. उलट मागासलेले घटक सतत मागेच राहतात. "अगदी अलीकडचा प्रगत सिद्धान्त पाहिला, तर कोणत्याही खुल्या अनियंत्रित व्यवहारात सहभागी होणारे पक्ष जेव्हा बौद्धिक विकास आणि साधनसामुग्रीची अनुकूलता या बाबतींत तुल्यबल असतील, तेव्हाच त्यांना स्वातंत्र्य हवे तसे उपभोगू देणे न्याय्य व हितावह ठरते. परंतु अशी स्थिती नसताना समता व स्वातंत्र्य यांची भाषा बोलणे हे आधीच अन्यायपीडित असलेल्या लोकांच्या जखमेवर मीठ चोळण्यासारखे आहे."[१०] या अर्थाचे न्यायमूर्ती रानडे यांनी केलेले मतप्रतिपादन आंतरराष्ट्रीय व्यवहाराच्या संदर्भात होते. परंतु देशांतर्गत व्यवहारालाही ते तितकेच लागू पडते.

रानडे यांची ही मीमांसा किती अचूक व यथातथ्य होती याचा प्रत्यय जोतीरावांना पदोपदी येत होता. सामाजिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांतील हा असमतोल नाहीसा

करण्यासाठीच ते व्यापक जनताशिक्षणाच्या कार्यक्रमाचा इतक्या हिरिरीने पुरस्कार करीत होते. त्यांच्या विचारात एकांगीपणाचा लवलेशही नव्हता. प्राथमिक शिक्षणाकडे सरकारने खूपच जास्त लक्ष पुरवले पाहिजे हे खरे. परंतु देशाच्या सध्याच्या परिस्थितीत उच्च शिक्षणाला दिली जाणारी मदत बंद करणे इष्ट नाही असे त्यांना वाटत होते. मूठभर उच्चवर्णियांनी बहुसंख्य कष्टकरी समाजावर अन्याय करू नये. पण त्याबरोबरच अल्पसंख्य उच्चवर्णियांवरही अन्याय होता कामा नये असे त्यांनी ठामपणे प्रतिपादले आहे. मुसलमानांची शिक्षणाविषयीची उदासीनता घालविली पाहिजे; अस्पृश्यांच्या शिक्षणाच्या मार्गातील अडथळे दूर झाले पाहिजेत याकडे त्यांनी सरकारचे व लोकांचे लक्ष वेधले होते. जोतीराव हे मानवतावादाचे उपासक होते. त्यांचा शिक्षणविषयक दृष्टिकोणही त्यांच्या या जीवननिष्ठेशी सुसंगत असा होता.

## संदर्भ व टीपा

१. समग्र वाङ्मय, पृ. १२८
२. समग्र वाङ्मय, पृ. ४८६
३. समग्र वाङ्मय, पृ. १४१
४. समग्र वाङ्मय, पृ. २४२
५. समग्र वाङ्मय, पृ. १९३
६. समग्र वाङ्मय, पृ १४३
७. समग्र वाङ्मय, पृ. ४०९
८. समग्र वाङ्मय, पृ. २६४
९. समग्र वाङ्मय, पृ. २५४
१०. " The advanced theory concedes freedom where the parties are equally matched in intelligence and resources; when this is not the case, all talk of equality and freedom adds insult to the injury. "

—Essays on Indian Economics, page 31.

# १०



# उपसंहार

आतापर्यंतच्या गेल्या नऊ प्रकरणांत आपण महात्मा फुले यांच्या धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक व शैक्षणिक विचारांचे परिशीलन केले. स्वतंत्र प्रज्ञेच्या कोणत्याही समाजचिंतकाच्या भूमिकेचे सम्यक आकलन होण्यासाठी सहानुभूती, समरसता व मूलग्राही वस्तुनिष्ठ दृष्टी यांची आवश्यकता असते. त्याशिवाय त्याच्या विचारांचा गाभा आपल्या हाती लागत नाही. मात्र वास्तवाचा वेध घेणारा हरएक विचार एका विशिष्ट परिस्थितीतच उदयाला येतो; व विकास पावतो. तेव्हा समाजचिंतकाची मूळ प्रेरणा कितीही विशुद्ध व व्यापक असली, त्याच्या बुद्धीची झेप कितीही दूरवर जाऊन पोहोचणारी असली; तरी त्याच्या विचाराला व कृतीलाही सभोवतालच्या परिस्थितीच्या काही ना काही मर्यादा पडल्याखेरीज राहात नाहीत. जोतीराव हे केवळ अमूर्त तत्त्वचिंतनात गढून गेलेले विचारवंत नव्हते. ते महाराष्ट्रातील शूद्रातिशूद्रांचे क्रियाशील नेते होते. त्यांच्या दास्यमुक्तीसाठी सत्यशोधक समाजाची स्थापना करून त्यांनी येथे सामाजिक संघर्षाची मुहूर्तमेढ रोवली. येथील समाजपरिवर्तनाच्या चळवळीवर त्यांचे व्यक्तित्व आणि विचार यांची फार मोठी छाप पडली आहे. म्हणून आजच्या सामाजिक प्रश्नांतील गुंतागुंतीचे स्वरूप स्पष्ट होण्यासाठी जोतीरावांच्या एकंदर विचारप्रणालीचे गेल्या शंभर वर्षांतील बदलत्या परिस्थितीच्या संदर्भात कृतज्ञतापूर्वक पण काटेकोरपणे विश्लेषण व मूल्यमापन करण्याची आज खरी गरज आहे.

## धर्मनिष्ठा व इहवाद

संघर्षप्रवण मानवतावाद हेच महात्मा फुले यांच्या समग्र विचारप्रणालीचे

अंतःसूत्र आहे. ह्या मानवतावादाची जडणघडण नीट समजून घेतल्याखेरीज त्यांच्या विचारांची अपूर्वता व आगळेपण ध्यानात येणार नाही. माणूस हा वस्तुतः एकंदर प्राणिसृष्टीचाच एक घटक आहे. परंतु सृष्टीतील इतर प्राणिसमूहाहून त्याचे जे वेगळेपण आहे, त्यावर जोतीरावांनी आपल्या वाङ्मयात जागोजाग भर दिला आहे. हे वेगळेपण मनुष्याच्या सारासार विचारशक्तीत व नैतिक प्रेरणेत आहे अशी त्यांची धारणा होती. जोतीरावांच्या समग्र विचारसरणीला धर्मभावनेचे अधिष्ठान होते हे तर खरेच, परंतु त्यांच्या प्रतिपादनात कोणत्याही विशिष्ट धर्मपंथाचा अभिनिवेश नव्हता. प्रस्थापिताशी संगनमत करणाऱ्या सर्वच मतलबी धर्मसंस्थांना त्यांचा विरोध होता. ते खऱ्या अर्थाने विश्वधर्माचे उपासक होते. "मूळ धर्मभेद मानवा नसावा । एकोपा असावा । जगामाजीं "[१] असा त्यांचा विशुद्ध व व्यापक दृष्टिकोण होता. शिवाय त्यांनी आपल्या धर्मकल्पनेत आधुनिक इहवादाचा आशय ओतला होता. सामाजिक न्याय, समता, स्वातंत्र्य, बंधुभाव या उदात्त तत्त्वांशी त्यांनी आपल्या धर्मश्रद्धेची व ईश्वरोपासनेची सांगड घातली होती. जगातील यच्चयावत पदार्थ निर्मिकाने मानवांच्या उपभोगासाठी निर्माण केले आहेत. तेव्हा त्यांचा विनियोग मनुष्यमात्राच्या कल्याणासाठी, विशेषतः अनाथ-अपंगांच्या रक्षणासाठी केला पाहिजे. "प्रत्येक पदार्थाचा कोणकोणत्या ठिकाणी कसा उपयोग करावा "[२] याविषयी एकाग्रतेने विचार करून त्याप्रमाणे कृती करण्यास ईश्वरभक्तांनी रात्रदिवस झटले पाहिजे. तसे न करता होमहवन, पूजाअर्चा, क्रियाकर्म, नवससायास यांत आपला वेळ, शक्ती व द्रव्य विनाकारण वाया घालवणे हे ईश्वरी योजनेला छेद देण्यासारखे आहे. आपल्या कौटुंबिक व सामाजिक कर्तव्यांकडे पाठ फिरवून ध्यान-धारणेत, नामस्मरणात किंवा कर्मठपणात दिवसच्या दिवस खर्च करणे हे त्यांना बिलकुल मान्य नव्हते. ही वास्तविक ईश्वरोपासनाच नव्हे असे त्यांचे मत होते. दुसऱ्याची हानी होऊ न देता स्वतः प्रामाणिकपणे कष्ट करून कुटुंबपोषण करणे हाच ईश्वराची कृपा संपादन करण्याचा राजमार्ग आहे अशी त्यांची विचारसरणी होती. म्हणूनच देहधारणेसाठी भिक्षेवर अवलंबून राहणारा संन्यासवाद त्यांना अनिष्ट व अपायकारक वाटत होता. लहानथोर सर्व माणसे ईश्वराची लेकरे आहेत. तेव्हा वास्तविक पाहता देश, राज्य, धर्म, जात इत्यादी गोष्टी मनात न आणता मनुष्यजात हे एक अविभक्त कुटुंब मानून सर्व मानवी स्त्रीपुरुषांनी एकमेकांशी सलोख्याने, समदृष्टीने व बंधुभावाने वागावे.[3] परंतु जगातील प्रत्यक्ष व्यवहारात याच्या अगदी उलट स्थिती होती. स्वातंत्र्य, समता, बंधुभाव यांच्या जागी सर्वत्र गुलामगिरी, विषमता, विद्वेष यांचेच साम्राज्य पसरलेले दिसत होते. हिंदू समाजाचे जेव्हा त्यांनी निरीक्षण केले, तेव्हा त्यांना या एकाच समाजात उच्चवर्णियांचे एक

आणि शूद्रातिशूद्रांचे एक अशी दोन भिन्न जगे अस्तित्वात आहेत असे दिसून आले. ती नुसती भिन्नच नव्हे, तर परस्परविरोधी आहेत असेही त्यांना कळून चुकले. आपण कल्पिलेला जीवनादर्श आणि प्रत्यक्ष वस्तुस्थिती यांतील हा विसंवाद पाहून ते अंतर्मुख बनले. शूद्रातिशूद्रांची दयनीय स्थिती त्यांना स्वस्थ बसू देईना. त्यांच्या दास्यमुक्तीसाठी शक्तिसर्वस्व एकवटून झगडण्याचा त्यांनी निश्चय केला. त्यामुळे त्यांच्या धर्मजीवनाला एका नव्या सामाजिक दृष्टीची जोड मिळाली. त्यांच्या ह्या सामाजिक भूमिकेला पुढे इतके ऐतिहासिक महत्त्व कशामुळे लाभले, ते कळण्यासाठी प्रथम तत्कालीन परिस्थितीचा थोडक्यात मागोवा घेतला पाहिजे.

## राष्ट्रीय ऐक्य आणि वर्णसंघर्ष

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात भारतीय समाजातून एक संघटित एकात्म राष्ट्र बनण्याची प्रक्रिया येथे सुरू झाली. त्यापूर्वी अखिल भारतीय समाज तर सोडाच, पण येथील कोणताच प्रादेशिक समाजही एकसंध व एकात्म नव्हता. धर्म, राज्ये, गावे, जाती अशा लहानमोठ्या विभागांत या खंडप्राय देशातील समाज विखुरलेला होता. राज्यांच्या सीमा वारंवार बदलत असल्याने सर्वसामान्य लोकांना राज्यापेक्षा गाव व जात यांच्याविषयी अधिक जिव्हाळा वाटत असे. इंग्रजांच्या राजवटीत सबंध हिंदुस्थान प्रथमच एकछत्री अंमलाखाली आला. इंग्रजी कायदेपद्धती व शासनव्यवस्था यांमुळे शिक्षण, व्यवसाय, खाजगी मालमत्ता यांसारख्या बाबींवरील जातिसंस्थेचे निर्बंध हळूहळू सैल होऊ लागले. दळणवळणाची नवी नवी साधने उपलब्ध होत होती. निरनिराळ्या प्रांतांतील सुशिक्षित लोक इंग्रजी भाषेच्या माध्यमातून महत्त्वाच्या राजकीय व सामाजिक प्रश्नांवर विचारविनिमय करू लागले. त्यामधून एकराष्ट्रीयत्वाची पार्श्वभूमी येथे तयार झाली. इंग्रज राज्यकर्त्यांच्या स्वातंत्र्यनिष्ठेला व न्यायबुद्धीला आवाहन करून अधिकाधिक राजकीय हक्क मिळवण्याची आकांक्षा भारतातील सुशिक्षितवर्गात निर्माण झाली. तिच्यामधून पुढे राष्ट्रसभेचा जन्म झाला. त्या वेळी महाराष्ट्रात उदारमतवादी नेमस्त संप्रदाय व परंपरानिष्ठ जहाल संप्रदाय असे दोन विचारप्रवाह उदयास आले होते. राष्ट्रसभेचे नेतृत्व नेमस्त संप्रदायाकडे होते; तरी महाराष्ट्रात पुनरुज्जीवनवादी जहाल संप्रदायच अधिक लोकप्रिय होता. त्यात साहजिकच उच्चवर्णीय सुशिक्षित मध्यमवर्ग अग्रभागी होता. परकीय साम्राज्यसत्तेला विरोध व एकराष्ट्रीयत्वावर भर ही त्याच्या विचारप्रणालीची दोन मुख्य लक्षणे होती. जोतीरावांचा वर्णसंघर्षवाद हा या जहाल संप्रदायाच्या अगदी उलट बाजूचा होता. हिंदू समाज एकसंध नाही; एकात्म तर नाहीच नाही. उच्चवर्णीय शोषक आणि शोषित शूद्रातिशूद्र यांत तो विभागलेला आहे. उच्चवर्णियांकडून शूद्रातिशूद्रांची

शतकानुशतके पिळवणूक चालू आहे अशी त्यांची विचारसरणी होती. कोणताही समाज जोपर्यंत छोट्या छोट्या अनेक गटांत विखुरलेला असतो. तोपर्यंत त्यातील लोकांची अन्यायाची जाणीवही अंधुक व अस्पष्ट अशी असते. समाज एकसंध बनून त्याचा त्या दृष्टीने विचार सुरू झाला की, त्यातील घटकांच्या परस्परसंबंधांचे अधिक कठोरपणे व बारकाईने विश्लेषण होऊ लागते. युरोपात राष्ट्रवादी तत्त्वज्ञानाचा उदय झाल्यावर देशातील निरनिराळ्या लोकांना एका व्यासपीठावर आणण्यासाठी त्यांना रूढींच्या व स्थानिक निष्ठेच्या पाशांतून मुक्त करण्याची राष्ट्रवाद्यांना गरज भासू लागली. म्हणून त्यांनी नव्या जाणिवांच्या निर्मितीसाठी मानवतावादाची कास धरली. त्याचेच पुढे उदारमतवादात रूपांतर झाले; आणि कालांतराने बदलत्या परिस्थितीच्या रेट्याखाली उदारमतवादाची समाजवादात परिणती झाली. समाजवादी चळवळीं- मधून या नव्या तत्त्वविचारांचे लोण देशोदेशी जाऊन पोहोचले. भारतात पहिल्या महायुद्धानंतर साम्यवादी चळवळीस प्रारंभ झाला; आणि तिच्यातून वर्गवादी विचार- सरणीची येथील लोकांना ओळख झाली. त्याच्या जवळजवळ अर्धशतकापूर्वी कोण- त्याही सैद्धान्तिक विचारप्रणालीचा वारसा न लाभलेल्या जोतीरावांना त्यांच्या सर्जन- शील मानवतावादी दृष्टिकोणामुळे हिंदू समाजव्यवस्थेतील अंतर्विरोधाचे आकलन झाले. त्यांच्या जातिवंत द्रष्टेपणाचेच हे द्योतक म्हटले पाहिजे.

विष्णुशास्त्री चिपळूणकर हे महाराष्ट्रातील परंपरानिष्ठ सांस्कृतिक राष्ट्रवादाचे आद्य प्रवर्तक होत. त्यांच्या प्रेरणेने येथील उच्चवर्णीय सुशिक्षित आपला प्राचीन व मध्य- युगीन इतिहास, तत्त्वज्ञान, साहित्य यांकडे अभिमानाने व आदराने बघू लागले. आपल्या लोकांतील इंग्रजांविषयीचा न्यूनगंड नाहीसा करून त्यांची स्वत्वभावना जागृत ठेवण्यासाठी आपल्या पूर्वजांची कल्पकता, बुद्धिवैभव, पराक्रम, महत्त्वाकांक्षा, ऐश्वर्य यांचे केवळ गोडवे गाण्याची त्यांची वृत्ती होती. उलट ह्या गतेतिहासात ज्यांच्या वाट्याला दास्य, दारिद्र्य व दुःख यांशिवाय काहीही आले नव्हते अशा पददलितांच्या भवितव्याची जोतीरावांना चिंता होती. त्यामुळे साहजिकच त्यांना इतिहासाचे असे एकान्तिक गौरवीकरण मानवले नाही. त्यांची दृष्टी अधिक डोळस, अंतर्भेदी व वस्तुनिष्ठ होती. त्यांच्या विवेचनातील तपशिलात चुका आढळतील. त्यांचे काही निष्कर्ष एकांगी व पूर्वग्रहदूषित असतील. परंतु आपल्या इतिहासातील अन्याय- मूलक व अनर्थकारक वर्णविरोधावर त्यांनी अचूक बोट ठेवले आहे हे नाकारता येणार नाही येथील वर्णविभाग हे वर्गभेदाचेच पूर्वरूप होय. भारताचा इतिहास हा विजयी आर्यांनी येथील मूळच्या रहिवाशांवर लादलेल्या गुलामगिरीचा इतिहास आहे. आतापर्यंत येथील समाज हा स्वतःच्या कष्टाने जीवनोपयोगी वस्तूंचे उत्पादन करणारे शेतकरी, कारागीर व मजूर आणि ऐषआरामात राहणारे ऐतखाऊ प्रतिष्ठित उच्च-

वर्णीय अशा वर्गांत दुभंगलेला आहे. त्यांतील कष्टकरी समाजाच्या आर्थिक शोषणाचे मूळ हिंदू धर्मशास्त्रप्रणीत जातिव्यवस्थेत आहे. मात्र समाजातील शोषणाचा वास्तविक पाया जरी आर्थिक असला, तरी सामाजिक जीवनाचे कोणतेच क्षेत्र या शोषणमूलक वर्गसंबंधांपासून अलिप्त राहू शकत नाही. धर्म, कुटुंबसंस्था, राजकारण, शिक्षण-पद्धती, तत्त्वमीमांसा, साहित्य इत्यादी सर्व क्षेत्रांत या वर्गसंबंधांचे पडसाद कमीजास्त प्रमाणात उमटल्याखेरीज राहात नाहीत. त्यांतील जाणिवा, विचार, व्यवहार आणि मूल्यसरणी यांमधून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे वरिष्ठ वर्गाच्या हितसंबंधांची जपणूक करण्याची काळजी घेतलेली असते. जोतीरावांनी येथील सामाजिक जीवनाच्या सर्व अंगांचा स्थूलमानाने परामर्श घेऊन त्यांतील वरिष्ठ वर्गाचा मतलबीपणा व पक्षपाती वृत्ती अगदी परखडपणे दाखवून दिली आहे.

## समाजपरिवर्तनाची दिशा

जोतीरावांनी सामाजिक जीवनातील मूलभूत अंतर्विरोधालाच हात घातल्याने सर्वंकष समाजपरिवर्तनाची दिशाही त्यांच्या बरोबर ध्यानात आली रानडे-आगर-करांसारख्या तत्कालीन उच्चवर्णीय सुधारकांनी जुन्या आचारविचारांची व मूल्य-सरणीची आधुनिक चिकित्सक पद्धतीने छाननी केली; आणि पाश्चात्त्य देशांतील उदारमतवादी तत्त्वांच्या आधारे त्यांत यथोचित बदल घडवून आणण्याचा प्रयत्न केला. परंतु प्रत्यक्षात त्यांचा सामाजिक सुधारणेचा कार्यक्रम प्रायः कुटुंबसुधारणेच्या संकुचित क्षेत्रातच घुटमळत राहिला. बालविवाह, केशवपन, पुनर्विवाहप्रतिबंध, बालाजरठविवाह इत्यादी प्रश्न हे मुख्यतः मूठभर उच्चवर्णीयांचे प्रश्न होते. समाजातील बहुसंख्य लोकांना या प्रश्नाबद्दल आस्था वाटण्याचे काही कारण नव्हते. रानडे-आगरकरांच्या अवतीभोवती बहुधा महाराष्ट्रातील उच्चवर्णीय सुशिक्षित लोक होते. परंपरागत रूढींतील अन्याय व हानिकारकता त्यांना पटवून देऊन त्यांचा प्रभाव सावकाश व संथपणे कमी करण्याचा मार्ग त्यांनी अवलंबिला होता. परंतु या वरिष्ठ वर्गाची प्रतिष्ठा व विशेषाधिकार जुन्या परंपरेने शतकानुशतके सुरक्षित ठेवले होते. कोणत्याही बाह्य दडपणाखेरीज त्यावर सुखासुखी पाणी सोडण्यास हे लोक राजी होण्याचा बिलकुल संभव नव्हता त्यांची स्थितिप्रियता लक्षात घेऊन वास्तववादी वृत्तीच्या रानड्यांना आपल्या कार्यक्रमाला वारंवार मुरड घालावी लागली. समाजातील वजनदार लोकांच्या मतपरिवर्तनासाठी अनेकदा त्यांना जुन्यानव्याच्या समन्वयाचे धोरण पत्करावे लागले आगरकरांचे विवेकनिष्ठ व्यक्तिवादाचे प्रतिपादन तर येथे बहुतांशी अरण्यरुदनच ठरले. फुले यांचे कार्यक्षेत्र याहून अगदी निराळे होते त्यांची भिस्त शूद्रातिशूद्रातील नवशिक्षितांवर होती. शोषित वर्गातील गरीब शेतकरी व

कारागीर यांना जागृत व संघटित करणे, आपल्या न्याय्य हक्कांसाठी एकजुटीने झगडण्यास त्यांना उद्युक्त करणे हेच समाजपरिवर्तनाचे हुकमी हत्यार आहे हे त्यांनी ओळखले होते. म्हणून शूद्रातिशूद्रांच्या जागृतीसाठी ते सतत प्रयत्नशील राहिले. त्यामधून कालांतराने का होईना शेतकरी आणि दलित या शोषित वर्गांच्या चळवळीला चालना मिळाली; आणि मूलगामी समाजपरिवर्तनाचा ध्येयवाद येथे मूळ धरू लागला.

शोषित वर्गापाशी पैसा, सत्ता, शिक्षण, प्रतिष्ठा या सर्वांचाच अभाव असल्याने त्यांचे बळ नेहमी संख्या व एकजूट यांवर अवलंबून असते. जोतीरावांनी जरी आर्यभट ब्राह्मण आणि शूद्रातिशूद्र अशी जुनी जातीय परिभाषा सर्रास वापरली असली, तरी त्यांच्या डोळ्यांसमोर मुख्यतः शोषक आणि शोषित असे दोन वर्गच होते. शोषित जातीजमातींच्या एकजुटीवर त्यांनी नेहमीच भर दिला आहे. त्यांच्या लेखनात जातिनिष्ठेचा लवलेशही नाही. कोणत्याही एका विशिष्ट जातीच्या हितसंबंधांचा ते कधीच पाठपुरावा करीत नाहीत. "महाराष्ट्रात जेवढे म्हणून महारापासून तो ब्राह्मणापर्यंत लोक आहेत, त्या सर्वांसच मराठे म्हणतात"[४] अशी व्यापक भूमिका ते घेतात. शूद्रातिशूद्रांच्या सर्वांगीण उन्नतीसाठी ते अहोरात्र झटत होते. कुणबी, माळी, धनगर, लोहार, सुतार, कुभार, महार, मांग, भिल्ल, गोंड, कोळी, रामोशी इत्यादी अनेकविध कष्टाळू जातींचा त्यांनी शूद्रातिशूद्रांत समावेश केला आहे यावरून जातीजमातींच्या संकुचित जाणिवा दूर सारून सामाजिक जीवनातील शोषक व शोषित या मूलभूत वर्गभेदालाच त्यांनी महत्त्व दिले आहे हे स्पष्ट होते. हा अन्यायमूलक कृत्रिम वर्गजातिभेद नष्ट करून माणुसकी, न्याय, स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तत्त्वपंचकावर आधारलेल्या समाजाची निर्मिती हे एकमेव उद्दिष्ट त्यांनी नजरेसमोर ठेवले होते. माणसाने माणसाला गुलाम करणे आणि दुसऱ्याने लादलेली गुलामगिरी निमूटपणे सहन करणे या दोन्ही गोष्टी मानवतेच्या प्रतिष्ठेला न शोभणाऱ्या आहेत. मी कुणाचा गुलाम होणार नाही; त्याबरोबरच मी कुणाचा मालकही होणार नाही, म्हणजेच कुणाला गुलाम करणार नाही असे आब्राहाम लिंकन यांचे प्रसिद्ध वचन आहे. त्यांनी गुलामगिरीचे उच्चाटन करण्यासाठी जे युद्ध लढवले, त्यापासून जोतीरावांना प्रेरणा मिळाली होती. त्यामुळेच त्यांचा ईश्वरनिष्ठ मानवतावाद हा ऐहिकनिष्ठ, सर्वस्पर्शी, परिवर्तनशील व संघर्षप्रवण बनला आहे.

## ध्येयसाधना व कार्यपद्धती

मूलगामी परिवर्तनाचे ध्येय सदोदित दृष्टीसमोर ठेवून त्याच्या परिपूर्तीसाठी जोतीरावांनी शूद्रातिशूद्रात शिक्षणप्रसार व विचारजागृती घडवून आणण्याचे कार्य

हाती घेतले. त्यांच्या सामाजिक विचारांची तात्त्विक बैठक अगदी भक्कम होती. त्या बाबतीत तडजोड करण्याची कल्पना त्यांच्या मनाला कधीच शिवली नाही. हिंदू धर्माची व समाजाची परंपरागत चौकट कायम ठेवून शूद्रातिशूद्रांचे भवितव्य उजळणार नाही अशी त्यांची खात्री पटली होती. हिंदू धर्मातील अध्यात्मशास्त्र, आचारविचार, नीतिमूल्ये ही श्रुती, स्मृती व पुराणे यांवर आधारलेली होती. खालच्या जातींतील लोकांना जरी वेदशास्त्राध्ययनाची बंदी होती, तरी या धर्मग्रंथांचा त्यांच्या मनावर जबरदस्त पगडा होता. हा प्रभाव साफ नाहीसा केल्याखेरीज कष्टकरी समाजाला आपल्या सर्वांगीण प्रगतीची दिशा गवसणार नाही अशी जोतीरावांची दृढ समजूत होती. म्हणून "जैसी वरिवरि पालवी खुडिजे। आणि मूळीं उदक घालिजे"[५] अशा निष्फळ खटाटोपात न पडता त्यांनी सरळ वैदिक संस्कृतीवरच जोरदार हल्ला चढवला. या धर्मग्रथांना दैवी अधिष्ठान आहे हा दावा किती फसवा व मतलबी आहे, ते लोकांना दाखवून देण्याचा त्यांनी कसून प्रयत्न केला. परंतु परंपराभिमान, शास्त्रप्रामाण्य आणि रूढिवाद यांचे संस्कार येथील जनमानसात खोलवर रुजलेले होते. येथील जनसामान्यांच्या धर्मभावनेत दैवी कृपा व कोप यांना अत्यंत महत्त्वाचे स्थान होते. कर्मसिद्धान्तावर त्यांचा अढळ विश्वास असल्याने आपली दैन्यावस्था हा आपल्या पूर्वकर्माचा परिपाक आहे याबद्दल त्यांना जरासुद्धा शंका नव्हती. म्हणूनच ते पक्के दैववादी बनले होते. आपली ही स्थिती आमरण अशीच कायम राहणार; तिच्यात बदल होणे कालत्रयी शक्य नाही असे ते मनापासून मानत होते. त्यामुळे जोतीरावांचे बंडखोर विचार त्यांना प्रथमदर्शनी पाखंडीपणाचे वाटले असल्यास नवल नाही. तेव्हा सुरुवातीच्या काळात त्यांना या रूढिप्रिय स्थितिशील लोकांच्या विरोधाला तोंड द्यावे लागले.

"भट लोक आपले पोट भरण्याकरिता आपले स्वार्थी ग्रंथांतून वारंवार जागोजागी अज्ञानी शूद्र लोकांस उपदेश करितात, त्याजमुळे त्यांच्या मनामध्ये त्याजविषयी पूज्यबुद्धी उत्पन्न होऊन त्यांस त्यांनी ( भट लोकांनी ) ईश्वरालाच मात्र जो योग्य सन्मान तो आपणास देवविण्यास लाविले आहे. हा काही लहानसहान अन्याय नव्हे. याजबद्दल भट लोकांस ईश्वराजवळ जबाब द्यावा लागेल. त्यांचा उपदेशांचा ठसा बहुतेक अज्ञानी शूद्र लोकांचे मनावर इतका दृढ झाला की, ते अमेरिकेतील गुलामांसारिखे आपणास, ज्या दुष्ट लोकांनी दास केले त्यांपासून सोडवून स्वतंत्रता देणाऱ्या लोकांविरुद्ध उलट्या कंबरा बांधून लढण्यास तयार झाले. ही एक मोठी आश्चर्याची गोष्ट आहे की, आपणावर जे कोणी उपकार करीत असतील, त्यांस आम्हांवर उपकार करू नका, आमची जी हल्लीची स्थिती आहे तीच बरी आहे, असे केवळ म्हणून तृप्त न होता त्यांजबरोबर तंटा करण्यास प्रवृत्त होतात."[६]

ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या आणि आपल्या स्वतःच्याही अशा तऱ्हेच्या अनुभवातून त्यांनी योग्य तो बोध घेतला होता. काही तरी चमत्कार घडेल, आणि सर्वसामान्य लोकांची मने एकदम बदलतील असा भाबडा आशावाद त्यांनी बिलकूल बाळगला नव्हता. मात्र आपल्या तत्त्वप्रणालीमुळे कष्टकरी समाजाचे कल्याण साधणार आहे यावर त्यांची अढळ श्रद्धा होती. म्हणून आपल्या कार्यात त्यांनी कधीही खंड पडू दिला नाही.

बहुजनसमाजात हळूहळू शिक्षणाचा प्रसार होत होता. या नवशिक्षित तरुणांनी आपल्या सत्यशोधक चळवळीचा प्रसार करण्यासाठी पुढे यावे अशी जोतीरावांची अपेक्षा होती. आधी या नवशिक्षितांची संख्या फार मोठी नव्हती. शिवाय, उच्चवर्णियांप्रमाणे त्यांनाही सरकारी नोकरीत शिरण्याची उत्कंठा होतीच. व्यवसायाच्या निमित्ताने त्यांचा उच्चवर्णियांशी वारंवार संबंध येत असे. शिवाय त्यांच्या स्वतःवरही पूर्वपरंपरेचे दडपण होते. तेव्हा साहजिकच जोतीरावांच्या विचारांचे आणि चळवळीचे त्यांना एकदम आकर्षण वाटले नाही. तरी देखील काही थोडे तडफदार तरुण त्यांच्या भोवती गोळा झाले होते. जोतीरावांची समर्पणशीलता, स्वार्थत्याग, नीतिधैर्य, कल्पकता, पददलितांविषयीचा कळवळा आणि कष्टकरी समाजाच्या उन्नतीची तळमळ यांमुळे सर्वांनाच त्यांच्याविषयी आदर वाटत होता. त्यांचे कार्य शूद्रातिशूद्रांच्या हिताचे आहे याबद्दल कुणाला शंका नव्हती. तरी देखील त्यांच्या जवळचे त्यांचे अनेक मित्र व हितचिंतक त्यांच्या भूमिकेशी पूर्णपणे तादात्म्य पावले नाहीत. सामाजिक जीवनाच्या वेगवेगळया क्षेत्रांत उच्चवर्णियांचे प्राबल्य होते. त्या काळातील बहुतेक सर्व सार्वजनिक संस्था त्यांच्या ताब्यात होत्या. प्राचीन भारतीय संस्कृतीची स्तुतिस्तोत्रे वारंवार उच्चरवाने गाइली जात होती. अशा प्रतिकूल वातावरणात प्रस्थापितावर चढाई करणे, शूद्रातिशूद्रांची बाजू घेऊन सामाजिक संघर्षाच्या रणमैदानात उतरणे हे काम सोपे नव्हते. "विष खावें ग्रासोग्रासीं । धन्य तो चि एक सोसी" [८] असे ते असिधाराव्रत होते. शिवाय आपल्या लहानमोठ्या सहकाऱ्यांना वेळोवेळी सांभाळून घेण्याइतकी दक्षता व सोशिकपणा जोतीरावांच्या स्वभावात नव्हता. तेव्हा जे कोणी जेथपर्यंत बरोबर येतील, त्यांचे साह्य घेत घेत ते पुढे जात होते. कृष्णराव भालेकर आणि नारायणराव लोखंडे हे त्यांचे जाणते व कल्पक सहकारी. सत्यशोधक समाजाची तत्त्वप्रणाली त्यांना बहुतांशी मान्य होती. तरी सुद्धा जोतीरावांशी तीव्र मतभेद होऊन ते त्यांच्यापासून दूर गेले. डॉ. विश्राम रामजी घोले व गंगाराम भाऊ म्हसके यांचे तर उच्चवर्णीय सुधारकांशी जिव्हाळ्याचे संबंध होते. जोतीरावांना ही गोष्ट रुचणारी नव्हती. मामा परमानंद, तुकाराम तात्या पडवळ, वासुदेव बाबाजी नवरंगे, मोरो विठ्ठल वाळवेकर यांच्यासारखे त्यांचे चाहाते सत्य-

शोधक समाजात न जाता प्रार्थनासमाजाचे अनुयायी बनले. जोतीरावांच्या विद्रोही व आक्रमक कार्यपद्धतीपेक्षा प्रार्थनासमाजाचे समन्वयशील नेमस्तपणाचे धोरण त्यांना अधिक सोयीचे वाटले. उलट जोतीरावांनी तर प्रार्थनासमाजाच्या पुढाऱ्यांची "त्यांनी त्या समाजात एकंदर सर्व ख्रिस्ती धर्माचे उष्टेमाष्टे चोरून छपून गोळा केले आणि त्यांनी आपल्या कल्पित ब्रह्माजीच्या पुढे डोळे झाकून बाकीच्या अज्ञानी शूद्रादी अतिशूद्रांच्या मनात पुनः एक तऱ्हेचा ब्रह्मघोळ करण्याची खटपट सुरू केली आहे." ८ अशा शब्दांत संभावना केली आहे. त्या काळात उच्चवर्णीय सुधारकांना आगरकरांचे प्रखर रूढिभंजक विचार पचवता आले नाहीत. त्यामुळे आगरकर एकाकी पडले. बहुजनसमाजाच्या बाबतीत तशीच काहीशी स्थिती जोतीरावांची झाली होती. तरी आपल्या विचारांची धार कमी होऊ न देता त्यांनी आपले कार्य जिद्दीने चालू ठेवले होते.

शूद्र व अतिशूद्र समाजातील लोकांना शिक्षणाची गोडी नव्हती. विद्या शिकणे हे आपले कामच नव्हे, अशी त्यांची पक्की समजूत होती. जुन्या कालबाह्य झालेल्या जाणिवांच्या ठराविक चाकोरीतून बाहेर पडून नव्याला सामोरे जाण्याची त्यांना इच्छा नव्हती; तितकी त्यांची कुवतही नव्हती. या संस्कारजड निद्रित जनसमूहात जाऊन त्यांना जाग आणण्यासाठी, त्यांच्या जीवनाला गती देण्यासाठी हाताशी बहुजनसमाजातील होतकरू कार्यकर्त्यांचा संच नव्हता. उच्चवर्णीय समाजचिंतक तर या बाबतीत उदासीनच होते. अशा स्थितीत जोतीरावांना सरकारच्या न्यायनिष्ठेला व कर्तव्यबुद्धीला आवाहन करण्याची गरज भासली. शूद्रातिशूद्रांत शिक्षणाचा प्रसार करण्यासाठी सरकारने पुढाकार घ्यावा, प्राथमिक शिक्षण सक्तीचे करावे, निरनिराळ्या कनिष्ठ जातींतून प्रशिक्षित पंतोजी तयार करण्याची योजना अमलात आणावी; बालविवाह, बहुपत्नीकत्व, स्वैराचार, मद्यपान यांना कायद्याने बंदी करून कष्टकरी समाजाच्या प्रगतीची वाट मोकळी करावी अशी त्यांनी सरकारकडे मागणी केली होती. त्या काळच्या उच्चवर्णीय नेत्यांनाही सामाजिक सुधारणेसाठी कायद्याची मदत घेणे आवश्यक वाटत होते. रानडे-आगरकरांचा यासंबंधीचा दृष्टिकोण सर्वांना परिचित आहे. जोतीराव हे ज्यांच्या सुधारणेसाठी धडपडत होते, तो वर्ग तर अज्ञान, दारिद्र्य व रूढिदास्य यांच्या मगरमिठीत शतकानुशतके खितपत पडला होता. त्यांना मुक्त करण्यासाठी महात्मा फुले हे बहुतांशी लोकशिक्षणावरच विसंबून होते. पण तेवढ्याने भागणार नव्हते. सर्व बाजूंनी अगतिक होऊन निश्चेष्ट बनलेल्या या समाजाला जोराचा धक्का देऊन त्याला सक्तीने हालचाल करावयास लावण्याचा कायद्याखेरीज दुसरा मार्ग जोतीरावांच्या नजरेसमोर नव्हता. आगरकरांनी या प्रश्नासंबंधी आपली भूमिका निःसंदिग्धपणे मांडली आहे. त्यांच्या विचारसरणीशी फुले यांचा दृष्टिकोण पुष्कळच

मिळताजुळता आहे. "फार दिवसपर्यंत एकाच स्थितीशी खिळून गेलेल्या या आमच्या समाजास प्रथम गती देण्याचे काम मात्र कायद्याने होणारे आहे. आगगाडी चालू लागण्यापूर्वी जसा थोडासा धक्का सोसावा लागतो, तसाच हा कायद्याचा कडक उपाय गौण असला तथापि तो पत्करला पाहिजे. एखादा मनुष्य रोगाने जर्जर झाला असता, नुसत्या मात्रेच्या वेढ्याने त्यास म्हणजे पूर्ण उतार पडून तो धट्टाकट्टा होतो असे नाही; तर त्याच्या योगाने केवळ प्राण मात्र बचावतो. तशीच केवळ या कायद्याची गोष्ट आहे."[१] सामाजिक संबंधात जेथे घोर अन्याय आहे, तेथे कायद्याचा थोड्या प्रमाणात का होईना उपयोग होतो. पण वैयक्तिक चारित्र्याच्या व नीतिमत्तेच्या बाबतीत मात्र कायद्याने विशेष काही साधता येत नाही हे अनुभवाअंती आता सर्वांना कळून चुकले आहे.

## सांस्कृतिक-भावनिक आधार

जोतीराव हे क्रांतिकारक समाजचिंतक होते. क्रांतिकार्याचे स्वरूप जुने नष्ट करणे व त्याच्या जागी नवे उभे करणे असे दुहेरी असते. परंतु नवे देखील काही पोकळीत घडवता येत नाही. चैतन्यमय प्रवाही जीवनात सातत्य व फारकत अशा दोन्ही गोष्टी अंतर्भूत असतात. म्हणून जुने कधी समूळ नष्ट होत नाही आणि नवे जे अस्तित्वात येते ते संपूर्णपणे नवे असत नाही. परिवर्तनाच्या प्रक्रियेत जुन्यातील जीर्णांश जळून जाऊन त्यात आमूलाग्र बदल घडून येतो. त्याला नवा संदर्भ, नवा आकार, नवा अर्थ प्राप्त होतो. जोतीरावांना याची जाणीव होती. परंतु त्या वेळी पुनरुज्जीवनाची लाट नव्याने उसळली होती. वैदिक आर्यसंस्कृतीचे मुक्तकंठाने पवाडे गाण्याचा तो काळ होता. भविष्याकडे पाठ फिरवून गतेतिहासात रमून जाण्याची प्रवृत्ती जेव्हा बळावते, तेव्हा त्याला उतारा म्हणून जे जे जुने असेल त्याला सरसकट मूठमाती देण्याची निर्वाणीची भाषा बोलावी लागते. जोतीरावांचे ग्रंथलेखन त्या धर्तीचे आहे. मात्र भारतीय जीवनातील प्रवाहीपणाचे व सातत्याचे त्यांना भान होते. ते कृतिशील समाजचिंतक असल्याने त्यांना पदोपदी वास्तवाला भिडावे लागत होते. या वास्तवात परिवर्तन घडवून आणायचे, तर त्यासाठी जुन्यातील चैतन्यमय प्रगमनशील प्रवाहांचा आधार घ्यावाच लागतो. आपल्या चळवळीला असा सांस्कृतिक-भावनिक आधार देण्याची त्यांनी काळजी घेतली होती.

भारतीय परंपरा म्हणजे केवळ वैदिक आर्यांची परंपरा नव्हे. तिच्यात वैदिक व अवैदिक असे दोन्ही प्रवाह प्रबळ व प्रभावी होते. वैदिक प्रवाह देखील अगदी एकजिनसी नव्हता. त्याच्यातही अंतर्विरोध होताच. जोतीरावांनी अवैदिक परंपरेशी आपल्या चळवळीचे नाते जोडले आहे. पौराणिक कथा आणि लोकजीवनातील रीति-

रिवाज यांच्या आधारे त्यांनी बळीराजाचे व्यक्तित्व आणि शासनव्यवस्था यांचे उज्ज्वल व उत्साहवर्धक चित्र रेखाटले आहे. वैदिक परंपरेतील लोकांच्या पुढे रामराज्याचा आदर्श असतो. उलट खेड्यातील शेतकरी मात्र 'इडापिडा जावो आणि बळीचे राज्य येवो' अशी प्रार्थना करतो. जोतीरावांनी पुढे पुढे आपल्या लेखनात हिंदुस्थानचा निर्देश आवर्जून बलिस्थान असा केला आहे. नास्तिकशिरोमणी चार्वाक हे बृहस्पतीचे शिष्य. जोतीरावांनी चार्वाकदर्शनातील बृहस्पतीची वचने अगत्यपूर्वक उद्धृत केली आहेत. बौद्ध धर्माचा संस्थापक गौतम बुद्ध यांचा त्यांनी वैदिक धर्माचा धाडाव करणारे युगपुरुष म्हणून गौरवाने उल्लेख केला आहे. बृहस्पतिमतातील ऐहिकनिष्ठा आणि बौद्ध धर्मातील यज्ञप्रधान वैदिक कर्मकांडाला विरोध आणि समता ही तत्त्वे त्यांना ग्राह्य वाटली. परंतु या दोन्ही मतांतील निरीश्वरवाद त्यांनी स्वीकारला नाही. 'सत्यमेव जयते' हे त्यांनी शिरोधार्य मानलेले ब्रीदवाक्य हे मुण्डकोपनिषदातील आहे.[१०] उपनिषदांचे तत्त्वज्ञान हे वैदिक यज्ञीय संस्कृतीला शह देणारे होते. "प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा" ही यज्ञरूप साधने डळमळीत व विनाशकारक आहेत हे श्रुतिवचन सर्वश्रुत आहे.[११] शिवाजी महाराजांच्या पवाड्यात जोतीरावांनी त्यांच्या स्वतंत्र प्रज्ञेचे, पराक्रमाचे व प्रजहितदक्षतेचे समरसतेने वर्णन केले आहे. परमहंससभेशी असलेल्या आपल्या ऋणानुबंधाचा त्यांना कधी विसर पडला नव्हता. म्हणून आपला शिवाजीचा पवाडा त्यांनी या संस्थेचे अध्यक्ष राम बाळकृष्णजी यांना अर्पण केला आहे. सामाजिक प्रबोधनासाठी जोतीरावांनी केलेली पद्यरचना बहुतांशी अभंगांत आहे. मात्र या पद्यप्रकाराला त्यांनी 'अखंड' असे वेगळे नाव दिले आहे. संतवाङ्मयाचा बराचसा भाग अभंगात्मकच आहे. अभंगाचे मूळ रूप ओवी हे आहे. एकच भाव सलगपणे प्रगट करण्याकरिता अनेक ओव्या एकत्र गुंफल्या की अभंग होतो. ओवीला अभंग असेही जुन्या वाङ्मयात म्हटलेले आहे. ओवी हा छंद महाराष्ट्रात फार पूर्वीपासून लोकप्रिय झाला होता. म्हणूनच ज्ञानेश्वरांनी "तेणें आबाळसुबोधें। ॐ वियेचेनि बंधें"[१२] असे त्याचे वर्णन केले आहे. बाराव्या शतकातील 'मानसोल्लास' या संस्कृत ग्रंथात महाराष्ट्रातील स्त्रिया दळताना किंवा कांडताना ओव्या गातात असे म्हटले आहे. निरनिराळ्या जातींतील संतांनी जो पद्यप्रकार निवडला, तोच जोतीरावांनीही निवडला आहे. इतकेच नव्हे तर 'नामा म्हणे', 'तुका म्हणे' या धाटणीला अनुसरून त्यांनी 'जोती म्हणे' अशा शब्दांनी प्रत्येक अखंडाचा शेवट केला आहे. सत्यशोधक समाजाच्या अनुयायांसाठी त्यांनी धार्मिक विधी मराठीत तयार केले. त्यांतही मंगळाष्टके, प्रार्थना या परंपरागत गोष्टी समाविष्ट केल्या आहेत. इतकेच नव्हे तर सर्वांसाठी नेमून दिलेला सामान्य विधी कायम ठेवून देशाचार व कुळाचार यांनुसार जे उपचार करावे

लागत असतील, ते सत्यशोधक समाजाच्या पाठीराख्यांनी बेलाशक करावेत अशी त्यांनी मुभा दिली आहे. मात्र त्यांत उच्चनीचभावाला थारा देऊ नये एवढीच त्यांची अपेक्षा होती. येथपर्यंतच्या विवेचनावरून एक गोष्ट खचितच स्पष्ट होईल. सत्यशोधक चळवळीची उभारणी करताना केवळ तात्कालिक उपयुक्ततेचा विचार करून चालणार नाही, तर या चळवळीला व्यापक सांस्कृतिक–भावनिक आधार दिला पाहिजे हे जोतीरावांना उमगले होते. भारतातील अवैदिक परंपरा व लोक-जीवन यांतून हा आधार मिळवण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्याची त्यांनी पद्धतशीर व सुसंगत मांडणी केलेली नाही. पण याबाबत त्यांनी जे लिहिले, ते पाहिले की आपल्या कार्याच्या दृष्टीने त्यांना भारताच्या एकंदर इतिहासातील कोणत्या प्रवृत्तीं-विषयी जवळीक वाटत होती आणि कोणत्या प्रवृत्ती विघातक वाटत होत्या ते ध्यानात आल्याखेरीज राहात नाही.

## इतिहासमीमांसा

भारताच्या इतिहासातील वर्गसंबंधांचे महात्मा फुले यांनाच प्रथम आकलन झाले; आणि त्यांच्या स्वरूपाची त्यांनी स्थूलमानाने का होईना, सर्वांगीण चिकित्सा केली, यातच त्यांच्या विचारप्रणालीचे श्रेष्ठत्व आहे. मात्र या वर्गसंबंधांचा त्यांनी दिलेला तपशील अनेक ठिकाणी चुकीचा आहे. येथील मूळचे आर्येतर नाना जमातींचे लोक आणि बाहेरून आलेले आर्य यांच्या संघर्षातून पुढे चातुर्वर्ण्यव्यवस्था अमलात आली, या जोतीरावांच्या प्रतिपादनात पुष्कळच तथ्य आहे. परंतु ब्राह्मण हे आर्यांचे वंशज म्हणून शोषक आणि वेगवेगळ्या थरांतील इतर सर्व लोक हे शोषित असा जो त्यांनी प्राचीन व मध्ययुगीन इतिहासाचा अर्थ लावला आहे, त्याला सत्याचा आधार नाही. शिवाय हिंदुस्थानातील लहानमोठी राज्ये काबीज करून येथे आपले साम्राज्य स्थापन करणारे मुसलमान व इंग्रज हेदेखील शोषकच होते याची जाणीव जोतीरावांच्या विवेचनात कुठेच दिसून येत नाही. उलट आर्यब्राह्मणांच्या गुलामगिरीतून शूद्राति-शूद्रांना मुक्त करण्यासाठीच परमेश्वराने त्यांना येथे धाडले असा त्यांनी आपला ग्रह करून घेतला होता. जुना इतिहास आणि तत्कालीन समाजस्थिती यांचे विश्लेषण करताना त्यांनी आर्य आणि आर्येतर यांच्या परस्परसंबंधावरच सर्व लक्ष केंद्रित केले आहे. त्यामुळेच त्यांच्या प्रतिपादनात वंश, वर्ण आणि वर्ग या संकल्पनांची गल्लत झाली आहे. आधी मुळात आर्य हा एक वेगळा वंश होता की काय याबद्दलच शंकेला जागा आहे. शिवाय मानववंशशास्त्रज्ञांच्या मते भारतात अनेक वंशांचा संकर झालेला आहे. शेकडो वर्षांच्या इतिहासात येथे अनेकविध जातीजमातींचा संघर्ष व संकर होऊन एका संमिश्र अशा भारतीय समाजाचा व संस्कृतीचा जन्म झालेला आहे.

त्यांत आर्यांचे वर्चस्व असले, तरी कितीतरी आर्येतर देवदेवता, पंथोपपंथ, आचार-उपचार, चालीरीती यांचाही त्यांत समावेश झालेला आहे. आर्यांच्या संस्कृतीचा उत्तरे-कडून दक्षिणेकडे व पूर्वेकडे प्रसार होत असताना आर्येतर समाजातील वरिष्ठ वर्गाच्या अनेक गटांनी आर्यांशी हातमिळवणी केली; आणि वर्णव्यवस्थेतील उच्च स्तरात त्यांना प्रवेशही मिळाला. म्हणून येथील वर्णविभाग व वर्गसंबंध हे अमेरिकेतील गोरे आणि निग्रो यांच्यातील संबंधांप्रमाणे वंशभेदावर आधारलेले नाहीत याचे नेहमीच भान राखले पाहिजे.

हिंदू धर्मातील चातुर्वर्ण्य आणि भारताची प्राचीन व मध्ययुगीन अर्थव्यवस्था यांचे अवलोकन केले; तरी ब्राह्मण हाच काय तो येथील समाजाचा एकमेव शोषक घटक होता असा निष्कर्ष निघत नाही. चातुर्वर्ण्य व्यवस्थेने येथील धार्मिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रांतील अधिकार व कर्तव्ये यांची जन्माधिष्ठित साचेबंद विभागणी केली आहे. शूद्र व अतिशूद्र यांच्या वाट्याला अंगमेहनतीची कामे आली. मध्य-युगातील सामाजिक जीवनात कष्टाची व कौशल्याची कामे करणाऱ्या शेतकरी-कारागिरांची व कनिष्ठ प्रतीच्या वतनदारांची शूद्रातिशूद्रांत गणना होत असे. म्हणून अहोरात्र खपून संपत्तीचे उत्पादन करणारे शूद्र व अतिशूद्र हे शोषित आणि जन्म-सिद्ध प्रतिष्ठा व अधिकार यांच्या जोरावर अतिरिक्त उत्पन्नाचा उपभोग घेणारे त्रैवर्णिक हे शोषक अशीच सामान्यतः तत्कालीन अर्थव्यवस्थेची घडण होती. प्राचीन काळातील शहरी संस्कृतीचा ऱ्हास होऊ लागल्यावर वैश्यांची सत्ता उत्तरोत्तर कमी होत गेली; आणि नंतरच्या काळात त्यांचीही स्त्रीशूद्रांप्रमाणे कनिष्ठ दर्जाच्या लोकांत गणना होऊ लागली. क्षत्रिय या संज्ञेचा संबंध जोतीरावांनी क्षेत्रपती या शब्दाशी जोडला आहे. "क्षतात्किल त्रायत इत्युदग्रः क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः"[१३] क्षत म्हणजे दुखापत किंवा विनाश यांपासून रक्षण करण्यामुळेच खरोखर क्षत्र हा क्षत्रिय-वाचक उन्नत शब्द जगात रूढ झाला आहे. ही कविकुलगुरू कालिदासाची उक्ती प्रसिद्ध आहे. "इराणी लोक आपल्या शिपायांस क्षत्रिय म्हणत. परंतु बलिस्थानातील लोक एकंदर सर्व प्रजेस क्षत्रिय म्हणत असत. सारांश, क्षत्रिय शब्दाचे मूळ दोन अर्थ होत असल्यामुळे धूर्त आर्यांस अशा तऱ्हेचा गोंधळ कल्पिता आला."[१४] असे जोतीरावांचे म्हणणे होते. ते काहीही असले, तरी सूर्य व सोम वंशांचा वारसा सांगणारे राजेरजवाडे आणि पूर्वापार त्यांच्या तैनातीत असलेली घरंदाज सुखवस्तू कुटुंबे यांना शोषित म्हणून संबोधणे सयुक्तिक होणार नाही. त्यांना शोषक म्हणणेच उचित होईल.

शेतकऱ्यांच्या उत्पादनाचा एकतृतीयांश किंवा कधी कधी जवळपास निम्मा हिस्साही राजा करांच्या रूपाने वसूल करी. पाटील-कुळकर्ण्यांपासून तो देशमुख-देशपांड्यांपर्यंत सर्व वतनदार व जहागीरदार या साऱ्यामध्ये वाटेकरी असत. इतर

जातींप्रमाणे ब्राह्मण जातीचेही काही राजे इतिहासकाळात होऊन गेले आहेत. परंतु ब्राह्मण हे मुख्यतः शास्त्रीपंडित, पुरोहित, प्रशासक, सेनानी व न्यायाधीश या नात्याने राज्यसंस्थेशी निगडित होते. हरदास, पुराणिक, भटजोशी यांचा सामान्य लोकांशी नित्याचा संबंध येत असे. हे सर्वच कष्टकरी समाजाच्या शोषणात सहभागी होते. परंतु राज्यसंस्था व वतनसंस्था यांच्याद्वारे येथील श्रमजीवी जनतेचे मोठ्या प्रमाणावर शोषण होत होते. जोतीरावांनी धर्मसंस्थेची सांगोपांग छाननी केली, तिच्यावर वारंवार हत्यार उपसले. त्या मानाने राज्यसंस्था व वतनसंस्था यांच्यातील शोषणप्रक्रियेची त्यांनी पुरेशी दखल घेतली नाही. त्या काळात येथे या संस्थांच्या मूलगामी चिकित्सक अभ्यासाला सुरुवातच झालेली नव्हती. म्हणून याबद्दल फुले यांना दोष देता येणार नाही.

हिंदू धर्मसंस्था युरोपातील कॅथॉलिक चर्चप्रमाणे संघटित व शक्तिशाली नव्हती. परंतु शास्त्रप्रामाण्य आणि रूढिनिष्ठा या माध्यमांतून हिंदू धर्मसंस्थेने म्हणजेच ब्राह्मण्यवादी आचार्यांनी, शास्त्रीपंडितांनी व पुरोहितांनी सर्व थरांतील लोकांवर लादलेली बौद्धिक व मानसिक गुलामगिरी ही खूपच कडक होती; आणि म्हणून ती अधिक विघातक होती. लोकांच्या हाडीमाशी ती इतकी खिळलेली होती की, तिच्यामुळे होणारा जुलूम हा जुलूम आहे ही जाणीवच लुप्त झाली होती. त्यामुळे प्रत्यक्ष बळाचा वापर न करताही लोक धर्माध्यक्ष व रूढी यांच्यापुढे आपण होऊन मान तुकवत होते. म्हणून येथे धर्मसंस्थेविरुद्ध कधी बंड झाले नाही. खेड्यांतील जोशी व पुराणिक लोकांच्या अंधश्रद्धेला व गतानुगतिकतेला खतपाणी घालून आपला स्वार्थ साधत होते. परंतु त्यांचे अधिकारक्षेत्र अगदीच मर्यादित होते. सामाजिक व्यवहारातील बरेचसे प्रश्न निर्णयासाठी गावपंचायत आणि जातपंचायत यांच्यापुढे येत असत. अधिक महत्त्वाच्या व गुंतागुंतीच्या प्रश्नाच्या बाबतीत शास्त्रार्थ सांगून निर्णय करण्याचे काम शास्त्रीपंडितांकडे असे. परंतु त्यांनाही आपल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी राजसत्तेचे साह्य घ्यावेच लागे. शिवाय त्यांची प्रतिष्ठा व योगक्षेम हा राजाश्रयावर अवलंबून होता. राजा हा पृथ्वीपती आहे, साक्षात विष्णूचा अंश आहे अशा कल्पना जनमनात खोलवर रुजवून ते राजसत्तेला बळकटी आणीत होते; आणि राजा त्यांना अग्रहार, वर्षासने, इनामे देऊन संतुष्ट ठेवत असे. ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन्ही वर्ण येथे परस्परावलंबी व परस्परपूरक होते. "ब्रह्मक्षत्रं हि सर्वेषां वर्णानां मूलमुच्यते" ब्राह्मण आणि क्षत्रिय हे सर्व वर्णांचे मूळ होत. "ब्रह्म वर्धयति क्षत्रं क्षत्रतो ब्रह्म वर्धते" ब्राह्मण क्षत्रियांचे सामर्थ्य वाढवितात आणि क्षत्रियांमुळे ब्राह्मणांचा उत्कर्ष होतो.[९५] महाभारतातील ही वचने लक्षात घेण्याजोगी आहेत. वैदिक परंपरेचे हृद्गत त्यांत अनुस्यूत आहे. आर्य आणि आर्येतर यांच्यातील दारुण संघर्षाचे स्वरूप विशद करताना जोतीरावांनी विष्णूच्या मत्स्य, कच्छ,

वराह, नारसिंह, वामन, परशुराम या पहिल्या सहा अवतारांचा यथेच्छ समाचार घेतला. त्यातल्या त्यात वामन आणि परशुराम यांच्यावर तर त्यांनी टीकेची झोडच उठवली. पण राम आणि कृष्ण यांच्यासंबंधी लिहिताना त्यांची पंचाईत झाली. ते आर्य क्षत्रिय होते, की येथील मूळचे क्षेत्रपती होते याचा निश्चित निर्णय त्यांना करता येईना. त्यामुळे त्यांच्या विवेचनात विसंगती निर्माण झाली. राम आणि कृष्ण यांच्या हिंदू जनमानसातील प्रतिमा ते वैदिक संस्कृतीचे थोर उपासक, तिचे संरक्षण व संवर्धन करणारे क्षत्रिय युगपुरुष अशा आहेत. रामाने वर्णव्यवस्थेचे रक्षण करण्यासाठी निरपराधी शंबूकाचा वध केला. कृष्णाने भगवद्गीतेत चातुर्वर्ण्य ईश्वरप्रणीत आहे असे प्रतिपादून त्याची पकड अधिक दृढ केली. या बाबतीत जोतीरावांना सुसंगत व असंदिग्ध भूमिका घेता आली नाही. रामाने परशुरामाचा पराभव केला, त्या प्रसंगाचे वर्णन करताना राम हा येथील क्षेत्रपतीचा मुलगा होता असे जोतीरावांनी म्हटले आहे. तसेच कळलाव्या नारदाने “रामचंद्र आणि रावण, कृष्ण आणि कंस व कौरव आणि पांडव या सर्व देवभोळ्या क्षेत्रपतींच्या”[३६] घरी खेट्या घालून आणि एकमेकांच्या लाड्यालबाड्या सांगून त्यांचे आपआपसांत तंटे लावून दिले अशी त्यांची समजूत होती. उलट रामायण व भागवत या धर्मग्रंथांचा परामर्श घेताना त्यांनी राम व कृष्ण हे धूर्त ब्राह्मणांनी ईश्वरावतार म्हणून कल्पिलेले आर्यधर्माचे पुरस्कर्ते व पाठीराखे होते असे समजून त्यांच्या दोषांचे व दुष्कृत्यांचे विवरण केले आहे. जोतीरावांनी येथील सामाजिक प्रश्नांचा विचार करताना अगदी प्राचीन काळचा भारताचा इतिहास आणि पेशवाईतील व एकोणिसाव्या शतकामधील महाराष्ट्रातील परिस्थिती याची दखल घेतली. परंतु मधल्या कालखंडांचे त्यांनी परिशीलन केले नाही. त्यामुळे त्यांनी सामान्य कष्टकरी जनतेच्या शोषणाबद्दल एकट्या ब्राह्मणांनाच जबाबदार धरले. क्षत्रियांची भूमिका त्यांनी नीट तपासली नाही. त्यांच्या विचारप्रणालीतील ही एक मोठी उणीव म्हटली पाहिजे.

## शोषकत्रयीविरुद्ध लढा

जोतीरावांची शोषणाबद्दलची मीमांसा औपपत्तिक दृष्ट्या कितीही अपुरी व सदोष असली, तरी शोषित वर्गासंबंधीचा त्यांचा दृष्टिकोण अत्यंत व्यापक व वास्तवलक्षी होता. हिंदू समाजव्यवस्थेतील ब्राह्मण व क्षत्रिय हे दोन्ही वर्ण शूद्रातिशूद्रांच्या शोषणात सारखेच सहभागी असले, तरी अठराव्या शतकाचे उत्तरार्ध आणि एकोणिसावे शतक या काळातील महाराष्ट्रातील परिस्थिती अगदी वेगळी होती. पेशवाईत पश्चिम महाराष्ट्रात ब्राह्मणांच्या हातात सामाजिक, राजकीय व आर्थिक सत्तेचे केंद्रीकरण झाले होते. इंग्रजांच्या राजवटीत जुने सरंजामदार व वतनदार

यांची सत्ता संपुष्टात आली होती. जी लहानमोठी संस्थाने इंग्रजांच्या कृपेने टिकून राहिली होती, त्यांतील सत्ताधाऱ्यांच्या अंगी बदललेल्या नव्या जमान्यात स्वतंत्रपणे समाजजीवनाला योग्य वळण लावण्याची कुवत नव्हती. इंग्रजी शिक्षण, कायदेपद्धती, शासनव्यवस्था यांतून सावकार, प्रशासक, न्यायालयीन सेवक, वकील, शिक्षक, लेखक, वृत्तपत्रकार याचा जो वर्ग येथे उदयास आला, त्यांत ब्राह्मणांची संख्या बरीच मोठी होती. खेड्यांतील शेतकऱ्यांचा त्यांच्यापैकी सावकार, सरकारी नोकर व शिक्षक यांच्याशी नेहमीच प्रत्यक्ष संबंध येत असे. त्यांचा जुलूम व लुबाडणूक यांचा खेड्यांतील लोकांना वारंवार अनुभव येत असे. शिवाय जुन्या जातिव्यवस्थेला व एकंदर जीवनपद्धतीला धर्माचे अधिष्ठान होते; आणि धर्मसंस्थेची सूत्रे तर ब्राह्मणांच्या हातात होती. तेव्हा या धर्मसंस्थेच्या मुळावरच कुऱ्हाड घातल्याशिवाय सामाजिक विषमतेची पाळेमुळे खणून काढणे शक्य नव्हते. या दृष्टीने पाहता जोतीरावांची सार्वजनिक सत्यधर्म स्थापनेची चळवळ त्या काळात क्रांतिकारक व समाजपरिवर्तनाला पोषकच ठरली असे दिसून येते.

जोतीरावांनी आपल्या लेखनात जातीय परिभाषा वापरली, तरी त्यांचा मुख्य रोख शोषणाच्या प्रवृत्तीवर होता. त्या प्रवृत्तीचे एक प्रतीक म्हणून त्यांनी ब्राह्मण समाजावर अत्यंत त्वेषाने ताशेरे झाडले. त्यांच्या मांडणीतील ढोबळपणा, शिथिलता व प्रचारकी अभिनिवेश बाजूला सारून त्यांच्या विचारप्रणालीचा वास्तविक आशय शोधला पाहिजे. त्यांचा लढा मूलतः भिक्षुकशाही, सावकारशाही व नोकरशाही या शोषकत्रयीविरुद्ध होता. या तिन्ही क्षेत्रांत ब्राह्मणांचे प्राबल्य होते. इतर जातीही या शोषणात सहभागी होत्याच. परंतु त्यांचे प्रभावक्षेत्र त्या मानाने मर्यादित होते. सांस्कृतिक जीवन आणि शासनयंत्रणा यांतील स्थानमाहात्म्यामुळे ब्राह्मण समाज हा या शोषणप्रधान व्यवस्थेचे समर्थन व संगोपन करणारा, त्या काळातील एक प्रबळ घटक होऊन बसला होता. तरी वेगवेगळ्या प्रश्नांची छाननी करताना जोतीरावांनी त्यांच्याशी संबंधित अशा इतर जातींनाही निर्भीडपणे फैलावर घेतले आहे. ब्राह्मण भटभिक्षुकांवर टीकास्त्र सोडताना त्यांनी त्यातून ग्रामीण परिसरातील ‘लुच्चड देवऋषी’ला वगळले नाही. तसेच “नीति राव जोतीची, मतलबी मनामधीं झुरती। दुसरे खिस्ती तरफडती”[१८] असे म्हणून सत्यशोधक समाजाच्या चळवळीमुळे खिस्ती धर्मोपदेशक अगदी हैराण झाले होते ही गोष्ट त्यांनी आवर्जून नमूद केली आहे. ब्राह्मण सावकाराप्रमाणेच त्यांनी मारवाडी सावकार आणि लिंगायत व गुजराती अडते यांचा संधिसाधुपणा, द्रव्यलोभ व कपटनीती यांवर ताशेरे झाडले आहेत. ब्राह्मण सरकारी नोकरांचा संकुचित जात्यभिमान व लाचखाऊपणा यांचा त्यांनी निषेध केला. त्याबरोबरच युरोपियन अधिकाऱ्यांचा ऐषआराम आणि ब्राह्मण-

धार्जिणेपणा यांबद्दलही त्यांनी आपली इतराजी व्यक्त केली आहे. शिवाय इंग्लंड-मधील सावकार आणि कारखानदार यांच्या पदरात पडणारे व्याज आणि नफा, निवृत्त इंग्रज अधिकाऱ्यांची पेन्शने यांच्या द्वारे किती अलोट संपत्ती येथून परदेशात जाते, त्याचाही त्यांनी निर्देश केलेला आहे. यातील बहुतेक सर्व निषेधपर भाग स्फुट स्वरूपाचा आहे. उलट त्यांच्या टीकेचा मारा मुख्यतः वैदिक धर्मावर आणि त्यातही प्रखरतेने ब्राह्मणशाहीवर आहे हे उघड आहे. ब्राह्मणी वृत्तीला त्यांचा विरोध होता. पण सरसकट सगळ्या ब्राह्मण व्यक्ती आपल्या विरोधी आहेत असे गृहीत धरून ते चालले नाहीत. त्यांचे अनेक ब्राह्मण सहकारी होते. अनेक ब्राह्मण सुधारकांच्या मतांवर त्यांनी टीका केली, त्याजबरोबरच प्रसंगविशेषी त्यांची प्रशंसाही केली आहे. इतकेच नव्हे तर जुन्या परंपरावादी शक्तींशी चालू असलेला आपला झगडा संपल्या-वर आपण ब्राह्मणांविषयी कोणत्याही प्रकारचा आकस किंवा सूडबुद्धी न बाळगता त्यांच्याबद्दल आपल्या मनात सदिच्छाच ठेवली पाहिजे असे त्यांनी प्रांजळपणे सांगितले आहे तसेच येथील सर्व शूद्रातिशूद्र व आदिवासी असे उदार धोरण स्वीकारतील असा विश्वासही त्यांनी व्यक्त केला आहे.

"एकंदर सर्व आर्यभट ब्राह्मण लोक आपल्यास निर्लज्जपणे स्वतः अहंब्रह्म म्हणवून घेतात, याविषयी त्यांस पश्चात्ताप होऊन ते सर्व, सत्य शोधून सत्य वर्तणारे झाल्याबरोबर एकदर सर्व शूद्रादी अतिशूद्र, भिल्ल, कोळी, खोंड वगैरे लोक त्यांच्या मागील व हल्लीच्या नीच कर्माबद्दल सूड न घेता त्यांस निःसंशय क्षमा करतील."

"एकंदर सर्व आर्यभट ब्राह्मण आपले थोतांडी ग्रंथ एके बाजूला फेकून एकंदर सर्व मानव स्त्रीप्राण्यांबरोबर सत्य वर्तन जेव्हा करू लागतील, तेव्हा जगातील एकंदर सर्व मानव स्त्रीपुरुष आर्यांचे कल्याण व्हावे, म्हणून आपण सर्वांच्या निर्मिकाच्या पदापाशी लीन होऊन त्यांजविषयी मनःपूर्वक प्रार्थना करतील, यात काही संशय नाही"[१८]

जोतीरावांनी आपल्या अंतर्भेदी दृष्टीने सामाजिक वास्तवातील गुंतागुंत उकलण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या आकलनात अपुरेपणा होता, काही उणिवाही राहिल्या आहेत. विवेचनात कुठे कुठे सैलपणा व विसंवादही निर्माण झाला आहे. पुराणकथा व इतिहास यांची त्यांनी खूपच गल्लत केली आहे. त्यांनी दिलेल्या बऱ्याच शब्दांच्या व्युत्पत्त्या मान्य होण्यासारख्या नाहीत. यांपैकी काही वैगुण्ये व्यक्तिगत असली, तरी बाकी बहुतेक सर्व त्या काळाच्या, त्यांच्या सभोवतालच्या परिस्थितीच्या मर्यादा होत्या; समाजाच्या विकासक्रमातील एका विशिष्ट टप्प्याच्या त्या मर्यादा होत्या. तरी देखील त्यांच्या प्रतिपादनात त्यांच्या द्रष्टेपणाच्या खुणा जागोजाग आढळतात. त्यांच्या कार्यामागील प्रेरणा पाहिली, तर ती उदात्त, मूलग्राही व व्यापक असल्याचे दिसून येते. तिच्यात संकुचितपणा, सांप्रदायिकता व स्थितिशीलता सहसा कुठे जाणवत

नाही. प्रत्येक वेळी ते शोषितांच्या बाजूने खंबीरपणे उभे राहिले होते. शोषित मग ते कोणत्याही जातीचे, धर्माचे व थरातले असोत, त्यांच्याविषयी त्यांच्या मनात खोल सहानुभूती होती. त्यांच्या सुखदुःखांशी ते तादात्म्य पावले होते. त्यांची गाऱ्हाणी त्यांनी वारंवार वेशीवर टांगली त्यांच्या हितसंबंधांचा त्यांनी सातत्याने पाठपुरावा केला. त्याकरिता प्रस्थापितावर हल्ला चढवताना ते कधी कचरले नाहीत. त्यांची भाषा ही उद्विग्नतेची नाही; तर इथूनतिथून ती आव्हानाची आहे. श्रमिक शूद्रातिशूद्रांतील सुप्त शक्तीची त्यांना पुरेपूर ओळख पटली होती. तिच्या नवनिर्माणक्षमतेवर त्यांचा विश्वास होता. सामाजिक न्याय व समता यांच्या स्थापनेसाठी ही शक्ती जागृत करण्याची आवश्यकता त्यांना तीव्रतेने जाणवत होती, आणि त्यासाठीच ते जन्मभर प्रयत्नशील होते. म्हणून 'सामाजिक क्रांतीचे अग्रदूत' हा त्यांचा गौरव यथोचितच आहे. जोतीरावांच्या निधनाला आता नव्वद वर्षे होऊन गेली. त्या अवधीत महाराष्ट्राच्या एकंदर सामाजिक जीवनात कितीतरी स्थित्यंतरे घडून आली आहेत. समाजाच्या विविध घटकांच्या परस्परसंबंधांत फार मोठा बदल झालेला आहे. शोषकवर्गात काही नवे गट उदयास आले आहेत; शोषितवर्गाच्या संख्येत उत्तरोत्तर भर पडत आहे; आणि त्यांची स्थिती दिवसेंदिवस खालावत चालली आहे. त्यांचा जीवनकलह अधिकाधिक बिकट होऊ लागला आहे. शोषणाचे स्वरूप आणि पद्धती यांतही पुष्कळ फरक पडला आहे. जोतीराव हे तर या एकंदर सर्वच शोषित जनांचे कृतिशील कैवारी होते. त्यांचे व्यक्तित्व, विचार आणि कार्य यांपासून स्फूर्ती घेऊन त्यांचे अनुयायी गरीब कष्टकरी समाजाच्या शोषणमुक्तीसाठी संघटितपणे व जिद्दीने अहोरात्र झटतील, प्रस्थापिताशी शक्तिसर्वस्व एकवटून सर्व आघाड्यांवर पद्धतशीरपणे झगडत राहतील, तरच त्यांच्या कार्याची पूर्तता होण्याचा संभव आहे. यातच महात्मा फुले यांच्या वारसदारांची खरी सत्त्वपरीक्षा आहे.

**संदर्भ व टीपा :**

१ समग्र वाङ्मय, पृ. ४६४
२ समग्र वाङ्मय, पृ. ३५७
३ समग्र वाङ्मय, पृ ४१६
४ समग्र वाङ्मय, पृ. २६६
५ ज्ञानेश्वरी, २·३०५
६ समग्र वाङ्मय, पृ ८४
७ तुकाराम–गाथा, ७११

८ समग्र वाङ्मय, पृ. ४०५
९ निबंधसंग्रह, भा. २, पृ. ८२
१० मुण्डकोपनिषद्, ३–१–६
११ मुण्डकोपनिषद्, १–२–७
१२ ज्ञानेश्वरी, १८–१७२१
१३ रघुवंश, २ ५३
१४ समग्र वाङ्मय, ३६९
१५ महाभारत, शांतिपर्व, ७३–५, ३२
१६ समग्र वाङ्मय, पृ. १२०
१७ समग्र वाङ्मय, पृ. ५०१
१८ समग्र वाङ्मय, पृ. ४१०–११

# संदर्भ-साहित्य

अरुणोदय – बाबा पदमनजी ( आ. २ री, पुनर्मुद्रण ), मुंबई, १९५५
आजकालचा महाराष्ट्र – प्रभाकर पाध्ये, श्री. रा. टिकेकर, मुंबई, १९३५
आज्ञापत्र – ( संपादक–श्री. ना. बनहट्टी ), नागपूर व पुणे, १९६१
एकोणिसाव्या शतकांतील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना, भाग १,– रा. शं. वाळिंबे, पुणे, १९६२.
केशव शिवराम भवाळकर यांचें आत्मवृत्त (सं. भ. श्री. पंडित), नागपूर, १९६१
जातिभेदविवेकसार – एक हिंदु ( आ. २ री ), मुंबई, १८६५
तृतीय रत्न ( नाटक ) – जोतीराव गोविंदराव फुले
पुरोगामी सत्यशोधक त्रैमासिक, ५-२ पुणे, १९७९
त्रिमूर्तिदर्शन – वि. भा. गोवंडे, पुणे, १९५३
दादोबा पांडुरंग – संपादक–चरित्रलेखक, अ. का. प्रियोळकर, मुंबई, १९४७
निबंधमाला – वि. कृ. चिपळूणकर ( आ. ३ री ), सं. वा. वि. साठे, चित्रशाळा, पुणे, १९२६
परमहंससभा व तिचे अध्यक्ष रामचंद्र बाळकृष्ण ( धर्मविवेचनसह ) अ. का. प्रियोळकर, मुंबई, १९६६
पारमहंसिक ब्राह्मधर्म – दादोबा पांडुरंग, मुंबई, शके १८०२
पुणें नगरसंस्था शताब्दी ग्रंथ – मा. प. मंगुडकर, पुणे, १९६०
पुणें शहराचे वर्णन – ना. वि. जोशी ( आ. २ री ) ( सं.–गं. दे. खानोलकर ), मुंबई, १९७१
प्रार्थनासमाजाचा इतिहास – द्वा. गो. वैद्य, मुंबई, १९२७

बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर : जीवनवृत्त व लेखसंग्रह, खंड १-२-३ संशोधक-संपादक – ग. गं. जांभेकर, पुणे, १९५०

मराठेकालीन समाजदर्शन – शं. ना. जोशी, पुणे, १९६०

महात्मा फुले : समग्र वाङ्मय–सं. धनंजय कीर, स. गं. मालशे, मुंबई, १९६९

महाराष्ट्र इतिहास मंजिरी–सं. द. वि. आपटे ( आ. २ री ), पुणे, १९४८

मुंबईचें वर्णन – गोविंद नारायण माडगांवकर ( आ. २ री ), सं.–न. र. फाटक, मुंबई, १९६१

मोरो विठ्ठल वाळवेकर यांचे आत्मचरित्र – सं. चिं. ग. कर्वे, पराग मासिक, पुणे, फेब्रुवारी व मार्च १९४९

लोकहितवादीकृत निबंधसंग्रह (आ.२ री)–सं. अ. का. प्रियोळकर, मुंबई, १९६७

शिवछत्रपतींचें चरित्र – कृष्णाजी अनंत सभासद, ( आ. ४ थी ), सं. का. ना. साने, कल्याण, १९२३

संपूर्ण आगरकर – निबंधसंग्रह, भाग १ व २, सं. मा. दा. अळतेकर, पुणे, १९३७, १९३८

संस्कृत कविपंचक – वि. कृ. चिपळूणकर ( आ. २ री ), मुंबई, १९८१

सावित्रीबाई जोतीराव फुले – मा. गो. माळी, गारगोटी, १९८०

स्त्रियांच्या कायद्याची वाटचाल – कमलाबाई देशपांडे, पुणे, १९६०

ज्ञानोदयाचीं पहिलीं शंभर वर्षे – सं–भा. पां. हिवाळे, मुंबई, १९४२

शोध सत्यशोधकांचा – य. दि. फडके, मौज, दिवाळी १९७८

समाजसुधारणेच्या इतिहासातील परमहंस सभेचे स्थान – रा. ना. चव्हाण, नवभारत मासिक, वाई, जुलै १९७१

The Age of Reason – Thomas Paine, London, 1908

Agricultural Indebtedness in India and Its Remedies–Compiled by S. C. Ray, Calcutta 1915

Essays on Indian Economics – M. G. Ranade ( Third Edition ), Madras, 1916

Gazetteer of the Bombay Presidency, Vol. XVIII, Part II –'POONA', Bombay, 1885

The Industrial Evolution of India – D. R. Gadgil ( Fourth Edition ), Oxford University Press, 1944

The Life of John Wilson – George Smith, London, 1879

The Life of Thomas Paine–Moncure Daniel Conway, London, 1909

Mahatma Jotirao Phooley – Dhananjay Keer, Popular Prakashan, Bombay, 1964

Memoir of Rev. Robert Nesbit – J. M. Mitchell, London, 1858

Miscellaneous Writings – M. G. Ranade, Bombay, 1915

Political Writings – Thomas Paine – London, 1909

Recollections of my early Missionary Life in Westsrn India – J. M. Mitchell, Edinburgh, 1899

Report of the Deccan Riots Commission, 1875

Report of the Indian Famine Commission, Vol. I, 1880

Rights of Man – Thomas Paine, London, 1907



आगामी

**वाघ आणि माणूस**
रमेश देसाई

**संपकथा**
संपादक अशोक दातार

**इंद्रावतीची मोहीम**
जगदीश गोडबोले

**क्लोरोफॉर्म ( तिसरी आवृत्ती )**
अरूण लिमये



**नवी प्रकाशने**

उपरा : लक्ष्मण माने

रिंगण : मुकुंद धाराशिवकर, जयंत जोशी, जयप्रकाश मोरे

सेंट्रल बस स्टेशन : वसंत नरहर फेणे

**दुसरी आवृत्ती**

सिंहासन : अरुण साधू

बलुतं : दया पवार

रोबो : दिनानाथ मनोहर

ज्वालामुखीच्या तोंडावर : कुमार केतकर

**आगामी**

वाघ आणि माणूस : रमेश देसाई

इंद्रावतीची मोहीम : जगदीश गोडबोले

संपकथा : संपा० अशोक दातार

कृष्णपक्ष : पांडुरंग कदम

ग्रंथाली अभिनव वाचक चळवळ